अ र्वा ची न

# मराठी वाङ्मयसेवक

प्रथम खण्ड : भाग पहिला





गंगाधर देवराव खानोलकर

स्व स्ति क प्र का श न

अर्वाचीन

# मराठी वाङ्मयसेवक

[ प्रथम खण्ड : भाग पहिला ]




ग्रंथकर्ता

गंगाधर देवराव खानोलकर

द्वितीयावृत्ति ] १९५२ [ मूल्य चार रुपये

# पहिलें पान उलटण्यापूर्वी

तीन वर्षांपूर्वी मनाशीं ठरविलेलें काम आज अंशतः पुरें होत आहे. प्रारंभीं आंखणी केली होती त्याप्रमाणें लेखन होतें तर हें काम यापूर्वीच पुरें होऊन लोकांसमोर येतें. पण तसें होऊं शकलें नाहीं.

ग्रंथरचना पायाशुद्ध व्हावी, निर्दोष व्हावी यासाटीं एकट्या माणसाला जितके कष्ट करतां येणें शक्य होतें तितके केले. तरीहि क्वचित् दोष राहणें शक्य व अपरिहार्यहि आहे, अशा तऱ्हेचें काम करावयाला जशीं व जितकीं साधनें हवींत तशीं व तितकीं तीं नाहींत. आणि जीं थोडींबहुत आहेत तीं एकत्र करून, संगतवार रचून व शास्त्रीयतेच्या चाळणींतून चाळून त्यांची निवड करावयास किती तरी वेळ खर्ची पडतो.

ब्रिटिश अंमल सुरू झाल्यापासून मराठी वाङ्मयाची ज्यांनीं संस्मरणीय अशी सेवा केली, अशा वाङ्मयसेवकांची व त्यांच्या वाङ्मयाची यांत पद्धतशीर माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे.

हा ग्रंथ दोन खण्डांत विभागला असून, एकंदर १७५ चरित्रें त्यांत दिलीं आहेत. संदर्भाचे सोईसाटीं चरित्रें कालानुक्रमें न देतां अकारविल्हानें दिलीं आहेत. प्रत्येक चरित्राचे शेवटीं ग्रंथसूची व ग्रंथकार व त्यांचे ग्रंथ यांवर प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयाची स्थलकालनिर्देशासह सूची दिली आहे. वाङ्मयाभ्यासक व संशोधक यांस ती उपयुक्त वाटेल अशी आशा आहे.

या व पुढील द्वितीय खण्डांत फक्त दिवंगत वाङ्मयसेवकांचींच चरित्रें दिलीं आहेत. विद्यमान वाङ्मयसेवकांसंबंधींची माहिती '**विसाव्या शतकांतील मराठी वाङ्मय**' या माझ्या तयार होत असलेल्या स्वतंत्र पुस्तकांत यावयाची आहे.

प्रस्तुत खण्डांतील कांहीं वाङ्मयसेवकांसंबंधींचे लेख त्यांचा विशेष अभ्यास

केलेल्या, माझ्या स्नेह्यांकडून लिहून घेतले आहेत. हे लेख व त्यांचे लेखक खालीलप्रमाणें:—

| | |
|---|---|
| **केशवसुत; दत्तात्रय कोंडो घाटे** | प्रो. माधवराव त्रिं. पटवर्धन, एम्. ए. |
| **गोपाळ गणेश आगरकर; अच्युत बळवंत कोल्हटकर** | प्रो. विठ्ठल हरि कुळकर्णी, एम्. ए. |
| **अण्णा किर्लोस्कर; राम गणेश गडकरी** | विष्णु सखाराम खांडेकर. |

**विष्णुशास्त्री चिपळुणकर**—वासुदेव दामोदर गोखले, एम्. ए.
**रे. नारायण वामन टिळक**—रामचंद्र महादेव मराठे, एम्.ए.,एल्एल्.बी.

माझ्या या पांचहि स्नेह्यांनीं आपले नित्याचे व्यवसाय कांहीं काळ एका बाजूस ठेवून, वरीलप्रमाणें जें आपलेपणाच्या भावनेनें लेखनसाहाय्य केलें आहे, त्याबद्दल मी त्यांचे किती व कसे आभार मानूं !

या खण्डांत वाङ्मयसेवकांचीं जीं छायाचित्रें दिलीं आहेत, त्यांपैकीं बऱ्याच चित्रांचे ब्लॉक्स् पुणें येथील गणेश महादेव कंपनीचे मालक श्रीयुत ग. म. वीरकर यांचे आहेत. त्यांनीं केलेल्या या साहाय्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें.

अखेर, ज्यांनीं मालेंतून नेहमीं प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांहून अगदींच वेगळ्या स्वरूपाचें असें हें पुस्तक स्वीकारून थोडेंसें धाडसच केलें आहे त्या प्रकाशकांचे, श्री. मंगेशराव कुळकर्णी यांचे, आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. महाराष्ट्र त्यांच्या या धाडसाचें चीज करो. व्यक्तिशः मला कुणाकडे कांहींच मागावयाचें नाहीं. अशा तऱ्हेचें काम करावें अशी फारां दिवसांची इच्छा. ती अंशतः पूर्ण होत आहे यांतच मला समाधान आहे.

मुंबई,
गणेशचतुर्थी, शके १८५३

सर्वांचा नम्र,
**गं. दे. खानोलकर**

# द्वितीयावृत्तीसंबंधीं दोन शब्द

गेलीं जवळ जवळ दहा वर्षे दुर्मिळ झालेल्या 'वाङ्मयसेवका'च्या प्रथम खण्डाचा पहिला भाग आज प्रसिद्ध करीत आहें. यांत अनेक नवीन चरित्रें आलीं असून, पूर्वीच्या मजकुराचें परिष्करणहि पुष्कळ झालें आहे. प्रथमावृत्ति प्रसिद्ध झाल्याला २०–२१ वर्षे झालीं. एवढ्या काळांत अनेक नामवंत वाङ्मयसेवक दिवंगत झाले. त्यांचेसंबंधींचा मजकूर नवीन आवृत्तींत यावयाचा असल्यानें पूर्वीहून दुपटीनें पृष्ठसंख्या वाढेल. माझा अंदाज सातशें पृष्ठांचा आहे. इतक्या पृष्ठांचा मजकूर एकदम छापून काढण्याची माझी ऐपत नसल्यामुळें मीं तो तीन भागांत प्रसिद्ध करण्याचें ठरविलें आहे. आज त्यांतील पहिला भाग वाचकांच्या हातीं देत आहें. राहिलेले दोन भाग सहा–सहा महिन्यांच्या अंतरानें प्रसिद्ध करावे अशी मनीषा आहे. पण त्याप्रमाणें घडणें हें द्रव्यानुकूलतेवर अवलंबून राहील. माझ्याकडून मी प्रयत्नांची पराकाष्ठा करीत आहें.

प्रस्तुतच्या पहिल्या भागांत, प्रसिद्ध कवि व लेखक श्री. माधव केशव काटदरे यांजकडून कवि आनंद, त्याचप्रमाणें सौ. शांताबाई किर्लोस्कर यांजकडून आनंदीबाई किर्लोस्कर यांजवर लेख लिहून घेऊन यांत प्रसिद्ध केले आहेत. त्यांच्या या लेखनसहकार्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. 'गांवगाडा'कर्ते अत्रे, 'ज्ञानेश्वरी टीका' कर्ते आगाशे, नाटककार किरात यांजविषयीं अनुक्रमें सह्याद्रि मासिकाचे संपादक श्री. दि. वि. काळे व इंदूरचे प्रो. कवीश्वर, श्री. वसंतराव आगाशे, माझे बंधु प्रो. वा. पां. खानोलकर यांनीं अतिशय परिश्रमपूर्वक माहिती मिळवून मला पाठविली याबद्दल त्यांचाहि मी फार उतराई आहें.

'वाङ्मयसेवका'चे आतांपर्यंत तीन खण्ड प्रसिद्ध झाले. आणखी तीन खण्ड प्रसिद्ध होतील. त्यांपैकीं चौथा सध्यां लिहिला जात असून तो चालू वर्ष अखेर प्रसिद्ध करूं शकेन असें वाटतें.

ता. १६ जुलै, १९५२<br>
शिवनेरी, ४१ शिवाजीपार्क,<br>
मुंबई, २८

ग्रंथकर्ता

माझे वडील बंधू

# वामन पांडुरंग खानोलकर

यांस सादर अर्पण



# अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक

## प्रथम खण्ड

**अत्रे त्रिंबक नारायण** [ १८७२–१९३३ ] ग्रामीण समाजाचे व मागासलेल्या जातिसंस्थांचे अभ्यासक. अहमदनगर जिल्ह्यांतील संगमनेर या गांवीं यांचा जन्म झाला. याच जिल्ह्यांतील पारनेर या तालुक्याच्या गांवाचे शेजारील वडनेर हें यांचें मूळ गांव. यांचे वडील मामलेदार होते. ते यांच्या लहानपणींच वारले. हे मुंबई विश्वविद्यालयाचे पदवीधर होते. अव्वल कारकून म्हणून यांनीं मुंबई सरकारच्या महसूल खात्यांत पहिल्यानें नोकरी धरली. पुढें अहमदनगर जिल्ह्यांत 'दुष्काळी कामावर' खास अम्मलदार म्हणून यांची नेमणूक झाली. याच ठिकाणीं त्यांचा अनेक जातींच्या व हरएक धंद्याच्या लोकांशीं संबंध आला. त्यांच्याशीं मिळून मिसळून वागून व त्यांच्या अडचणींत सहानुभूतिपूर्वक लक्ष घालून त्यांचा लोभ त्यांनीं संपादन केला. त्यामुळें त्या लोकांची माहिती मिळविणें त्यांना सुलभ गेलें. 'गांवगाड्यां'त या माहितीचा त्यांनीं चांगलाच उपयोग करून घेतला. मुंबई इलाख्याच्या एथ्नॉग्राफिकल सर्व्हेचे सुपरिंटेंडेंट एन्थोवेन साहेब यांचे हाताखालीं यांनीं कांहीं काळ काम केलें होतें. "जातीजातींच्या चालीरीतींची माहिती कशी गोळा करावी ह्याचें वळण" त्यांजकडून त्यांस मिळालें. त्यांस शास्त्रीय पद्धतीची तालीम मिळाली.

खानदेशांत कांहीं वर्षें मामलेदार म्हणून यांनीं काम केलें. पुढें शेतकी कायद्यान्वयें त्यांची सबजज्जाचे जागीं नेमणूक झाली. या जागीं त्यांनीं बरींच वर्षें काम केलें. नोकरींतून निवृत्त झाल्यावर, ते इंदुरास त्यांचे जामात भालेराव वकील यांजकडे राहात असत. १९३३ सालीं ते उमरावतीस आपल्या बंधूंकडे कांहीं दिवस राहावयास म्हणून गेले असतां, त्यांना असलेला मधुमेहाचा विकार बळावून, त्या सालचे महाशिवरात्रीचे दिवशीं त्यांचा अंत झाला.

यांनीं, 'गुन्हेगार जाती' व 'गांवगाडा' अशीं दोन पुस्तकें लिहिलीं आहेत. पहिलें एम्. केनेडी यांच्या 'Criminal Classes in the Bombay Presidency' या पुस्तकाचे आधारें लिहिलें असून त्यांत वंजारे, भामटे, कैकाडी, मांग-गारुडी, रामोशी इत्यादि गुन्हेगार जातींसंबंधींची व त्यांच्या भाषा, चालीरीति, गुन्हे करण्याच्या पद्धती, त्यांचे वेष, त्यांचीं सांकेतिक चिन्हें वगैरेंबद्दलची माहिती दिली आहे. दुसरें पुस्तक हें त्यांच्या दीर्घकालीन निरीक्षणाचें व संशोधनपूर्वक केलेल्या अभ्यासाचें फळ आहे. 'वर्णव्यवस्थेचें खेड्यापाड्यांतलें रूप' त्यांचेपूर्वी कोणाहि मराठी लेखकानें इतकें सविस्तर उघड केलें नव्हतें. आणि विशेष म्हणजे सांपत्तिक स्थितीच्या दृष्टीनें जातिभेदाचें विवरण करण्याचा नवा उपक्रम त्यांनींच पहिल्यानें केला व इतरांना मार्ग दाखविला. त्यांनीं 'गांवगाडा' लिहावयास घेण्याचा आपला उद्देश सांगतांना म्हटलें आहे : "सुधारणेच्या सर्व योजना शहरांत सुरकुंड्या मारतात व खेड्याच्या गांवकुसाबाहेर थबकतात, पण वेशीच्या आंत म्हणून फडकत नाहीत, असें म्हटलें तर वस्तुस्थितीचा विपर्यास खात्रीनें होणार नाहीं...... खेड्यापाड्यांनीं, पाला-झापांनीं, दऱ्याखोऱ्यांनीं, तीर्थक्षेत्रांनीं, मंदिर-दर्ग्यांनीं, सर्व प्रकारच्या व दर्जाच्या सुधारकांना व संशोधकांना किती काम आहे, आणि तें पडून राहिलें तर देशसुधारणा कशी खुंटून बसणार आहे, इकडे बोट दाखवण्याचा ह्या पुस्तकाचा मुख्य उद्देश आहे."

अत्रे यांची कोणत्याहि विषयाकडे पाहण्याची दृष्टि मूलग्राही असे. वस्तुस्थितीची नीट छाननी करून ते स्वतंत्र बुद्धीनें त्यासंबंधींचे आपले विचार निश्चित करीत असत. ग्रंथप्रामाण्यापेक्षां अनुभवाचें प्रामाण्य ते अधिक मानीत. खेड्यांतील जनतेच्या प्रश्नांचा त्यांनीं सूक्ष्म विचार केला होता. खेड्यांची स्थिति सुधारल्याशिवाय कृषिप्रधान अशा या देशाची स्थिति सुधारणार नाही असें त्यांना वाटे. १९०८ सालीं विविधज्ञानविस्तार मासिकांत 'सक्तीचें शिक्षण' या नांवाचा एक निबंध त्यांनीं प्रसिद्ध केला होता. त्यांत खेड्यांतील जनतेंत जर शिक्षणाचा प्रसार करावयाचा असेल आणि तें त्यांना प्रिय व अन्न, वस्त्र, पाणी यांचे इतकें आवश्यक भासावें असें वाटत असेल तर, शिक्षणखात्यानें त्यासंबंधींचें आपलें धोरण बदललें पाहिजे, 'सब घोडे बारा टक्के' असें करून चालणार नाहीं, असें त्यांनीं, खेड्यांतील समाजाच्या मनाचें वास्तव चित्र रेखाटून, स्पष्टपणें प्रतिपादिलें आहे. खेडवळाच्या मुलाला द्यावयाचें शिक्षण त्याच्या सोयी-गैरसोयी लक्षांत घेऊन व

त्याच्या धंद्याच्या वाढीला तें प्रोत्साहक व मार्गदर्शक होईल असें असलें पाहिजे, असें त्यांचें म्हणणें होतें. अशा स्वरूपाचें शिक्षण खर्चाचा बोजा विशेष जड न होतां सहजपणें कसें देतां येणें शक्य आहे, याची तपशीलवार योजनाहि त्यांनीं या निबंधाच्या शेवटीं दिली आहे.

अत्र सेवानिवृत्त झाल्यानंतर 'गांवगाडा' यासारखें एखादें पुस्तक लिहून मराठी सामाजिक शास्त्रीय वाङ्मयांत कांहीं नवीन भर घालतील अशी त्या विषयाच्या अभ्यासकांची फार अपेक्षा होती. पण सरकारी सेवेप्रमाणेंच लेखनापासूनहि ते पुढें निवृत्त झाले असें दिसतें.

**वाङ्मय :**

(१) गुन्हेगार जाती: १९११ : आर्यभूषण छापखाना, पुणें.
(२) गांवगाडा: १९१५: आर्यभूषण छापखाना, पुणें.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

गांवगाडा, परीक्षण: प्रो. ग. स. भाटे: विविधज्ञान-विस्तार, ऑक्टोबर, नोव्हेंबर, १९१६.

**अनंततनय** [१८७९-१९२९] कवि. यांचें पूर्ण नांव दत्तात्रय अनंत आपटे. याचा जन्म वऱ्हाड प्रांतांतील बुलढाणें जिल्ह्यांतील वडनेर भोलजी या गांवीं झाला. यांचें प्राथमिक शिक्षण जन्मगांवीं व इंग्रजी स्कूल फायनलपर्यंतचें शिक्षण पुणें येथें नावे स्कूलमध्यें झालें. याची स्फुट कविता बरीच आहे. त्यापैकीं कांहीं 'हृदयतरंग' या नांवानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाली आहे. 'शारदाकृतिका', 'नवरसमंजरी', 'स्वर्गाचें द्वारात', 'अंतर्विद्ध कलिका' या त्याच्या दीर्घ कविता व 'तिलक-विजय' हें ओवीबद्ध काव्य हीं विशेष प्रसिद्ध आहेत.

"अनंततनयांची बरीच कविता, काव्यविषय काव्यमय पद्धतीनें कसा मांडतां येईल याचा विचार न करतां, केवळ घाईनें लिहून हातावेगळी केलेली दिसते. अन्य भाषेंतील कवितांचीं मराठी भाषांतरें अगर रूपांतरें करण्याची कला त्यांना चांगली साधली होती, आणि त्यांनीं केलेलीं भाषांतरें हींच त्यांच्या स्वतंत्र कवितेपेक्षां अधिक लोकप्रिय झालेलीं आहेत. त्यांच्या एकंदर कवितेवर नव्यापेक्षां जुन्या वळणाच्या कवींची छाप अधिक पडलेली दिसते."

१ 'माधव', मासिक मनोरंजन, पु. ३५.

अनंततनय यांच्या काव्यविषयक कामगिरीबरोबरच त्यांनीं अर्वाचीन मराठी काव्याविषयीं समाजांत आवड उत्पन्न करण्याचे जे प्रयत्न केले त्यांचीहि दखल अवश्य घ्यावयास हवी. या त्यांच्या प्रयत्नाचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे पुणें येथील 'श्री महाराष्ट्र शारदामंदिर' ही संस्था होय. "महाराष्ट्र काव्याची समाजांत आवड उत्पन्न करणें; कवि, लेखक व वाङ्मयभक्त यांत परिचय करविणें व सलोख्या वाढविणें; महाराष्ट्र कवींच्या कृति, चारित्रविषयक माहिती व कवींसंबंधीं संस्मरणीय वस्तु यांचा संग्रह करणें: काव्य व काव्यविषयक ग्रंथांचा संग्रह करणें; मधून मधून विद्यमान कवींचीं समग्र काव्यें प्रकाशित करणें, कविसंमेलनें भरविणें," वगैरे उद्देशानें ही संस्था प्रेरित झाली होती. अनंततनय या संस्थेचे जवळ जवळ प्राण मानले जात. या संस्थेतर्फेच त्यांनीं नारायण महादेव भिडे यांच्या सहकार्यानें, कवि, काव्य व तदनुषंगिक कांहीं विषय यांचें समालोचन करणारा 'काव्यचर्चा' हा ग्रंथ १९२५ सालीं संपादून प्रसिद्ध केला.

**वाङ्मय :**

(१) हृदयतरंग, पुस्तक पहिलें, [स्फुट कवितासंग्रह]; शके १८३७; यशवंत छापखाना, पुणें.

(२) हृदयतरंग, पुस्तक दुसरें, [स्फुट कवितासंग्रह]; शके १८४२; चित्रशाळा छापखाना, पुणें.

(३) हृदयतरंग, पुस्तक तिसरें, [स्फुट कवितासंग्रह]; शके १८४८; चित्रशाळा छापखाना: पुणें.

(४) श्री शारदादूतिका: काव्य; पूर्वार्ध; १९३३; यशवंत छापखाना, पुणें.

(५) ,, ,, उत्तरार्ध; १९१४; यशवंत छापखाना, पुणें.

(६) पद्मदल, [ स्फुट कवितासंग्रह ]; शके १८४९; चित्रशाळा, पुणें.

(७) श्रीमत् तिलकविजय (पूर्वार्ध); काव्य; शके १८५०; चित्रशाळा, पुणें.

(८) चंडिरामचरित्र, [ काव्य, पोथी ]; शके १८२१, धनंजय छापखाना, खानापूर.

(९) बालगीता – पूर्वार्ध; शके १८३९; [अध्याय १ ते ९, गद्य], सचित्र; चित्रशाळा, पुणें.

(१०) बालगीता – उत्तरार्ध: शके १८४८: [अध्याय १० ते १८ गद्य], सचित्र; चित्रशाळा छापखाना, पुणें.

(११) झोंपाळ्यावरची गीता; [पद्य]; शके १८३९; तृ. आ. १९१४; चित्रशाळा, पुणें.

(१२) महाराष्ट्र भगवद्गीता [मूळगीता व मराठी पद्यात्मक भाषांतर]; १९१४, यशवंत छापखाना, पुणें.

(१३) पंचायतन स्तवराज आणि श्रीशिवस्तुति; पद्य; १८९७; धनंजय छापखाना, खानापूर.

(१४) ऋतुसंहारकाव्य आणि महाराष्ट्रतात्पर्य; [ मूळ संस्कृत व मराठी पद्यात्मक भाषांतर ]; १९०१: धनंजय छापखाना, खानापूर.

(१५) पुण्याची पर्वती; पद्य; शके १८४२; चित्रशाळा, पुणें.

(१६) श्री भक्तिकल्पलता ( श्री सद्गुरु चंडिराम महाराजविरचित ), भक्ति मार्गविवेचन; आ. २ री, शके १८४८; चित्रशाळा, पुणें.

(१७) प्राकृत कविचरित्र – द्वितीय खंडापैकीं भाग पहिला [ प्राचीन महाराष्ट्र कवींचीं चरित्रें ]; १९०६; धनंजय छापखाना, खानापूर.

(१८) „ भाग दुसरा; १९०७; „ „ „

(१९) सनातन धर्माचें स्वरूप, भाग १ ला: १९०४; जगद्धितेच्छु, पुणें.

(२०) संगीत कालिंदी नाटक [ शेक्सपीयरकृत 'Two Gentlemen of Verona' चे आधारें ]; १८९७; धनंजय छापखाना, खानापूर.

**अभ्यंकर गणेश रघुनाथ** [ १८७३–१९३६ ] कायदेपंडित व राजकीय विषयांवरील लेखक. सांगली–मिरज येथें वास्तव्य व त्याच संस्थानचे प्रजाजन. नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांचे अनुयायी व नेमस्त पक्षांतील एक प्रमुख व्यक्ति. पुण्याच्या लॉ कॉलेजांत हे 'कॉन्स्टिट्यूशनल लॉ' शिकवीत. संस्थानी प्रश्नांचा यांचा अभ्यास सूक्ष्म होता. यांनीं त्यावर व इतर राजकीय प्रश्नांवर अनेक नियतकालिकांतून इंग्रजींत व मराठींत विपुल लिहिलें आहे. यांनीं आपले राजकीय गुरु नामदार गोखले यांजवर लिहिलेला चरित्रात्मक निबंध त्या काळीं विशेष वाखाणला जात असे.

**वाङ्मय :**

(१) दुष्काळ; [दुष्काळाचें स्वरूप, दुष्काळाचा कायदा व दुष्काळ फंड यांची माहिती]: समर्थप्रसाद छापखाना; कोल्हापूर.

(२) राष्ट्रीय सभा तिची उत्पत्ति व वाढ; १९१५; आर्यभूषण छापखाना, पुणें.

(३) अंबूचा पहाड; १९१५: स्थलवर्णन; लक्ष्मीनारायण छापखाना, मुंबई.

(४) गोपाळ कृष्ण गोखले—चरित्र, गुण, व त्यापासून बोध: १९१५; आर्यभूषण छापखाना, पुणें.

(५) सांगली म्युनिसिपालिटी—पन्नास वर्षांचा संक्षिप्त इतिहास, १९२२, आर्यभूषण छापखाना, पुणें.

**अभ्यंकर वासुदेवशास्त्री** [१८६३–१९४२] वेदांत, न्याय, व्याकरण, अलंकार इत्यादि विषयांचे अध्यापक, टीकाकार, व तद्विषयक ग्रंथांचे भाषांतरकार. यांचा जन्म सातारा येथें झाला. तेथें रामशास्त्री गोडबोले यांजपाशीं यांनीं व्याकरणाचें अध्ययन केलें. १८९० सालीं वयाच्या २७ व्या वर्षी हे पुणें येथें आले व संस्कृत पाठशाळेंत अध्यापन करूं लागले. १८९२ सालीं त्यांची फर्ग्युसन कॉलेजांत शास्त्री म्हणून नेमणूक झाली. या कॉलेजांत ते वेदान्त, न्याय, व्याकरण, अलंकार इत्यादि शास्त्रें बी. ए. व एम्. ए. च्या विद्यार्थ्यांस शिकवीत. या अध्यापनाच्या निमित्तानें या शास्त्रांबद्दल त्यांचा व्यासंग वाढून त्यांवर यांनीं संशोधनरूप, टीकात्मक, भाषांतरात्मक ग्रंथ लिहिले. यांचे संशोधनरूप मुख्य ग्रंथ 'काव्यप्रदीपोद्योत' (१९११), 'योगभाष्य' (१९१७), काव्यप्रकाशसंकेत (१९२१), व न्यायकोश (१९२८) हे होत: टीकात्मक ग्रंथांत मुख्य 'सर्वदर्शनसंग्रह' (१९२४) होय. त्याचप्रमाणें 'श्रीभाष्य टीका' (१९०४), 'यतीन्द्रमतदीपिका प्रकाश' (१९०५), श्रीभाष्य निवृत्ति (१९१६), याहि टीका लिहिल्या आहेत. 'अद्वैतामोद' हा स्वतंत्र ग्रंथ यांनीं रचिला असून, 'शारीरभाष्या'चें मराठी भाषांतर (१९०१) केलें आहे. इ. स. १९२२ मध्यें महामहोपाध्याय हा किताब सरकारकडून त्यांस मिळाला. १९२८ सालीं फर्ग्युसन कॉलेजमधून ते सेवानिवृत्त झाले. या सेवानिवृत्तीच्या काळांत 'व्याकरण महाभाष्या'चें मराठींत भाषांतर करण्याचें काम त्यांनीं हातीं घेऊन तें पुरें केलें.

**वाङ्मय :**

(१) शांकर ब्रह्मसूत्र भाष्याचें मराठी भाषांतर—भा. १ ला; १९११; (साहाय्यक : प्रो. दिनकर त्र्यंबक चांदोरकर); प्रिंटिंग वर्क्स, बडोदें.

(२) ,, ,, भा. २ रा; १९११; ,,

(३) ,, ,, भा. ३ रा; १९११; ,,

(४) ,, ,, भा. ४ था; १९११; ,,

(५) रामानुजाचार्यांचें विशिष्टाद्वैतमत; १९१५; आर्यभूषण, पुणें.

(६) श्रीमच्छंकराचार्यकृत ब्रह्मसूत्र शांकरभाष्य—अध्याय २, पाद १ व २; १९३३; [ संस्कृत मूळ, संस्कृत टिप्पणी, मराठी भाषांतर, मराठी गोषवारा व मराठी टीपांसह ]; आर्यभूषण, पुणें.

(७) श्रीमच्छंकराचार्यकृत ब्रह्मसूत्र—शांकरभाष्याचें मराठी भाषांतर—अध्याय २ रा, पाद दुसरा; १९३३; [ प्रस्तावना, मराठी गोषवारा व मराठी टीपांसह ]; आर्यभूषण, पुणें.

(८) श्रीमद्भगवत्पतञ्जलिविरचित व्याकरण महाभाष्य; मूळ आणि मराठी भाषांतर —भाग १ (अध्याय १, पाद १, २); शके १८६०; आर्यसंस्कृति, पुणें.

(९) ,, ,, भाग २.

**अभियोगी, ' स्फुट वक्ता '** [१८२७–१८९५] ज्योतिर्गणितज्ञ; सायन वादाचा पुरस्कर्ता. यांचें व्यक्तिनाम विसाजी रघुनाथ लेले. यांचा जन्म नाशिक येथें झाला. यांचें घराणें मूळचें धनाढ्य, परंतु वडिलांच्या कारकीर्दीत गरिबी आली. यांचें शिक्षण जुन्या पद्धतीनें झालें होतें. अकराव्या वर्षापर्यंत भाषेची ओळख, पूर्णांक–अपूर्णांकपर्यंत गणित, रूपावलि व अमरकोश एवढें अध्ययन आजोळीं व पुढें कांहीं दिवस वडिलांकडे उपनिषदांचा अभ्यास एवढेंच काय तें यांचें शिक्षण. पुढें यांचीं मातापितरें महायात्रेस निघाल्यामुळें हे नाशकास आपल्या मावशीकडे राहिले. तेथें आणखी थोडा अभ्यास करून, कांहीं दिवस एका गेटी-वाल्याकडे दरमहा एक रुपया पगारावर जमाखर्च लिहिण्यास राहिले. एका युरोपियन व्यापाऱ्याकडेहि दरमहा तीन रुपये पगारावर त्यांनीं नोकरी केली. पुढें, महायात्रेस गेलेलीं यांचीं मातापितरें ग्वाल्हेरीस येऊन राहिल्याचें कळल्यावरून हे तिकडे गेले

व ग्वाल्हेर सरकारच्या नोकरीस राहिले. कांहीं वर्षे पैमापींत व कांहीं वर्षे हिशेबी खात्यांत मिळून ३३ वर्षे नोकरी करून १८९४ सालीं हे सेवानिवृत्त झाले.

लेले यांना गणितविषयाचा लहानपणापासूनच नाद होता. पुढें वयाच्या ३५ व्या वर्षी यांचें ज्योतिर्गणिताकडे लक्ष वळलें व त्याच्या तुलनात्मक अभ्यासाला सुरुवात झाली. या अभ्यासामुळें आपलें पंचांग सायनमानाचें असावें असें त्यांचें ठाम मत बनलें. सन १८६५ पासून केरुनाना छत्रे हे निरयन पंचांग काढूं लागले होते. तेव्हांपासून केरुनानांनीं सायनमान स्वीकारावें असा यांनीं आग्रह चालविला होता. परंतु केरुनानांनीं तिकडे लक्ष न दिल्यामुळें यांनीं आपल्या मतप्रचारार्थ वर्तमानपत्रांतून व मासिकांतून लेख लिहिण्यास सुरुवात केली. यांचा सायनवादावरचा पहिला लेख सातारा येथील ‘ शुभसूचक ’ साप्ताहिकाच्या १९ जुलै १८७२ च्या अंकांत प्रसिद्ध झाला असून शेवटचा लेख २१ ऑक्टोबर १८९५ च्या मुंबई येथील ‘ इंदुप्रकाशां ’त प्रसिद्ध झाला आहे. पंचांगसुधारणेसंबंधींचा त्यांचा हा वाद इंदुप्रकाश, ज्ञानप्रकाश, विविधज्ञानविस्तार यांतून सतत तेवीस वर्षे चालला. पण या मताचा कोणी स्वीकार करीत नाहींत, जुनें सोडीत नाहींत हें पाहून, मृत्यूच्या अगोदर पांच वर्षे ते दर सालीं सायन पंचांग काढूं लागले.

केरुनानांनीं जरी आपली वृत्ति बदलली नाहीं तरी, लेले यांच्या सतत प्रचारामुळें जनार्दन बाळाजी मोडक व शंकर बाळकृष्ण दीक्षित यांसारखे ज्योतिर्गणितज्ञ सायनमताचा पुरस्कार व प्रचार करावयास पुढें आले. आणि त्यांच्या हयातींत जरी नाहीं, तरी पुढच्या काळांत नवाथे, प्रधान, चिटणीस यांसारखे या मताचा स्वीकार करून त्याप्रमाणें गणित करणारे अव्वल दर्जाचे ज्योतिषी पुढें आले व त्यांनीं तें मत पुष्कळच लोकप्रिय केलें.

महाराष्ट्रीय ज्योतिर्गणितज्ञांत ‘ स्फुट वक्ता अभियोगी ’ यांस फार मोठें स्थान दिलें जातें. इंदुप्रकाशकर्त्यानें यांजवर लिहिलेल्या मृत्युलेखांत, “ हे जर युरोपिअन देशांत जन्मते तर ह्यांची कीर्ति प्रोफेसर हक्स्ले, टिंडाल ह्यांच्या कीर्तीसारखी झाली असती. बीज फार उत्तम होतें. पण जमीन कोती पडल्यामुळें वृक्ष चांगला भरारला नाहीं. मन्वंतरापुढें निरुपाय आहे,” असे उद्गार काढले आहेत.

**आगरकर गोपाळ गणेश** [ १८५६–१८९५ ] निबंधकार व सामाजिक सुधारणेचे बुद्धिप्रामाण्यवादी पुरस्कर्ते, ‘ केसरी ’चे आद्य संपादक, फर्ग्युसन कॉलेजचे

## आगरकर गोपाळ गणेश

प्रिन्सिपॉल आणि ' सुधारक ' पत्राचे संस्थापक आणि संपादक. यांचा जन्म सातारा जिल्ह्यांतील टेंभू या गांवीं झाला. या गांवापासून तीन मैलांवर असलेलें तालुक्याचें ठिकाण कऱ्हाड हें गोपाळरावांचें आजोळ. गोपाळरावांच्या पूर्वजांचें मूळ ठिकाण कोकणांत आगरी या नांवाचें गांव असल्यामुळें त्यांच्या घराण्याला आगरकर हें नांव पडलें. गोपाळरावांचे पणजे कोकणांतून देशावर येऊन टेंभू या गांवीं स्थायिक झाले असावे. गोपाळरावांचें घराणें हें मूळचें सधन, पण गोपाळरावांच्या वडिलांच्या हयातींतच लक्ष्मीनें त्यांच्या घरांतून पोबारा केला. गोपाळरावांची आई सरस्वती ही एक बऱ्यापैकीं कवयित्री होती. गोपाळरावांना एक भाऊ व तीन बहिणी होत्या. या सर्व बहिणी लहानपणींच, लग्न होण्यापूर्वी वारल्या. यावरून आगरकरांच्या घराण्यांतील व्यक्तींची आयुर्मर्यादा फार मर्यादित होती असें म्हणावें लागतें. गोपाळराव हे आपल्या वडिलांचे द्वितीय चिरंजीव. टेंभूला शाळा नसल्यामुळें, आगरकरांना वयाच्या सहाव्या वर्षीच आपल्या आईबापांना सोडून शिक्षणासाठीं कऱ्हाडला आपल्या आजोळीं राहावें लागलें. शिक्षणाकरितां आगरकरांना पुढें अनेक स्थलांतरें करून जी खडतर तपश्चर्या करावी लागली तिची ही सुरुवातच होय. कऱ्हाडला गोपाळरावांचें इंग्रजी तीन इयत्तांपर्यंत शिक्षण झालें. कऱ्हाडला पुढील शिक्षणाची सोय नसल्यामुळें गोपाळरावांचे छोटे मामा पुण्यास गेले पण गोपाळरावांची सोय कोणत्याहि नातेवाइकास लावतां आली नाहीं. त्यामुळें इतक्या वयांत या बाळ गोपाळाला कऱ्हाडच्या मुन्सफ कोर्टांत दहाबारा रुपयांच्या पगारावर नोकरी धरावी लागली. ही खर्डेघाशीची नोकरी सोडून गोपाळराव शिक्षणासाठीं रत्नागिरीस त्यांचे चुलत चुलते शिक्षणखात्यांत बडे अधिकारी होते त्यांजकडे गेले. कऱ्हाडपासून रत्नागिरीपर्यंतचा दीडशें मैलांचा प्रवास गोपाळरावांनीं पायीं केला असें म्हणतात ! परंतु ज्या आशेनें गोपाळरावांनीं इतका खडतर प्रवास केला ती आशा मात्र फारशी फलद्रूप झाली नाहीं. कारण नातेवाइकाच्या घरीं त्याची फक्त राहाण्याची सोय झाली असावी असें वाटतें. जेवणाकरितां त्यांना वार लावावे लागले. शिवाय घरांतलें काम करावें लागे तें निराळेंच. अशा परिस्थितींत गोपाळरावांनीं मोठ्या कष्टानें दोन इयत्ता पुऱ्या केल्या व ते परत कऱ्हाडला आले. तेथें त्यांनीं दवाखान्यांत कंपाउंडरची नोकरी धरली. परंतु तेथें एकदां प्रेताची चिरफाड चालली असतां गोपाळरावांच्या मृदु अंतःकरणाला एवढा धक्का बसला कीं, त्यांनीं ती नोकरी सोडून दिली. याच सुमारास गोपाळरावांचे थोरले मामा सदाशिवराव

यांना वऱ्हाडांत ओव्हरसियरची जागा मिळाल्यामुळें ते अकोल्यास गेले व तेथेंच गोपाळरावांचें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण झालें. अकोल्याच्या शाळेंतील शिक्षक व प्रसिद्ध लेखक विष्णु मोरेश्वर महाजनी यांच्या देखरेखीखालीं गोपाळरावांचा अभ्यास चांगला झाला व ते १८७५ सालीं मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. अकोल्याचे शाळेंत असतांना एकदां महाजनी भर वर्गांत त्यांना लागेल असें बोलले. त्याला त्यांनीं तेथल्या तेथेंच त्यांस उत्तर दिलें कीं, " मी आपल्यासारखा एम्. ए. होईन तरच नांवाचा आगरकर. " मॅट्रिक पास झाल्यानंतर डेक्कन कॉलेजांत जाण्यासाठीं गोपाळराव पुण्यास आले. कॉलेजचा खर्च भागविण्यासाठीं त्यांना फार कष्ट करावे लागले. त्या वेळेस ' वऱ्हाडसमाचार ' पत्रांत लेख लिहून गोपाळराव दरमहा पांच रुपये मिळवीत असत. नेटानें अभ्यास करून कॉलेजांतील ज्युनिअर स्कॉलरशिपहि त्यांनीं मिळविली. डेक्कन कॉलेज गॅदरिंगनें ' एकत्र हिंदु कुटुंबा-पासून फायदेतोटे ' या विषयावर मराठींत उत्तम निबंध लिहिणारास ५० रुपयांचें बक्षीस लावलें होतें; तेंहि गोपाळरावांनीं पटकाविलें! तथापि एवढ्या धडपडी करूनहि त्यांना पैशांच्या अडचणींतून मुक्त होतां आलें नाहीं. कॉलेज म्हटल्याबरोबर विद्यार्थ्यांचे मनश्चक्षूंसमोर जे सुखसोहाळे दिसूं लागतात ते तर गोपाळरावांना कधींच अनुभवावयास मिळाले नाहींत; परंतु रोजच्या दिनचर्येंतील आवश्यक गरजा देखील त्याना कमी कराव्या लागल्या. एकच सद्रा असल्यामुळें सकाळीं घालण्या-करितां गोपाळरावांना तो दर रात्रीं धुवून वाळवावा लागत असे. शहरांतील वक्तृत्व समारंभात भाषण करून त्यांनीं पन्नास रुपये मिळविले, तरीहि पहिल्या वर्षाचे परीक्षेचे वेळीं फी भरण्याला त्यांचेजवळ पैसे शिल्लक राहिले नाहींत. म्हणून त्यांनीं नाटक लिहून पैसे मिळविण्यासाठीं रात्रीं जागरणें करावयास सुरुवात केली. परंतु ही बातमी तेथील अध्यापक केरूनाना छत्रे यांच्या कानीं जाऊन, त्यांनीं गोपाळरावांची फी भरण्याची व्यवस्था केली व त्यांना या नाटकलेखनाच्या दगदगींतून मुक्त केलें. गोपाळरावांची पहिल्या वर्षाची परीक्षा उत्तीर्ण होऊन त्यांना शिष्यवृत्तीहि मिळाली. अशा रीतीनें शिष्यवृत्त्या मिळवून गोपाळरावांनीं कॉलेजांतील आपला अभ्यास-क्रम रेटीत नेला व ते वयाच्या बाविसाव्या वर्षी बी. ए. झाले. त्यांना फेलोशिप मिळाली व ते एम्. ए. चा अभ्यास करूं लागले. गोपाळरावांचे ऐच्छिक विषय इतिहास, तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान हे असल्यामुळें बी. ए. च्या वर्गांत असतांनाच त्यांनीं मिलच्या ग्रंथांचें सूक्ष्म परिशीलन केलें होतें. व्यक्तिस्वातंत्र्याचा पुरस्कार

व वादविवादांतील तर्कशुद्ध विचारसरणी यांचा प्रत्यय आगरकरांच्या निबंधांत जो दिसून येतो तो त्यांच्या मिळच्या ग्रंथांच्या अभ्यासाचाच परिणाम. बी. ए. चें वर्ष हें गोपाळरावांच्या आयुष्यांतील अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें आहे. दारिद्र्याप्रमाणें आपल्या मातापितरांपासून गोपाळरावांनीं दम्याच्या विकाराचा वारसाहि लहानपणींच मिळविला होता. या दम्याच्या विकारानें त्यांना बी. ए. च्या वेळीं फार त्रास दिला. बी. ए. ची परीक्षा होण्याच्या सुमारासच गोपाळराव विवाहबद्ध झाले. आगरकरांचा समाजानें जो छळ केला त्याची झळ यशोदाबाईंना बरीच लागली असावी असें वाटतें. "रूढ धर्माचारांतील आणि लोकाचारांतील व्यंगांचें निर्भयपणें आविष्करण करण्याचें भयंकर पाप हातून घडत असल्यामुळें देशाभिमानी व धर्माभिमानी म्हणविणाऱ्या पत्रांतून होत असलेल्या शिव्या–शापांचा प्रचंड भडिमार ज्याला व ज्याच्या निरपराधी स्त्रीला एकसारखा सोसावा लागत आहे..." या आगरकरांच्या 'महाराष्ट्रास अनावृत पत्र' यांतील वाक्यावरूनहि वरील शंकेस बळकटी येते. आगरकरांच्या निधनानंतर त्यांचे मामा दत्तोपंत यांनीं गोपाळरावांना दिलेल्या वचनाला जागून यशोदाबाईंना त्यांच्या तीन अपत्यांसह अकोल्यास आपल्या घरीं आणून ठेविलें.

गोपाळराव कॉलेजांत पहिल्या वर्षाचा अभ्यास करीत असतांनाच त्यांची विष्णुशास्त्री चिपळूणकरांशीं ओळख झाली होती. कॉलेजांत टिळक आगरकरांच्या पुढें एक वर्ष होते. तथापि या दोघांचा चांगला परिचय होता व आगरकरांच्या खोलींत टिळक व इतर स्नेही यांच्याशीं निरनिराळ्या विषयावर त्यांची नेहमीं चर्चा चालत असे. एकदां शिक्षणासंबंधीं बोलणें निघालें असतां शिक्षणप्रसाराशिवाय आपल्या देशाला ऊर्जितावस्था यावयाची नाहीं याविषयीं सर्वांचें एकमत पडलें व कॉलेजांतील तरुण मंडळीनें आपलें शिक्षण पुरें होतांच स्वार्थत्याग करावयाला तयार होऊन, काटकसरीनें एखादी नमुनेदार शिक्षणसंस्था काढावी असे विचार त्यांच्या डोक्यांत घोळूं लागले. याच सुमारास सरकारी नोकरी सोडून पुण्यांत नवीन शाळा काढण्याविषयीं विष्णुशास्त्री चिपळूणकर हे खटपट करीत असल्याची वार्ता टिळक-आगरकरांचे कानांवर गेली. तेव्हां त्यांनीं विष्णुशास्त्री यांची भेट घेऊन आपला मनोदय त्यांस कळविला व सर्वांनीं मिळून एक नवीन शाळा काढावी असें ठरलें. शेवटीं सर्व जुळवाजुळव होऊन १८८० च्या जानेवारीच्या पहिल्या तारखेस न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना झाली. टिळक हे याच्या

आदल्या वर्षीच एल्.एल्. बी. झाले असल्यामुळें शाळेंत अगदीं सुरुवातीपासून काम करूं लागले. परंतु गोपाळराव एम्. ए. च्या परीक्षेंत नापास झाल्यामुळें व शाळेचें काम व अभ्यास हीं दोन्ही एकाच वेळीं नीट होणार नाहींत म्हणून त्यांनीं एक वर्षानंतर एम. ए. पास होऊन शाळेस मिळण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें १८८० च्या शेवटच्या महिन्यांत ती परीक्षा उत्तीर्ण होऊन कृतसंकल्पाप्रमाणें ते शाळेंत येऊन दाखल झाले. या वेळीं अकोल्याच्या गुरुवर्य महाजनी यांचे समोर आपण केलेल्या प्रतिज्ञेची आठवण होऊन ती पार पाडल्याबद्दल गोपाळरावांना धन्यता वाटली असेल.

न्यू इंग्लिश स्कूलच्या येऊन मिळाल्यापासून आगरकरांच्या सार्वजनिक आयुष्याला सुरुवात झाली. १८८१ मध्यें 'केसरी' व 'मराठा' हीं वर्तमानपत्रें सुरू झालीं, तेव्हां आगरकर 'केसरी'चे व टिळक 'मराठ्या'चे संपादक म्हणून काम करूं लागले. आगरकर हेच 'केसरी'चे आद्य संपादक; सुरुवातीला कांहीं वर्षे संपादक या नात्यानें 'केसरी'तील बहुतेक लिखाण त्यांनाच करावें लागलें. 'मराठ्यां'त मात्र बहुतेक मंडळी आळीपाळीनें लिहीत असत. केसरी सुरू होऊन वर्ष होतें न होतें तोंच कोल्हापूरचें बर्वे प्रकरण उद्भवलें व भलत्याच माहितीवर विश्वास ठेवून केसरी व मराठा यांत त्याबाबत मजकूर प्रसिद्ध केल्याबद्दल आगरकर व टिळक या दोघांवर फिर्याद होऊन त्यांस डोंगरीच्या तुरुंगांत १०१ दिवसपर्यंत कैद भोगावी (१८८२) लागली. 'डोंगरीच्या तुरुंगांतील आमचे एकशेंएक दिवस' या छोट्या पुस्तकांत आगरकरांनीं या तुरुंगवासाचें फार बहारदार वर्णन केलें आहे. हें वर्णन वाचून त्यांच्या विनोदी स्वभावाची व मनाच्या प्रसन्नतेची उत्तम रीतीनें साक्ष पटते. या पुस्तकांत आगरकर व टिळक यांचे तुरुंगांतील दिवस परस्परांच्या सहवासांत कसे गेले याचें मोठें हृदयस्पर्शी वर्णन केलें असून, शिवाय तुरुंगांतील शिस्त व त्यांत कोणकोणते फेरफार केले पाहिजेत वगैरे विषयांचीहि फार मार्मिक चर्चा केली आहे.

कोल्हापूर प्रकरण कोर्टांत चालू असतांनाच आगरकर यांनीं शेक्सपियरच्या हॅम्लेट या नाटकाच्या 'विकारविलसित' (१८८३) या मराठी रूपांतराला सुरुवात केली होती. हें नाटक डोंगरीच्या तुरुंगांतच त्यांनीं लिहून पूर्ण केलें. कोल्हापूर प्रकरणाचा खटला कोर्टांत लढविण्याकरितां लागलेली पैशांची चणचण दूर करण्याकरितां त्यांनीं

हें नाटक लिहावयास घेतलें. या नाटकाला आगरकरांनीं २८ पृष्ठांची प्रस्तावना जोडली असून, त्यांत 'परक्या भाषेंतील भाषांतरें कोणत्या रीतीनें करावीं' याविषयीं शेक्सपियरच्या वैशिष्ट्यासंबंधींहि त्यांनीं त्यांत विवेचन केलें आहे. त्या वेळच्या आर्योद्धारक मंडळीकडून या नाटकाचे प्रयोग करवून घेऊन त्याचें उत्पन्न 'केसरी' फंडाकडे लावण्याचा त्यांचा विचार होता. १८८२ च्या ऑक्टोबरांत टिळक-आगरकरांची डोंगरींतून सुटका झाल्यावर आगरकरांनीं 'केसरी'चीं सूत्रें पुन्हा आपल्या हातीं घेतलीं व त्याची भरभराट होऊं लागतांच 'केसरी'चा आकार बराच मोठा करण्यांत आला. न्यू इंग्लिश स्कूलचीहि लोकप्रियता वाढत गेली. त्यामुळें शाळेच्या चालकांस हुरूप चढून त्यांनीं कॉलेज काढावयाचें ठरविलें. तेंच हल्लींचें फर्ग्युसन कॉलेज होय. शाळेच्या चालकांनीं या दोन्ही संस्थांना स्थिर व संघटित रूप प्राप्त व्हावें याकरितां डेक्कन एज्युकेशन सोसायटी स्थापन करून तिच्या स्वाधीन या संस्था केल्या. वामन शिवराम आपटे, गोपाळराव आगरकर, टिळक, नामजोशी, गोळे, वासुदेवराव केळकर व धारप हे तिचे पहिले आजीव सभासद झाले. पुढें लवकरच १८८५ च्या सुरुवातीला गद्र्यांचे वाड्यांत फर्ग्युसन कॉलेज सुरू होऊन, आपटे यांस प्रिन्सिपॉल नेमण्यांत आलें.

डेक्कन एज्युकेशन सोसायटी व फर्ग्युसन कॉलेज यांची स्थापना झाल्यानंतर लवकरच आगरकर व टिळक यांच्यामध्यें प्रथम तेढ उत्पन्न झाली व ती अनेक आनुषंगिक कारणांनीं वाढत जाऊन शेवटीं त्यांच्यांत वितुष्ट पडलें.

आगरकर व टिळक यांच्यामधील मतभेदास प्रथम सुरुवात झाली ती केसरींतील मजकुराबाबत होय. आगरकरांनीं पहिलीं चारपांच वर्षें ज्या सामाजिक सुधारणांच्या तत्त्वांचा पुरस्कार केला, त्याला अखेर तोंड मलबारी शेट यांच्या संमतिवयाच्या बिलाच्या चळवळीमुळें लागलें, व याच वेळीं आगरकर व टिळक यांच्या विचार-सरणींतील विरोध प्रकट होऊं लागला. या विरोधांतील मुख्य मुद्दा परकीय व परधर्मीय इंग्रज सरकारला हिंदूंच्या सामाजिक म्हणजेच पर्यायानें धार्मिक सुधारणां-साठीं कायदे करण्याला मुभा द्यावी काय, हा होता. याचेंच पर्यवसान पुढें, 'आधीं राजकीय कीं सामाजिक' या वादांत झालें.

मलबारी यांच्या बालविवाहप्रतिबंधक चळवळीला आगरकरांनीं केसरींतून पाठिंबा दिला; त्यामुळें केसरीचें या प्रश्नाबाबत धोरण काय असावें याविषयीं चर्चा

होऊन, आगरकर यांनीं आपलीं मतें संपादकीय म्हणून न छापतां तीं आपल्या सहीनें प्रसिद्ध करावीं असें ठरलें.

या निर्णयामुळें केसरींत संपादकीय व आगरकरांच्या सहीचे कांहींसे परस्पर-विरुद्ध मतनिदर्शक लेख प्रसिद्ध होऊं लागले. आगरकरांच्या मतप्रतिपादनावर निर-निराळ्या प्रकारांनीं नियंत्रण घालण्यांत आल्यामुळें त्यांच्या निःस्पृह वृत्तीला आधींच गुदमरल्यासारखें झालें होतें; त्यांत वर्तमानपत्राच्या व संपादकांच्या प्रतिष्ठेला कमीपणा आणणारा सहीचा उपर्युक्त अनिष्ट प्रकार सुरू झाल्यामुळें आगरकरांनीं केसरी सोडून देण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें १८८७ सालीं त्यांनीं केसरीला सोडचिठ्ठी देऊन १८८८ सालीं आपलें स्वतंत्र ‘सुधारक’ पत्र काढलें.

१८८१ ते १८८७ सालापर्यंत आगरकर केसरीचे संपादक होते. या अवधींत आगरकर यांच्या हातून विविध विषयांवर अनेक लेख लिहिले गेले. त्यांतील बरेचसे ‘केसरींतील निवडक निबंध’ (१८८७) या नांवानें लोकाग्रहास्तव पुस्तकरूपानें छापण्यांत आले. त्याला आगरकरांनीं एक लहानशीच पण चटकदार प्रस्तावना जोडिली आहे.

केसरी सोडल्यानंतर आगरकर यांनीं ‘सुधारक’ पत्र काढावयाचें ठरविलें खरें, पण अनेकांच्या विरोधामुळें त्यांच्या मार्गांत बऱ्याच अडचणी आल्या. तथापि आगरकरांच्या निश्चयाला अपयश माहीत नसल्यामुळें त्या सर्व अडचणी दूर होऊन १८८८ सालीं दसऱ्याच्या सुमुहूर्तावर ‘सुधारका’चा जन्म झाला. अशा रीतीनें हिंदु धर्मांतील घातक रूढींचें सीमोल्लंघन करण्याविषयीं स्वबांधवांना उपदेश करण्याचें आपलें व्रत केसरी सोडल्यावर एका वर्षानें आगरकर यांनीं फिरून सुरू केलें.

‘सुधारक काढण्याचा हेतु’, या लेखांत आगरकरांनीं धोरण जाहीर करून ‘इष्ट असेल तें बोलणार व शक्य असेल तें करणार’ हा सुधारकाचा बाणा असल्याबद्दल ग्वाही दिली. ‘सुधारक’ हें नांवहि अप्रिय व त्यांतील सडेतोड विचारसरणी त्याहूनहि अप्रिय वाटल्यामुळें पुराणमताभिमानी व दांभिक मंडळींनीं गोपाळरावांविरुद्ध एकच काहूर उठविलें. ‘तुमचा खून करूं’ म्हणून धमक्या दिल्या व शेवटीं त्यांची खोटी प्रेतयात्रा देखील काढून आपली हिडिस हौस पुरवून घेतली! परंतु कोणत्याहि प्रकारच्या धमक्यांना आगरकरांनीं भीक घातली नाहीं व मरेपर्यंत ‘सुधारक’ चालू ठेवला. “कोण स्वस्थ बसणार? सुधारक? टांकां-

तून अर्थबोधक अक्षरें काढण्याचें सामर्थ्य असेल व तीं वाचण्यास एक इसम तरी तयार असेल तोंपर्यंत तरी हें स्त्रैण कर्म सुधारकास स्पर्श करूं शकणार नाहीं..." ही आगरकर यांनीं केलेली भीष्मप्रतिज्ञा त्यांनीं आमरण पाळली यांत संदेह नाहीं.

इकडे आगरकर केसरी सोडून निघाले तसे तिकडे टिळक डेक्कन एज्युकेशन सोसायटी सोडून देण्याच्या तयारीस लागले. कॉलेजचे प्रिन्सिपॉल आपटे यांच्याशीं शिस्तीच्या बाबतींत टिळकांचा बेबनाव सुरू झाला; व आपटे हे संस्कृत कोश व इतर पुस्तकें लिहून पैसे कमावितात हें सोसायटीच्या तत्त्वाविरुद्ध आहे अशी कुरकूर टिळकांनीं सुरू केली. यांतच आणखी सोसायटीच्या अंतर्गत व्यवस्थेसंबंधीं टिळक व आगरकर यांजमधील मतभेदांची भर पडली; पण त्याचा निकाल बहुमतानें आगरकर यांच्या बाजूचा लागला. होळकरांकडून मिळालेल्या ७०० रुपयांच्या देणगीच्या वांटणीसंबंधींहि मनांत अढी बसावी अशा प्रकारची चर्चा टिळक व आगरकर यांजमध्यें झाली. या ७०० रुपयांपैकीं ४०० रुपये आगरकर यांना देण्यांत यावे अशी होळकरांनीं आपली इच्छा दर्शविली होती. परंतु ही रक्कम चर्चेचा विषय होऊन बसल्यामुळें आगरकरांनीं त्या रकमेला हातहि लाविला नाहीं ! ह्या व अशाच इतर अनेक बाबतींत बेबनाव झाल्यामुळें टिळकांनीं आपला एक लांबलचक राजिनामा सोसायटीकडे पाठवून दिला; व तो १८९१ च्या सुरुवातीला मंजूर होऊन टिळकांचा सोसायटीशीं असलेला संबंध सुटून टिळक हे 'केसरी' व 'मराठा' या पत्रांचे पूर्ण मालक बनले.

टिळक सोसायटींतून बाहेर पडले तेव्हां संमतिवयाच्या वादाला रंग चढला होता. या वादांत रानडे, आगरकर एका बाजूचे व टिळक दुसऱ्या बाजूचे असा प्रकार असल्यामुळें आगरकर व रानडे यांच्यांत एकप्रकारचा आदरयुक्त स्नेहसंबंध जडला होता. हा वाद चालू असतांच पंचहौद मिशनमधील चहाच्या पेल्यांतील वादळ उत्पन्न होऊन पुण्यांतील सुधारक आणि सनातनी हे दोन्ही पक्ष हातघाईवर आले. पंचहौद मिशनमधील चहाच्या भोवऱ्यांत सांपडलेल्या ४२ इसमांत टिळक व रानडे हे देखील सांपडल्यामुळें त्यांतून सहीसलामत बाहेर पडण्याकरितां रानडे यांना टिळकांची मदत मिळाली व दोघांनींहि प्रायश्चित्त घेण्याची आवश्यकता मान्य केल्यामुळें या प्रश्नापुरते तरी ते एका बाजूचे झाले! ग्रामण्यप्रकरणाचा उल्लेख करून आगरकर यांनीं 'सुधारकां'त एक अग्रलेख लिहिला व टिळक हे "ख्रिस्त्याच्या हातचा चहा पिऊन

व स्टेशनावरील मुसलमान किंवा पोर्तुगीज मेस्मनच्या हातचा भात व भिस्कुटें झोडून, श्रीशंकराचार्यांशीं व्यर्थ हुज्जत घालीत बसतात; ते कर्मठ ब्राह्मणांचे खरे पुढारी नव्हत, " असें त्यांत विधान केलें. पण तें त्यांच्या अंगलट आलें. कारण टिळकांनीं खरोखरच या पदार्थांचें सेवन केलें असलें तरी तें कायद्यानें सिद्ध होण्यासारखें नव्हतें. टिळकांच्याच भाषेंत बोलावयाचें म्हणजे 'हें विधान कोर्टांत टिकण्यासारखें नव्हतें'. टिळक कायदेपंडित असल्यामुळें त्यांनीं आगरकर यांना आपलें विधान परत घेण्याविषयीं निर्वाणीचा खलिता पाठविला. आगरकर आपलें विधान परत घेण्यास तयार नव्हते. पण प्रायश्चित्तप्रकरणीं टिळक आणि रानडे एकाच दाव्यांत बांधले गेले होते, त्यामुळें रानड्यांना टिळकांविषयीं कळवळा उत्पन्न होऊन त्यांनीं आगरकरांस आपलें विधान परत घेण्याची विनंति केली व केवळ त्यांच्या मुर्वतीखातर आगरकर यांनीं आपलें विधान परत घेतलें व " बोलणें फोल झालें " हा लेख लिहिला. टिळकांनींहि लगेच त्याचा फायदा घेऊन " डोलणेंहि वायां गेलें " असा लेख लिहिला व आगरकरांना हिणविलें ! या माफीप्रकरणा-पूर्वीच १८९२ च्या ऑगस्टांत फर्ग्युसनचे प्रिन्सिपॉल आपटे मृत्यु पावले होते. त्यांच्या मृत्यूनंतर आगरकर हे कॉलेजचे प्रिन्सिपॉल झाले.

पंडिता रमाबाई यांच्या 'शारदासदना'संबंधींचे वादांत आगरकर यांनीं लिहिलेले लेख त्यांच्या निःपक्षपातीपणाचे निदर्शक असेच आहेत. त्यांना बाईच्या विद्वत्तेसंबंधीं व तिच्या कार्याविषयीं आदर असूनहि तिनें हिंदु मुलींना खिस्ती धर्माची दीक्षा देण्याचा अप्रत्यक्षपणें प्रयत्न करावा हें मुळींच रुचलें नाहीं, व "धर्मासंबंधानें आमचीं मतें कशींहि असलीं तरी हिंदु स्त्रियांनीं किंवा पुरुषांनीं कोणत्याहि ऐहिक अथवा पारमार्थिक लाभासाठीं खिस्ती व्हावें ही गोष्ट आम्हांस बिलकूल संमत नाहीं, " हें आपलें मत त्यांनीं स्पष्टपणें जाहीर केलें. तथापि इतरांप्रमाणें पंडिता रमाबाईसंबंधीं त्यांनीं अनुदार शब्द केव्हांहि काढिले नाहींत. बाईचा धर्माचे बाबतींतील उपद्व्याप आगरकर यांना जरी नापसंत होता तरी त्यांनीं हिंदु शारदासदनासारख्या संस्थेच्या आवश्यकतेची लोकांना जाणीव करून दिली व पुढें कर्वे यांचा अनाथबालिकाश्रम व गो. कृ. देवधर यांचें सेवासदन यांची स्थापना होऊन आगरकरांच्या सदिच्छेला मूर्त स्वरूप प्राप्त झालें.

१८९३ सालच्या सुरुवातीला सार्वजनिक हौदावर शूद्रांना पाणी भरूं देण्या-

बद्दल सुधारकांत तत्संबंधीं लेख लिहून आगरकरांनीं बरीच खटपट केली. या प्रसंगाला अनुसरून त्यांनीं जातिभेदाच्या अनिष्टत्वासंबंधीं जी चर्चा केली आहे ती गांधीजींच्या एतद्विषयक कार्याची प्रस्तावनाच म्हणावयास हरकत नाहीं. १८९३ च्या मार्च महिन्यांत प्रो. धों. के. कर्वे यांनीं पुनर्विवाह केला. या विवाहाच्या निमंत्रण-पत्रिकेवर आगरकर व व्याकरणकार रा. भि. जोशी यांच्या सह्या होत्या. यावरून कर्त्या सुधारकांना उत्तेजन देण्यास आगरकर कसे तत्पर असत तें दिसून येतें.

आपट्यांच्या अमदानींत फर्ग्युसन कॉलेजांत बी. ए. पर्यंत शिक्षण देण्याची परवानगी मिळाली होती. आगरकरांच्या कारकीर्दीत या कॉलेजांत (१८९३) बी. एस्‌सी. च्या संपूर्ण अभ्यासाची सोय झाली. याच सालीं मुंबई येथें हिंदुमुसलमानांचा भयंकर दंगा झाला. त्याला अनुलक्षून त्यांनीं जे लेख लिहिले आहेत त्यांत हिंदुमुसलमानांच्या एकीचें हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें विचार करतां किती महत्त्व आहे याचें सुंदर विवेचन केलें आहे. तथापि त्यांत मुसलमानांच्या धर्मवेडास घाबरून हिंदु लोकांच्या न्याय्य हक्कांची पायमल्ली होऊं देतां नये, असेंहि सरकारास बजावण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं.

प्रिन्सिपॉल आपटे यांच्या मृत्यूनंतर प्रो. धारप व पुढें कांहीं दिवसांनीं प्रो. वासुदेव बाळकृष्ण केळकर हेहि दिवंगत झाले. उपर्युक्त संस्थेशीं प्रत्यक्ष संबंध नसला तरी तिजविषयीं सहानुभूति बाळगणारे न्या. मू. तेलंग व शंकर पांडुरंग पंडित यांनाहि दरम्यानचे काळांत मृत्यु आला होता. अशा रीतीनें आपल्या मित्र-मंडळांतील बुद्धिमान् माणसें अकालीं कालवश झालेलीं पाहून गोपाळरावांच्या मनांत स्वतःच्या भविष्यासंबंधींचे विचार वारंवार येणें अगदीं स्वाभाविक होतें. किंबहुना आमचे आधुनिक विद्वान् अकालीं कां मरतात हा त्या वेळीं एक सार्व-जनिक चर्चेचाच विषय होऊन बसला होता. आगरकर यांचा तर जन्मच दारिद्र्यांत झालेला. शिक्षणासाठीं त्यांना अत्यंत हालअपेष्टा सोसाव्या लागल्या. त्या वेळीं इंग्रजी शिकलेल्यांना सरकारी खात्यांत चांगल्या पगाराच्या नोकऱ्या मिळत असत. पण आगरकरांनीं विद्यार्थीदशेंतच लोकसेवेसाटीं आयुष्य वेंचायचें टरविलें होतें. एम्. ए. झाल्यानंतर त्यांनीं आपल्या आईला पाठविलेल्या एका पत्रांत आपला मुलगा आतां मोठी नोकरी करून पुष्कळ पैसे मिळवील अशी व्यर्थ आशा न करण्याबद्दल मुद्दाम बजाविलें होतें. लोकहितवादी, रावसाहेब रानडे, भांडारकर, तेलंग

इत्यादि तत्कालीन नामांकित समाजसुधारक हे सरकारी नोकरींत होते. विष्णुशास्त्री यांनीं सरकारी नोकरीचा राजिनामा देऊन नंतर 'निबंधमाला' सुरू केली. त्यांच्यापासून लोकसेवेची स्फूर्ति घेणारे टिळक, आगरकर मात्र सुरुवातीपासूनच या मोहापासून पूर्णपणें अलिप्त राहिले होते. टिळकांची शरीरप्रकृति चांगली मुद्दढ व त्यांनीं चालविलेल्या लॉ-क्लासमुळें त्यांची आर्थिक परिस्थिति आगरकरांपेक्षां अधिक समाधानकारक. पण आगरकर मात्र दारिद्र्यांत शेवटपर्यंत होरपळून निघाले. त्यांची तत्त्वनिष्ठा आणि निःस्पृह वृत्ति इतकी जाज्वल्य कीं घरीं चालत आलेल्या लक्ष्मीलाहि त्यांनीं लाथाडलें. होळकरांनीं देऊं केलेल्या नोकरीचा त्यांनीं लोभ धरला नाहीं व त्यांजकडून 'वाक्यमीमांसे'बाबत मिळालेल्या देणगीचाहि त्यांनीं अव्हेर केला ! त्यांनीं वर्तमानपत्रें चालविलीं तीं लोकशिक्षणासाठीं, स्वार्थासाठीं नाहींत. हिंदु धर्मावर आगरकरांनीं अखेरपर्यंत आपलें टीकास्त्र चालविलें आणि त्याबद्दल लोकांचे शिव्याशाप आणि नास्तिकपणाचा आरोप यांशिवाय त्यांना दुसरें कांहीं देखील मिळालें नाहीं. पण त्याच आगरकरांनीं वृत्तपत्रीय व्यवसाय हा मात्र धर्म मानिला, धंदा मानिला नाहीं. केसरीचें सहा वर्षे संपादन करून स्वतःसाठीं त्यांनीं दिडकीहि घेतली नाहीं आणि पुढें स्वतःचें 'सुधारक' पत्र काढल्यावर पहिल्या वर्षी तीस रुपये नफा झाल्याचें आढळून येतांच त्याची वर्गणी दीड रुपया होती ती त्यांनीं बारा आणे केली ! पण या स्वार्थत्यागाचे पायीं त्यांना आपली जीवनयात्रा मात्र अकालीं संपवावी लागली. कॉलेजांतील दगदग त्यांच्या क्षीण प्रकृतीला झेपेनाशी झाली होती. दम्याच्या विकारानें उचल खाऊन त्यानें गोपाळरावांना अगदीं हैराण करून सोडिलें होतं. या दम्याच्या विकारावर आगरकरांनीं इतकीं विविध औषधें सेवन केलीं होतीं, कीं मरणोत्तर आपल्या पोटांतील औषधसामग्रीवर एक दवाखाना चालवितां येईल असें ते विनोदानें नेहमीं म्हणत असत. शिवाय मृत्यूनें त्यांच्या स्नेहीमंडळींतील एक एक इसम हस्तगत करून त्यांच्या सभोंवतीं जें भीषण तांडव-नृत्य सुरू केलें होतं, त्यामुळें मरणाविषयींची त्यांची भीति कमी कमी होत जाऊन ते त्याच्या आधीन होण्यास आपण होऊनच जणूं तयार झाले होते. १८९५ च्या जून महिन्यांत त्यांचा अंत झाला. प्रो. केळकर यांजवरील मृत्युलेख हाच आगरकर यांच्या लेखणींतून उतरलेला शेवटचा लेख होय. हा लेख लिहीत असतां ते स्वतःचाच मृत्युलेख लिहीत होते असें म्हणावयास हरकत नाहीं. मरणाच्या आधीं दोन दिवस शनिवारीं गोपाळरावांनीं एक जालीम रेचक घेतलें होतें, त्यामुळें त्यांचा शक्तिपात

झाला. रविवारीं त्यांना अगदीं गळल्यासारखें वाटत होतें. रविवारीं रात्रीं ते स्वतः उठून शौचाला जाऊन आले व आपल्या पत्नीला म्हणाले, "आतां मला थोडें बरें वाटत आहे. मी आतां निजतों; आणि तुम्हीहि निजा" असें म्हणून ते निद्रावश झाले व तीच त्यांची कालनिद्रा ठरली. अशा रीतीनें सोमवारीं (१८ जून १८९५) पहाटे त्यांनीं देह ठेवला व सकाळ होतांच मुळामुठेच्या तीरावर हजारों मंडळीच्या समक्ष त्याला अग्निसात् करण्यांत आलें. आगरकरांच्या अखेरच्या दुखण्यांत टिळकांनीं त्यांची भेट घेतली होती व त्यांच्या स्मशानयात्रेलाहि ते हजर राहिले होते. मरणापूर्वी कांहीं दिवस अगोदर जेव्हां कधीं मृत्यूसंबंधीं गोष्ट निघे तेव्हां गोपाळराव म्हणत असत कीं, "आतां मी मरणाला तयार आहें." आगरकरांनीं स्वतःचे मरणासंबंधीं हे उद्गार काढलेले ऐकले, कीं प्रसिद्ध इंग्रज इतिहासकार गिबन याची आठवण होते. गिबन हा आगरकरांचा एक आवडता ग्रंथकार होता. पौराणिक अद्‌भुत कथा वाचण्याऐवजीं गिबनच्या ग्रंथांचीं पारायणें करा असा ते नेहमीं उपदेश करीत असत. आगरकर व गिबन यांजमध्यें कांहीं बाबतींत बरेंच साम्य होतें. गिबन यानें आपला रोमन साम्राज्याच्या ऱ्हासावरील प्रचंड इतिहासग्रंथ लिहून पुरा केल्यावर स्वतःच्या मरणासंबंधानें आगरकरांच्या-प्रमाणेंच उद्गार काढले होते.

आगरकर हे वयाच्या ३९ व्या वर्षी मरण पावले. गरीब घराण्यांत झालेला त्यांचा जन्म, शिक्षणाकरितां त्यांना भोगावे लागलेले शारीरिक व मानसिक कष्ट, आयुष्यांत आलेल्या अनेक संकटांना तोंड देण्यांत त्यांनीं दाखविलेलें धैर्य व लोकसेवेचें त्यांनीं आमरण चालविलेलें व्रत, ह्या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे त्यांचें चरित्र ल्हानांपासून थोरांपर्यंत सर्वांसच कसें आदरणीय व आदर्शवत् आहे हें कळून येतें. साधी राहणी व उच्च विचारसरणी याचें आगरकर हे मूर्तिमंत उदाहरण होय. 'सुधारक' चालविणारा गृहस्थ पंचा नेसलेला, अंगांत बंडी घातलेला व डोक्याला फडकें गुंडाळलेला असा दिसेल, अशी स्वप्नांतहि कल्पना नसल्यामुळें आगरकर यांना भेटावयास आलेला इसम आश्चर्यानें किती थक्क झाला असेल याची कल्पनाच केलेली बरी. आगरकर यांचें लौकिक चरित्र जितकें उज्ज्वल तितकेंच त्यांचें खाजगी चारित्र्यहि निष्कलंक होतें. त्यांची तत्त्वनिष्ठा केवळ अलौकिक होती ! सत्यवक्तेपणा व स्पष्टवक्तेपणा हे त्यांचे प्रधान गुण होते. त्यांची बुद्धि जितकी कठोर व तीव्र होती तितकेंच त्यांचें अंतःकरण उदार व कोमल होतें.

त्यांचा स्वभाव अत्यंत सरळ असून मन जात्याच प्रेमळ होतें. यामुळें त्यांनीं आयुष्यांत जे मित्र जोडले त्यांना त्यांनीं आपण होऊन केव्हांहि अंतर दिलें नाहीं. त्यांना कवित्वशक्ति नव्हती तरी कवीची सहृदयता होती. ते स्वभावतःच विनोदी असल्यामुळें आयुष्यांतील अगदीं खडतर प्रसंगांतहि त्यांच्या मनाची प्रसन्नता कधीं ढळली नाहीं. बौद्धिक व शारीरिक गुलामगिरीचा तिटकारा व स्वातंत्र्याची निस्सीम आवड हे त्यांचे स्वभावधर्मच होते. उभ्या आयुष्यांत त्यांनीं स्वतःला व स्वतःचे मतांना विकलें नाहीं. ते जन्मानें दरिद्री होते तरी मनाचे फार उदार होते. पैशांचा लोभ त्यांनीं कधींहि धरला नाहीं. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचे कागदपत्र पाहात असतां गोपाळराव गोखले यांना पैशाची एक पुरचुंडी मिळाली. त्यावर मारलेल्या चिठ्ठीवरील ' माझ्या प्रेतदहनार्थ ' अशीं अक्षरें वाचून गोखले यांना रडूं कोसळलें. गोपाळराव गोखले हे आगरकरांचे स्नेही. त्यांना रडूं कोसळलें यांत आश्चर्य नाहीं. पण आजहि ही हकीकत वाचतांना भडभडून आल्याखेरीज राहत नाहीं. आगरकर यांच्या निधनानंतर त्यांचा ' सुधारक ' कांहीं दिवस चालला व बंद पडला. मध्यंतरीं कांहीं काळपर्यंत त्याचें पुनरुज्जीवनहि झालें. परंतु ' सुधारका 'चें सौभाग्य आगरकरांबरोबरच नष्ट झालें. ' सुधारक ' निघाल्यापासून सी. ग. देवधर व पुढें गोपाळराव गोखले यांनीं आगरकर यांना तो चालविण्यांत हरतऱ्हेचें साहाय्य केलें. तथापि आगरकर यांच्या मरणानंतर त्यांच्या ' सुधारका 'लाहि पुढें लवकरच मरण आल्याचें पाहिलें म्हणजे आगरकर यांच्या पुढच्या पिढींत आगरकरांमध्यें दिसून येणारा जोम व तडफदारपणा राहिला नाहीं हें कबूल करावें लागतें.

इंग्लंडमध्यें एकोणिसाव्या शतकांतील उत्तरार्धांत लोकशाहीच्या तत्त्वांचा झपाट्यानें प्रसार होऊं लागल्यामुळें व्यक्तिस्वातंत्र्याला नवीन अर्थ प्राप्त झाला होता. डार्विन, हक्स्ले, मिल्, स्पेन्सर इत्यादि नवमतवादी संशोधकांनीं आणि लेखकांनीं प्रचलित धर्मावर हल्ले चढवून राजशास्त्र, समाजशास्त्र, अर्थशास्त्र, शिक्षणशास्त्र, आणि तत्त्वज्ञान यांमध्यें आमूलाग्र फरक करण्याची आवश्यकता प्रतिपादन केली होती. आगरकर यांचे इतिहास आणि तत्त्वज्ञान हे आवडते विषय असल्यामुळें त्यांनीं उपरिनिर्दिष्ट ग्रंथकारांचीं मतें आत्मसात् केलीं होतीं आणि त्यामुळेंच ते बुद्धिप्रामाण्यवादी आणि व्यक्तिस्वातंत्र्याचे कट्टे पुरस्कर्ते बनले होते. त्यांच्या मतांवर मिल् आणि स्पेन्सर यांच्या विचारसरणीची विशेष छाप पडलेली असल्यामुळें

धार्मिक बाबतींत ते अज्ञेयवादी बनले होते. धर्मासंबंधीं विचार करतांना श्रद्धेला, परंपरेला आणि आप्तवाक्याला अजिबात फांटा देऊन निव्वळ तार्किक बुद्धीवरच सर्व भिस्त ठेवल्यामुळें रावसाहेब रानडे यांनीं आगरकरांवर नास्तिकपणाचा आरोप केला होता. पण आगरकर हे सुखवादी नास्तिक नसून अज्ञेयवादी होते हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. "मनुष्याचे व्यापार इंद्रियाधीन असल्यामुळें या बुद्धीला, ब्रह्माण्डाच्या आदिकारणाचें किंवा परमेश्वराचें यथार्थ ज्ञान होण्याचा संभव नाहीं, हें धर्मतत्त्व मनांत बाळगून धर्मकल्पनांत किंवा धर्माचारांत जे फेरफार करावयाचे ते करीत गेलें पाहिजे; राजकीय स्वातंत्र्य असल्याशिवाय कोणत्याहि देशांत ऐहिक सुखाची परमावधि व्हावयाची नाहीं." हे त्यांचे उद्गार लक्षांत आणले म्हणजे ते मानवताधर्माचे पुरस्कर्ते असून ऐहिक सुखसंवर्धन हें त्यांचें ध्येय असल्याचें दिसून येतें. वास्तविक धार्मिक बाबतींत टिळक हे देखील आगरकरांइतकेच भौतिकतावादी होते; पण लोकसंग्रह हें त्यांच्या चळवळीचें मुख्य सूत्र असल्यामुळें धार्मिक परंपरेला धक्का देण्याचें त्यांनीं टाळलें, पण रूढ आचारधर्मावर कठोर टीका करणें हें तर आगरकरांचें ब्रीद. त्यामुळें टिळक हे धर्ममार्तंड व आगरकर हे पाखंडी असा लोकांनीं आपला सोइस्कर गैरसमज करून घेतला. आगरकर अज्ञेयवादी असले तरी ते अंतःकरणाचे सत्प्रवृत्त आणि उदार असल्यामुळें 'संशयात्मा विनश्यति' अशी त्यांची स्थिति झाली नाहीं. कारण मनुष्याच्या सत्प्रवृत्तीवर त्यांची अढळ निष्ठा असल्यामुळें ते शेवटपर्यंत आशावादीच राहिले.

खरें पाहिलें असतां आगरकर हे धार्मिक बाबतींत उदारमतवादी होते व त्यांनीं दुसऱ्यांच्या धर्मभावना विनाकारण केव्हांहि दुखविल्या नाहींत. त्यांनीं हिंदु धर्मावर केलेली टीका ही हिंदु धर्मांतील मूलभूत तत्त्वांसंबंधीं नसून त्यांतील दांभिकपणा व घातक रूढी यांवर होती हें विसरतां कामा नये.

•

आगरकर म्हणजे समाजसुधारक अशीच सर्वसाधारण समजूत असल्यामुळें त्यांचे राजकीय विचार त्यांच्या सामाजिक मतांइतकेच जहाल होते, याचा विसर पडतो. सुधारक म्हटला म्हणजे तो राजकीय बाबतींत मवाळ असावयाचा हा संकेत आगरकरांच्या निधनानंतर प्रचारांत येऊन रूढ झाला. राजकारणांत जहाल समजल्या जाणाऱ्या खुद्द टिळकांनाहि 'आगरकर यांचीं राजकीय मतं मवाळ होतीं' असा आरोप करतां आला नाहीं. 'आगरकरांची श्राद्धतिथि' या आपल्या लेखांत टिळकांनीं आगरकरां-

विषयीं पुढील उद्गार काढले आहेत; "आगरकरांचीं चरित्रें प्रायः सुधारणेच्या एकाच गोष्टीला महत्त्व देऊन लिहिलेलीं आहेत. जणुं काय सुधारणेखेरीज आगरकरांनीं कांहींच कामगिरी केली नाहीं किंवा दुसऱ्या विषयावर लिहिलेंहि नाहीं.... आगरकर हे पक्के स्वराज्यवादी होते, आणि कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांप्रमाणें देशांतील दारिद्र्य, परावलंबित्व, चांगल्या पुरुषांचा तेजोभंग, गोऱ्या अधिकाऱ्यांची चरणी व करणी, व्यापारनाश वगैरे राजकीय व औद्योगिक अनीति पाहून त्यांचें चित्त केशवपनादि चालींच्या निरीक्षणापेक्षांहि अधिक संतप्त व दुःखित होत असे; व याला मिल् आणि स्पेन्सर यांनीं प्रतिपादन केलेल्या स्वराज्याच्या तत्त्वाखेरीज दुसरा उपाय नाहीं अशी त्यांची पक्की खात्री झाली होती......आगरकरांचें तर्कचक्र राजकीय, सामाजिक व शिक्षणविषयक बाबतींत ज्याप्रमाणें एकसारखेंच अप्रतिहत चालत होतें, तसें त्यांच्या सन्मानार्थ जमलेल्या परवांच्या सभेंतील फारच थोड्या लोकांचें चालत असेल. ...त्यांस सगळा आगरकर नको होता, किंबहुना तो त्यांच्या पचनींहि पडला नसता." राजकीय बाबतींत मिल्प्रमाणेंच ते व्यक्तिस्वातंत्र्याचे पुरस्कर्ते होते. समाजाकरितां व्यक्ति नसून व्यक्तीकरितां समाज आहे अशी त्यांची विचारसरणी होती. तथापि आगरकर यांचा सुखवाद उदात्त स्वरूपाचा होता. "सुखोपभोगासाठीं सर्व प्राणिमात्र धडपडत असतो व ज्यास जो प्राप्त होईल त्यानें त्यापासून आनंद करून घ्यावा, हें योग्य आहे. पण ज्या सुखोपभोगामुळें निरंतर तो घेतां येण्याची शक्यता नाहींशी होते, बुद्धीस मांद्य येतें, गात्रें निःसत्त्व होतात, उत्साह नाहींसा होतो, आणि—कुटुंबास व राष्ट्रास कोणत्याहि प्रकारचा फायदा न होतां उलट नुकसान किंवा त्रास सोसावा लागतो, अशा सुखोपभोगांत निमग्न असण्यांत काय फायदा आहे बरें ?" या उताऱ्यावरून सुखासंबंधीं आगरकर यांची दृष्टि किती उदात्त होती हें ध्यानांत येतें.

आगरकर यांच्या व्यक्तिस्वातंत्र्यासंबंधींच्या कल्पनांचें नीट आकलन झालें म्हणजे त्यांच्या सामाजिक मतांसंबंधीं अटकळ बांधतां येते. समाजांतील व्यक्तींचे परस्परांशीं असलेले संबंध समतेच्या उदार तत्त्वांवर अधिष्ठित झाले पाहिजेत असें त्यांचें मत होतें. सामाजिक जुलमाचे ते द्वेष्टे होते. स्त्री व पुरुष यांना शक्य तितकें स्वातंत्र्य द्यावें, असें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे. सामाजिक तत्त्वांचा पुरस्कार करतांना आगरकर यांनीं आपली प्राचीन आर्य संस्कृति विचारांत घेतली नाहीं असा त्यांजवर आरोप करण्यांत येतो, पण त्यांत कांहीं एक तथ्य नाहीं. "मूळ प्रकृति म्हणजे भारतीय

आर्यत्व न सांडतां, या पाश्चिमात्य नवीन शिक्षणाचा व त्याबरोबर ज्या नवीन कल्पना येत आहेत त्यांचा आम्ही योग्य रीतीनें अंगीकार करीत गेलों तरच आमचा निभाव लागणार आहे." याखेरीज 'भारतीय कलांचें पुराणत्व' या आपल्या विद्वत्ताप्रचुर निबंधांत आगरकर यांनीं पुढीलप्रमाणें उद्गार काढले आहेत: "अनेक गोष्टींत आम्ही आजमितीस इंग्लिश लोकांच्या मागें शेंकडों योजनें आहों, व आम्हीं त्यांपासून शिकण्यासारख्या अनेक वस्तू आहेत, हें निर्विवाद आहे. पण एवढ्यावरून असें सिद्ध होत नाहीं कीं ज्याचा आम्हीं अभिमान मानावा किंवा ज्याच्या विचारानें पुढील वर्तन करतांना उत्साहावलंबन करावें, असें आमच्या इतिहासांत कांहींच नाहीं...नीति, औदार्य, अनुकंपा, आप्तमित्रांचा परामर्श वगैरे मानसिक गुणांचा; किंवा काव्य, चित्र, गान, वादन इत्यादि ललित कलांचा; अथवा दुर्गरचना, गृहरचना, मूर्तिघटना, पाषाणखनन इत्यादि शिल्प-कलांचा येथें अभ्युदय होऊन त्यांची इतकी अभिवृद्धि झाली होती कीं, त्यासंबंधानें आजमितीसमुद्धां आम्हांस कोणापुढें खालीं पहाण्याची आवश्यकता नाहीं." आगरकर यांनीं काढलेल्या या उद्गारांवरून उपर्युक्त आरोप किती वृथा व भ्रामक आहे याची खात्री होईल. आगरकर यांनीं हिंदु समाजांतील चालीरीतींचा किती सूक्ष्म अभ्यास केला होता हें त्यांनीं 'सुधारकां'तून लिहिलेल्या निबंधांचे नुसते मथळे वाचूनहि कळण्यासारखें आहे. 'सोंवळ्याची मीमांसा', 'प्रियाराधना', 'वल्लभोपासना', 'आमचे प्रेतसंस्कार', 'वडीलपणाचे हक्क', 'भेटी, देवदर्शनें व यात्रा', 'शनिदेव ऊर्फ साडेसातीचा देव', 'स्वयंवर', 'आमच्या स्त्रियांचा पेहराव', 'आम्हां पुरुषांचा पेहराव', 'अंडीं खाण्यास काय हरकत आहे', 'आत्मा व पिशाच', 'मृतात्म्यांची दिनचर्या', 'थडगीं व देवळें', 'पुजारी व पंचाक्षरी', 'हजाम व हजामती', 'स्नान व आंघोळ', 'गंधलेपन', 'सणांचा व खेळांचा ऱ्हास', 'स्वच्छतेसाठीं घाणेरडा विषय', 'मिसेस बिझँट आणि गंगास्नान' इत्यादि विषय आगरकर यांनीं चर्चेला घेतले होते हें पाहून कौतुक वाटतें. त्याचप्रमाणें आगरकर यांची लिहिण्याची पद्धति किती चमकदार होती याचीहि कल्पना करतां येते. आगरकर यांनीं ५५–६० वर्षांपूर्वी सुचविलेल्या व चर्चिलेल्या कित्येक सामाजिक सुधारणांची आवश्यकता आजहि तीव्रतेनें भासत आहे, ही गोष्ट ध्यानांत ठेवली म्हणजे त्यांनीं या सुधारणांचा किती खोलवर विचार केला होता हें तर दिसून येतेंच, पण त्यांचे निबंध आजहि नव्यानें वाचण्याच्या लायकीचे आहेत याचीहि जाणीव

होते. याखेरीज सामाजिक सुधारणांच्या ज्या मूलभूत तत्त्वांचा आगरकर यांनीं पुरस्कार केला आहे तीं अनेक सामाजिक स्थित्यंतरें झालीं तरी फारशीं बदलण्या-सारखीं नाहींत हें पाहिलें, म्हणजे त्यांची विचार करण्याची पद्धति किती पायाशुद्ध होती हें कळून येतें. स्त्रीवर्गासंबंधीं आगरकर यांनीं त्या काळांत ज्या सुधारणा सुचविल्या आहेत त्यांतील कित्येक आजहि अमलांत आलेल्या नाहींत. मुलांमुलींना एकत्र शिक्षण द्यावें, स्त्रियांनीं उच्च शिक्षण घेतलें पाहिजे, मुलींनीं पतीची निवड स्वतः करण्याइतकें त्यांना स्वातंत्र्य द्यावें, या व अशा तऱ्हेच्या सुधारणांचा आगरकर यांनीं त्या वेळच्या परिस्थितींतहि धडाक्यानें पुरस्कार केला, यावरून ते समाजाच्या किती पुढें होते हें दिसून येतें.

आगरकर यांनीं सामाजिक सुधारणेशिवाय हिंदुस्थानाला वर डोकें काढावयाला नको, असें प्रतिपादन करण्याला सुरुवात केल्यामुळें स्वाभाविकच ‘ आधीं राजकीय सुधारणा कीं आधीं सामाजिक सुधारणा ’ हा वाद उपस्थित झाला. यासंबंधीं आगरकर यांची विचारसरणी त्यांच्याच शब्दांत देणें बरें. ते म्हणतात : “आम्हांस असें वाटतें, कीं पेशवाईचा जो मोड झाला तो आमची सामाजिक व आर्थिक स्थिति जशी पाहिजे तशी नव्हती म्हणून झाला. आणि तेथून पुढेंहि आम्हांस सुदशा प्राप्त होण्यास व ती कायम राहाण्यास आम्हीं आपली गृहस्थिति व धर्माचार सुधारण्याचा प्रथम प्रयत्न केला पाहिजे व तो करण्यास अत्यंत अनुकूल काल सांप्रत आला आहे. चांगली राजकीय स्थिति ही चांगल्या गृहस्थितीचें व धर्मपद्धतीचें फळ आहे. सबब या दोहोंच्या सुधारणेस प्रथम लागलें पाहिजे.” तथापि आगरकर हे स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते असल्यामुळें सामाजिक व राजकीय या दोन्ही सुधारणा त्यांस अभिप्रेत होत्या हें उघड आहे. केवळ राजकीय स्वातंत्र्यावर सर्व लक्ष केंद्रित करून सामाजिक सुधारणांकडे दुर्लक्ष करणें त्यांस पसंत नव्हतें एवढेंच नव्हे तर सामाजिक बाबतींत उदारमतवादी असलेल्या इंग्रज सरकारच्या साहाय्यानें सामाजिक सुधारणा अधिक झपाट्यानें होऊं शकेल असा त्यांचा विश्वास होता.

आगरकर यांनीं अर्थशास्त्राचा चांगला अभ्यास केला होता व हिंदुस्थानाच्य दारिद्र्याच्या कारणाचीहि त्यांनीं बरोबर मीमांसा केली होती. आपल्या देशांत स्वदेशी उद्योगधंद्यांची वाढ कशी होईल याविषयीं त्यांनीं अनेक मार्मिक सूचना

केल्या आहेत. "आमच्या इकडील अलीकडल्या सुशिक्षित लोकांनीं सरकारी नोकरीवर सगळा जीव ठेवल्यामुळें आपली किंमत किती कमी करून घेतली आहे. बरें, हाडांचीं काडें करून, शेंकडां रुपये खर्च करून बी. ए. पर्यंत अभ्यास करावा, आणि पुढें फळ काय ? तर रेव्हेन्यू खात्यांत किंवा शाळा खात्यांत ३०।३५ रुपये दरमहाची नोकरी ! चांगला सुतारसुद्धां तुमच्या शाळेचा उंबरठा न चढतां २५।३० रुपये सहज मिळवितो हें या ग्रॅज्युएटांस समजूं नये काय ?......कष्टानें संपादिलेल्या विद्येचा असा सवंग विक्रय करावयाचा काय ? विद्यार्जनानें विकसित झालेलीं मनें स्वतंत्र धंदे स्थापण्याकडे लावाल, तर तुम्हांस अन्नाची किंवा मानाची काय वाण पडणार आहे ? पण खांदा देऊन काम करण्याची व दुसऱ्याचे गुलाम न होतां स्वतःचे करामतीवर चरितार्थ संपादण्याची धमक आतां कोठें राहिली आहे ?" आगरकर यांनीं त्या काळीं काढलेले हे उद्गार आजहि किती यथार्थ आहेत बरें ?

आगरकर यांचे लिखाणांत विचारांच्या प्रौढत्वाइतकीच भाषेची प्रगल्भताहि दिसून येते. किंबहुना त्यांच्या भाषेच्या जोरदारपणाचा उगम त्यांच्या विचारांच्या तीव्रतेंतच झाला असला पाहिजे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. एरव्हीं अंतःकरण पिळवटून निघाल्याखेरीज इतके हृदयस्पर्शी उद्गार कसे निघणार ? उत्कृष्ट भाषाशैलींत आवश्यक असणारे बहुतेक गुण आगरकरांच्या लेखनपद्धतींत प्रकर्षानें आढळतात. आगरकरांच्या भाषासरणीवर त्यांच्या व्यक्तिविशिष्टतेची छाप सर्वत्र दिसून येते. विचारसरणींतील निर्भयता आणि मतप्रतिपादनांतील सडेतोडपणा व आवेश, यांमुळें त्यांच्या लिखाणाला इतका जिवंतपणा आलेला आहे, कीं तें वाचतांच मृतप्राय झालेली विचारशक्ति खडबडून जागी व्हावी ! आगरकरांच्या भाषासरणीला खवळलेल्या समुद्राचीच उपमा देणें योग्य होईल. समुद्राच्या पृष्ठभागावरून एकामागून एक झपाट्यानें झोकावत जाणाऱ्या लांबच लांब लाटांप्रमाणें त्यांच्या वाक्यपंक्ति, सागराच्या अफाटपणाची व अगाधत्वाची आठवण करून देणारें त्यांचें लेखनांतील अर्थगौरव व विचारगांभीर्य, फेंसाळलेल्या लाटांच्या गतीलाहि मागें टाकणारा त्यांच्या भाषासरणींतील ओघ आणि आवेश, व वडवानलालाहि चटका बसेल असा त्यांच्या शब्दांतील दाहकपणा इत्यादि गुणसमुच्चयामुळें आगरकरांची लेखनपद्धति ओजस्वी आणि प्रभावशाली झाली आहे. आगरकरांचें शब्दभांडारहि रत्नाकराचीच जाणीव करून देतें. सुंदर कल्पनांप्रमाणें सुंदर शब्द देखील त्यांच्या निबंधांत गर्दी करून बसलेले आढळतात. उपमा, उत्प्रेक्षा व रूपक इत्यादि अर्था-

लंकारांचा त्यांनीं आपल्या लिखाणांत सढळ हातानें उपयोग केला आहे. "सुधारणेच्या शब्दांत:पुराच्या बाहेर संचार होऊं नये म्हणून डोळ्यांत तेल घालून खडा पहारा करणाऱ्या नानाविध धर्मकल्पनांशीं तुमुल संग्राम करण्यास ज्यांना स्फुरण यावें, त्याच्या भोंवतालीं उभारलेल्या प्रचंड लोकमततटास ढांसळून पाडण्यास ज्ञानतोफांस ज्यांनीं सरबत्ती द्यावी, व त्यास गराडा घालणाऱ्या रूढिखंदकावर क्रियासेतु बांधण्यास ज्यांनीं प्रवृत्त व्हावें, अशा विद्याचारसंपन्न लोकांनीं दुराग्रहाच्या भरीं भरून व शुष्क बाबतींत दुही माजवून आपल्या मुख्य कर्तव्याची हेळसांड होऊं द्यावी ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट होय." अशा पद्धतीचे वाक्यसमूह आगरकरांच्या निबंधांत ठिकठिकाणीं आढळतात.

आगरकर यांची वर्णनशैली इतकी बहारदार आहे, कीं वर्णनविषयीभूत गोष्टीचें मूर्तिमंत चित्रच मनश्चक्षूंपुढें उभें राहावें.

"ज्यांच्या अवयवांची पूर्ण वाढ झाली आहे; ज्यांच्या शरीराच्या प्रत्येक भागावर तारुण्याचें तेज चकाकत आहे; विषयवासना जागृत झाल्यामुळें उत्साहानें व उत्कंठेनें अननुभूत सुखास्वादाच्या अहर्निश चिंतनानें ज्यांच्या अंगव्यापारांत, दृष्टींत व चर्येंत लज्जा, अधीरता, साशंकपणा वगैरे परस्परविरोधी अनेक मनोविकार वारंवार प्रतिबिंबित होऊं लागले आहेत; एकमेकांस प्रिय होण्याविषयीं ज्यांचे हरएक प्रयत्न चालले आहेत; विद्या, वित्त, सौंदर्य वगैरे गुणांनीं आपणास होईल तितकें अलंकृत करून, अन्योन्यास मोह पाडण्याविषयीं जे अहोरात्र झटत आहेत; ज्यांना आपण रतिमन्मथाचे पुतळे आहों व विधात्यानें आपली विवाहमैत्री व्हावी, असें योजूनच आपणास निर्माण केलें...अन्योन्य समागम दुरावणारा प्रत्येक क्षण ज्यांस युगतुल्य झाला असून जे सूर्याच्या अश्वास मंदगतित्वाबद्दल निंदूं लागले आहेत व यामिनीस आपली समागमकारिणी मैत्रीण मानून तिच्या वाटेकडे जे डोळे लावून बसले आहेत; अशा स्त्रीपुरुषांच्या प्राथमिक रतिसुखाची बहार कोणीकडे? आणि पंतोजीच्या मार खाणाऱ्या व अभ्यासाखालीं अर्धमेल्या झालेल्या, दुर्बल भेकड आणि लुस्कान अशा आमच्या सोळा सतरा वर्षांच्या बहुतेक पोरांच्या आणि बावलाबावलीचा व भातुकुलीचा ज्यांचा खेळ नुकताच सुटला आहे, व नवरा म्हणून ज्याच्याशीं आपला एक प्रकारें विशेष संबंध झाला आहे, अशा आमच्या बारा तेरा वर्षांच्या निस्तेज, लाजाळू व अज्ञान

पोरींच्या बळजोरीच्या महालाची बहार कोणीकडे ?" आगरकरांनीं वर्णिलेलीं परस्परविरुद्ध अशीं हीं दोन दृश्यें किती हुबेहूब वठलीं आहेत !

आगरकरांची भाषा बरीच संस्कृतप्रचुर आहे. प्रचारांतील सोपे मराठी शब्द योजण्यापेक्षां तद्वाचक संस्कृत शब्द योजण्याकडेच त्यांचा विशेष कल दिसून येतो. व्यवच्छेदन, विजयलांछनें, हतपुंस्त्व, वैकल्य, कृष्णरेषा, संतानसमुदायासह, उपायन, सुखसंलाप, लौकिकाभिलाषी, सेवाचिकीर्षु, रुच्यंतर इत्यादि शब्दांवरून उपर्युक्त विधानाची सत्यता पटेल. मराठींत रूढ झालेल्या इंग्रजी शब्दांबद्दल देखील आगरकर यांनीं मुद्दाम तदर्थवाहक संस्कृतप्रचुर शब्द योजिले आहेत. 'सामाजिक संनिधान' ( Social organization ), 'मृताक्षर' ( Dead letter ), 'नष्ट नंदनवन' ( Paradise Lost ), बालकुक्कुटार्क, रक्तवर्धक व शक्तिवर्धक औषधें ( Tonics ), सार्ववास्तविक ( Universal ), क्षीरपथ ( Milky way ) बाष्परथ, मूकोत्सेध ( Tower of silence ) यांसारखे अनेक शब्द आगरकरांच्या निबंधांत पाहावयास सांपडतील. तथापि 'चर्चांत जाऊन प्रेअर करणें' यांसारखे धेडगुजरी शब्द देखील त्यांनीं क्वचित् ठिकाणीं वापरले आहेत. मिल्, स्पेन्सर वगैरे लेखकांच्या ग्रंथांधारें समाजशास्त्रावर लिहितांना आगरकर यांनीं 'वन्यावस्था', 'जातिप्रवाह', 'सत्ताधीनत्व', 'लोकाग्रणी' यांसारखे शब्द मराठींत रूढ केले. 'शिलावस्था', 'साक्षात् किंवा परंपरेनें' इत्यादि शब्द आगरकरांच्या विशेष आवडीचे असून त्यांचा उपयोग आपल्या निबंधांत त्यांनीं ठिकठिकाणीं केला आहे. 'स्वामी-सेवक', 'अग्रणी-अनुयायी', 'ग्राहक-विक्रेता', 'श्रेष्ठ-कनिष्ठ', 'जित-जेते', 'शास्ते-शासित' या व अशा प्रकारच्या शब्दांच्या जोड्या वापरणें हा आगरकरी भाषाशैलीचा आणखी एक विशेष आहे.

आगरकर यांनीं कित्येक सामाजिक विषयांचें प्रतिपादन इंग्रजी ग्रंथांच्या आधारें केलें असूनहि इंग्रजी पद्धतीची वाक्यरचना आगरकरांच्या निबंधांत कोठेंहि दिसून येत नाहीं. हा त्यांचा गुण आधुनिक सुशिक्षित लेखकांनीं उचलण्यासारखा आहे.

'वाचालमंद सुधारकांनो', 'विषय-लंपट निःशक्त वाचाळ बाबूंनो', 'हे भीषण, बीभत्स, अमंगळ हिंदुधर्मा', 'निर्दय वंचका', इत्यादि संबोधनसमूहानें युक्त अशीं वाक्यें लिहावयाला आगरकरांनीं सुरुवात केली म्हणजे प्रचंड श्रोतृसमुदायासमोर ते अस्खलितपणें आवेशयुक्त भाषणच करीत आहेत कीं काय, असा भास

होतो. आगरकर यांच्या प्रश्नार्थक वाक्यांची सरबत्ती सुरू झाली म्हणजे बाणभट्टाच्या तत्सदृश वाक्यपंक्तींची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं. बाणभट्टाप्रमाणेंच आगरकर यांच्या लेखनपद्धतींत प्रगल्भता व ओज हे गुण प्रकर्षानें आढळतात. फरक एवढाच, कीं बाणभट्टाप्रमाणें आगरकर यांनीं शृंगारादि रसांचा निव्वळ कलाविकासाच्या दृष्टीनें परिपोष करण्याकरितां आपली लेखणी झिजविली नाहीं. तर या गुणसमुच्चयाचा उपयोग केवळ रसिकरंजनार्थ न करतां लोककल्याणार्थ केला. पराकाष्ठेची कळकळ, जाज्वल्य देशाभिमान, विचारसरणींतील तर्कशुद्धता व ते मांडण्यांत निःसंदिग्धता व निःस्पृहपणा, लोकसेवेची खरी आवड, सत्यप्रीति, मनाचा दिलदारपणा, प्रतिपक्षाविषयींची उदार बुद्धि व अंतःकरणाचें पावित्र्य इत्यादि गुणसमुच्चयामुळें आगरकर यांचें लिखाण मराठी वाङ्मयांत चिरस्थायी होऊन बसलें आहे.

निबंधकार या दृष्टीनेंहि आगरकर यांना मराठी वाङ्मयांत स्वतंत्र व उच्च स्थान आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकरांप्रमाणेंच आगरकर यांनीं देखील निबंधलेखनद्वारें लोकजागृतीचें कार्य केलें. तथापि दोघांचे मार्ग भिन्न होते. विष्णुशास्त्री यांनीं स्वकीय-संस्कृतीचे पवाडे गाऊन लोकांच्या अंतःकरणांत स्वाभिमानाची ज्योत पेटविली व त्यांच्यांत आत्मविश्वास उत्पन्न केला. असें करतांना आपल्या प्राचीन परंपरेची व वैभवाची फाजील स्तुति व परकीय संस्कृतीची फाजील निंदा या तात्कालिक उपायांचा त्यांनीं अवलंब केला. विष्णुशास्त्री यांनीं लोकांच्या भावना उद्दीपित करून स्वदेश, स्वभाषा व स्वधर्म यांविषयीं जनतेंत अभिमान उत्पन्न केला; तर आगरकर यांनीं समाजाच्या बुद्धीस चालना देऊन त्यांस विचार करावयास लाविलें. आपली स्थिति लाजिरवाणी तर खरीच; तथापि त्याला कारण आपणच, हें सत्य आगरकर यांनीं दांभिक, दुरभिमानी व दुराग्रही समाजाच्या गळीं उतरविण्याचा प्रयत्न केला. सर्वसामान्य जनता ही निर्बुद्ध व भावनाप्रधान असल्यामुळें विष्णुशास्त्री यांना आपल्या मोहक वाणीनें त्यांच्या मनास भुरळ घालतां आली, व अशा रीतीनें लोकांचीं अंतःकरणें आपणाकडे ओढून घेऊन त्यांत स्वदेशाभिमानाची ज्योत पेटविणें त्यांस सुलभ गेलें. तथापि केवळ भावनाधिरूढ झालेला हा स्वाभिमान गवताच्या गंजीला लावलेल्या आगीहून जास्त प्रभावशाली व टिकाऊ होणें शक्य नव्हतें. तो प्रभावशाली व चिरस्थायी करण्याचें काम टिळक व आगरकर यांनीं आपल्या परीनें उत्तम केलें. विष्णुशास्त्री यांनीं

पेटविलेल्या स्वदेशाभिमानाच्या ज्योतीला टिळक व आगरकर यांनीं योग्य वेळीं इन्धन पुरविलें नसतें तर ती ज्योत किती वेळ जीव धरून राहिली असती हें सांगणें फार कठिण आहे.

लोकहित व लोकशिक्षण या मुख्यत्वेंकरून दोन उद्देशांनीं प्रेरित होऊन आगरकर यांनीं आपले बहुतेक निबंध लिहिले आहेत. निव्वळ कलाविलासाकरितां किंवा मनरंजनाकरितां त्यांनीं बहुधा कधींच लेखणी हातांत धरलेली नाहीं. पण असें असूनहि कलेच्या दृष्टीनें आगरकर यांचें वाङ्मय अत्यंत सरस उतरलें आहे. मुद्दाम कलाविलासाकरितां न लिहितांहि त्यांच्या निबंधांत कलाविलास प्रकर्षानें आढळतो. याचें कारण अगदीं उघड आहे; आणि तें म्हणजे आगरकर यांना स्वदेशाविषयीं वाटत असलेली पराकाष्ठेची कळकळ होय. आगरकर यांचा देशाभिमान आणि भाषाभिमान अस्सल व जाज्वल्य होता. आपल्या समाजाची खालावलेली स्थिति पाहून त्यांचें अंतःकरण खरोखर तुटत होतें. एरव्हीं त्यांच्या हातून इतकें उच्च दर्जाचें वाङ्मय निर्माण झालें नसतें. राष्ट्रहिताकरितां आगरकर यांचें अंतःकरण तळमळत होतें, म्हणून त्यांचें वाङ्मय इतकें हृदयस्पर्शी झालें आहे, आगरकरांच्या विद्वत्तेमुळें त्याला गांभीर्य प्राप्त झालें आहे व त्यांची सत्यनिष्ठा व तत्त्वनिष्ठा यांमुळें त्याला चिरस्थायीपणा आला आहे. आगरकर यांनीं समाजाच्या पाठीवर कोरडे ओढले खरे, परंतु त्यामुळें समाजाविषयीं त्यांना प्रेम व आपलेपणा वाटत नव्हता असें कोणी म्हणूं शकणार नाहीं. मनुष्यजातीच्या सत्प्रवृत्तीवर त्यांचा अढळ विश्वास होता. "सुधारकांचे प्रयत्न केवळ त्यांच्या सुखापुरते असते तर तुम्हांपासून वेगळें होण्यास तुमच्या ग्रामण्याची त्यांनीं वाटच पाहिली नसती. परंतु समाजसुधारणा ही त्यांस स्वतःचे सोयीहून अधिक महत्त्वाची वाटत असल्यामुळें तुम्हांस सोडल्यावर त्यांनीं सुधारणा करावी तरी कोणाची? तेव्हां होतां होईल तों तुमच्या शिव्याशाप व जुलूम यांस न भितां तुमच्या डोक्यांत प्रकाश पाडण्याचा ते प्रयत्न करतील; परंतु तुम्ही हट्ट करून त्यांस जातींतून काढूं लागल्यास ते वाटेल तें करतील पण तुमचा पिच्छा सोडणार नाहींत! तुम्ही त्यांचा कितीहि द्वेष करा, त्यांस कितीहि झिडकारा, पण फिरून ते तुम्हांस चिकटलेले आहेत असें तुमच्या दृष्टीस पडेल. त्यांची मगरमिठी ज्यास उकलतां येईल असें कोणतेंहि ग्रामण्य तुमच्याच्यानें बसवतां येणार नाहीं. त्यांच्या तुम्हांवरील भक्तीस पाहिजे तर विरोधभक्ति म्हणा; पण तिचें तुमच्यानें सत्त्वहरण होणार नाहीं आणि

सरतेशेवटीं आपल्या प्रभावानें ' मन सुधारकीं रंगलें अवघे जन सुधारक झाले ' असें करून टाकल्याशिवाय ती राहाणार नाहीं ! "

उपर्युक्त उद्गार काढणाऱ्या आगरकरांचा आशावाद खरोखरीच अलौकिक आहे ! या उद्गारांतच त्यांच्या जीविताचें रहस्य सांठविलेलें आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. अखिल मानव जातीच्या कल्याणार्थ आत्मार्पण करणाऱ्या येशू ख्रिस्तानें वधस्तंभावरून पुढील उद्गार काढले : " Oh Lord ! Forgive them, they know not what they are doing. " लोकहितार्थ आमरण झटणाऱ्या आगरकरांचा त्यांच्या बांधवांनीं जो छळ केला त्याच समाजाविषयीं आगरकरांचे हे आशावादित्वाचे उद्गार ऐकले म्हणजे येशू ख्रिस्ताच्या उपरिनिर्दिष्ट वाक्याची आठवण झाल्याखेरीज राहात नाहीं.

वि. ह. कुळकर्णी

**वाङ्मय :**

(१) केसरींतील निवडक निबंध—पहिलें पुस्तक; [ १८८६ पर्यंतच्या केसरींतील निबंध ]; १८८७, १९३७; आर्यभूषण छापखाना, पुणें.

(२) ,, दुसरें पुस्तक; [ १८८६ पर्यंतच्या केसरींतील निबंध ]; १८८८; आर्यभूषण छापखाना, पुणें.

(३) निवडक निबंध, भाग १ ला; [ सुधारकांत प्रसिद्ध झालेले, सामाजिक, धार्मिक व राजकीय विषयांवरील निवडक निबंध ]; १८९५; शिराळकर आणि कंपनी; पुणें.

(४) निबंधसंग्रह—भाग १ ला; १९१९; सुधारक छापखाना, पुणें.

(५) ,, भाग २ रा; १९१७; ,, ,,

(६) ,, भाग ३ रा; १९१८; ,, ,,

(७) विविधविषयसंग्रह—भाग १ ला; १८९१, आर्यविजय छापखाना, पुणें; १९२२, सुधारक छापखाना, पुणें.

(८) संपूर्ण आगरकर. निबंधसंग्रह—भाग पहिला; भाग दुसरा; संपादक, प्रो. माधव दामोदर अळतेकर; मुंबई.

(९) डोंगरीच्या तुरुंगांतील आमचे १०१ दिवस; १८८२, आर्यभूषण छापखाना, पुणें; दुसरी आवृत्ति, सुधारक छापखाना, पुणें.

(१०) वाक्यमीमांसा आणि वाक्यांचें पृथक्करण; आवृत्ति ३ री; सुधारक छापखाना, पुणें.

(११) विकारविलसित अथवा शेक्सपीअरकृत हॅम्लेट नाटकाचें भाषांतर; १८८३, आर्यभूषण, पुणें; १९०८, जगदीश्वर छापखाना, मुंबई; १९२०, अच्युत चिंतामण भट, यशवंत छापखाना, पुणें.

(१२) शेट माधवदास रघुनाथदास बाई धनकुवर बाई यांचें पुनर्विवाहचरित्र [सुधारकांतील]; १९०७; आर्यभूषण छापखाना, पुणें.

## चरित्र, चर्चा, अभ्यास :

(१) प्रि. गोपाळ गणेश आगरकर यांचें चरित्र; जगन्नाथ धोंडू भांगले; पुनाळेकर आणि मंडळी; मुंबई.

(२) प्रि. गोपाळ गणेश आगरकर यांचें चरित्र; १८९६; हरि बल्लाळ परचुरे; क्षीरसागर यांची उपयुक्त पुस्तकमाला, मुंबई.

(३) गोपाळ गणेश आगरकर—चरित्रात्मक निबंध; प्रो. माधव दामोदर अळतेकर; १९३०; कर्नाटक छापखाना, मुंबई.

(४) आगरकर चरित्र : व्यक्ति व कार्य; १९३२; वि. स. खांडेकर; गणेश महादेव आणि कंपनी, पुणें.

(५) आगरकर : व्यक्ति व वाङ्मय; वि. स. खांडेकर; देशमुख आणि कंपनी, पुणें.

(६) गोपाळ गणेश आगरकर; १९३५; पी. पी. गोखले, कऱ्हाड.

(७) 'मनोरंजन' आगरकर अंक; सं० का. र. मित्र; जुलै १९१६.

१. गोपाळ गणेश आगरकर, प्रो. मा. दा. अळतेकर.

२. प. वा. गोपाळ गणेश आगरकर; आठवणी; वि. मो. महाजनी.

३. आगरकरांची कामगिरी; श्री. म. वर्दे.

४. आगरकरांच्या कामगिरीचा महाराष्ट्रावर परिणाम; प्रो. गो. चिं. भाटे.

५. सामाजिक सुधारणा आणि आगरकर; दि. स. वर्दे.

६. स्त्रीशिक्षण आणि आगरकर; सरलाबाई नाईक.

७. विचारकलह आणि आगरकर; मथुराबाई द्रविड.

८. आगरकर : लेखक; रा. ग. प्रधान.

९. आगरकरांच्या स्वदस्तुरच्या पत्रांतील कांहीं उतारे; सी. गो. देवधर.

१०. आगरकर यांच्याविषयींच्या कांहीं आठवणी; प्रो. सी. गो. देवधर, रामचंद्र भिकाजी जोशी, गो. वा. कानिटकर.

११. आगरकरांच्या 'सुधारका'चें विशिष्ट कार्य; 'शारदाश्रमवासी'.

१२. आगरकरांचें ध्येय; प्रो. वसंत नारायण नाईक.

(८) आगरकरांच्या आठवणी [त्यांच्या पत्नीनें सांगितलेल्या]; 'स्त्री', मे ते सप्टेंबर १९३८.

(९) गोपाळ गणेश आगरकर; मृत्युलेख; नेटिव ओपिनियन, २३ जून १८९५.

(१०) आगरकरांची श्राद्धतिथि; बा. गं. टिळक; लो. टिळकांचे केसरींतील लेख, खण्ड चौथा, पृष्ठ ५३१–५३६.

(११) डेक्कन एज्युकेशन सोसायटींतील पांचवा मृत्यु; बा. गं. टिळक, लो. टिळकांचे केसरींतील लेख, खण्ड चौथा, पृष्ठ ५६५–६९.

(१२) गुरुवर्य आगरकरांचें कार्य; प्रो. गो. गो. टिपणीस; नवयुग, जुलै १९२१.

(१३) गोपाळ गणेश आगरकर; व. ना. नाईक, महाराष्ट्रसाहित्य, जुलै १९२१.

(१४) आगरकर यांची वाङ्मयात्मक कामगिरी; दत्तो वामन पोतदार, मनोरंजन, नोव्हेंबर १९२५.

(१५) आगरकरांच्या निबंधलेखनांतील कांहीं विशेष; वि. बा. आंबेकर; रत्नाकर, नोव्हेंबर–डिसेंबर १९३०.

(१६) सामाजिक सुधारणा व आगरकर; चर्चा; शं. ग. दवणे, रत्नाकर, फेब्रुवारी १९३१.

(१७) चिपळूणकर व आगरकर; प्रो. ना. सी. फडके; फडके यांचीं गाजलेलीं भाषणें, पृ. १०५–१८.

(१८) सॉक्रेटीस आणि आगरकर; पु. पां. गोखले; कऱ्हाड.

(१९) आगरकरांनीं आम्हांला काय दिलें ? प्रभाकर पाध्ये; तीन तपस्वी; स्कूल ॲण्ड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर.

(२०) कै. आगरकर : बुद्धिवादाचे संत व साक्षात्कारी; आचार्य स. ज. भागवत; सत्यकथा, जुलै १९४५.
(२१) आगरकरांचें मुख्य वैभव; श्री. म. माटे; सत्यकथा, जून १९४५.
(२२) आगरकरांची तत्त्वत्रयी; शं. द. जावडेकर; सत्यकथा, जून १९४५.
(२३) आगरकरांचा आंधळा बुद्धिवाद; वि. वि. दीक्षित; रोहिणी मासिक, फेब्रुवारी १९५०.
(२४) विकारविलसित; परीक्षण; विविधज्ञानविस्तार, २,३,४,५; १८८४.
(२५) विकारविलसित; परीक्षण; ह. ना. आपटे; निबंधचंद्रिका, अंक १३.

**आगाशे, गणेश कृष्ण** [१८६४–१९२७] ज्ञानेश्वरीटीकाकार; नाट्यमर्मज्ञ व निबंधलेखक. यांचा जन्म कोल्हापुरास झाला. यांचे वडील कोल्हापूर संस्थानांत मामलेदार होते. यांचें शिक्षण कोल्हापूर व पुणें येथें झालें. बी. ए. झाल्यावर कांहीं वर्षे कोल्हापूर येथील 'प्रायव्हेट हायस्कूल' मध्यें यांनीं शिक्षकाचें काम केलें. पुढें एल्‌एल्. बी. झाल्यावर मिरजेस मुन्सफ म्हणून यांची नेमणूक (१८९७) झाली. एक वर्षाच्या मुन्सफीनंतर त्यांस संस्थानचे दिवाण नेमण्यांत आलें. एक निःस्पृह, प्रामाणिक व राष्ट्रीय वृत्तीचा विद्वान् अधिकारी म्हणून त्यांचा लौकिक होता.

विष्णु गोविंद विजापुरकर यांच्या 'ग्रंथमाला' व 'विश्ववृत्त' या नियतकालिकांकडून प्रोत्साहन मिळाल्यामुळें चालू शतकाच्या प्रारंभीं जे कांहीं व्यासंगी लेखक पुढें आले त्यांपैकीं गणेशपंत आगाशे हे एक होत.

श्रीमद्‌भगवद्गीता व ज्ञानेश्वरी यांवरील त्यांचा व्यासंग दांडगा होता. या त्यांच्या व्यासंगाचें पक्व फळ म्हणजे 'ज्ञानेश्वरी टीका' हा त्यांचा प्रचंड ग्रंथ होय. सन १९२४–१९३३ या काळांत ही सहा भागांत प्रसिद्ध झालेली आहे.[१] ज्ञानेश्वरीची संहिता व तिजवरील टीका पांच भागांत प्रसिद्ध झाली असून, सहावा भाग उपसंहाराचा आहे. यांतील तीन भाग ग्रंथकर्त्याच्या हयातींत व तीन भाग तदनंतर प्रसिद्ध झाले. ज्ञानेश्वरीच्या मराटींत जेवढ्या म्हणून सटीक प्रती प्रसिद्ध झालेल्या आहेत, त्या सर्वांत ही प्रत वेगळ्या प्रकारची व वैशिष्ट्यपूर्ण अशी आहे. कोणतीहि

१ या सहाहि भागांचें एकत्र बांधीव पुस्तक आतां मिळूं शकतें.

परंपरा किंवा संप्रदाय यांचें अनुयायित्व न स्वीकारतां चिकित्सापूर्वक यांत टीपा दिल्या आहेत. "प्रत्येक ओवींतील बिकट शब्दांचे अर्थ त्यांत दिले आहेत. इतकेंच नव्हे, तर हे अर्थच अधिक योग्य कां हेंहि सांगितलें आहे. प्रयोजन सांगितलें आहे. समानार्थक मागील पुढील संदर्भ काढून दिले आहेत. पाठांतराची चिकित्सा केली आहे. शिवाय इंग्रजी, मराठी व संस्कृत वाङ्मयांतील म्हणी, वाक्प्रचार, अवतरणें हींहि कोठें कोठें देऊन अर्थावर बाहेरचा प्रकाश पाडला आहे. त्यामुळें पुष्कळ ठिकाणीं सांप्रदायिक अर्थाहून आगाशे यांचा अर्थ भिन्न पडला असला तरी तो ग्राह्य वाटतो. पण 'सर्वत्र आमचाच अर्थ बरोबर' अशी आगाशे यांची प्रतिज्ञा नाहीं......आगाशे यांच्या आवृत्तींतील दुसऱ्याहि एका अंगाचा उल्लेख केला पाहिजे. तें अंग म्हणजे उपसंहार होय. अशा तऱ्हेचा उपसंहार कोणत्याहि सांप्रदायिक आवृत्तींत केलेला नाहीं." या उपसंहारांत "ज्ञानेश्वरकालीन धार्मिक, सामाजिक व राजकीय परिस्थितीचें विवेचन करून, ज्ञानेश्वरीच्या अध्ययनाची नवीन व स्वतंत्र दृष्टि त्यांनीं दाखविली आहे." पार्श्वभूमि म्हणून ज्ञानेश्वरपूर्व-कालीन आध्यात्मिक विचारपरंपरांचाहि आरंभीं थोडक्यांत निर्देश केला आहे. कोणत्याहि पूर्वग्रहापासून अलिप्त राहून ज्ञानेश्वरीचें अंतरंग समजून घेऊं इच्छिणाऱ्यास, मग तो अध्यात्ममार्गांतील साधक असो वा काव्याचा भोक्ता साहित्यिक असो, आगाशे यांनीं संपादिलेली ही प्रत केव्हांहि साहाय्यक व उद्बोधकच होईल."

अध्यात्माखेरीज नाट्य, संगीत, शिक्षण, इतिहास या विषयांचीहि त्यांस आवड होती. मिरजेचे प्रसिद्ध इतिहाससंशोधक, नाटककार व कवि वासुदेवशास्त्री खरे यांच्या सहवासांत त्यांस यांचा भरपूर आस्वाद घ्यावयास मिळे. त्यांच्या बैठकींत या व अनेक विषयांचा परामर्श घेतला जाई. भागवताच्या एकादश स्कंधाची आगाशे यांना विशेष गोडी असे. खरेशास्त्र्यांबरोबर त्यानीं त्यांचीं कित्येक पारायणें केलीं. त्यांच्याबरोबरच त्यांनीं 'शांकरभाष्य'हि वाचलें होतें.

मिरजेचें सरकारी नाटकगृह फार चांगलें बांधलेलें असल्यामुळें बहुतेक प्रसिद्ध नाटकमंडळ्या मिरजेस येत. त्या निमित्तानें भाऊराव कोल्हटकर, बालगंधर्व, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, गडकरी यांसारख्या मंडळीचें मिरजेस आगमन होऊन खरेशास्त्री

१ ज्ञानेश्वरी सर्वस्व, न. चिं. केळकर, पृ. २३७–३८.

२ उपसंहार–प्रस्तावना, वि. स. बखले.

यांजकडे त्यांच्या बैठका व्हावयाच्या. या बैठकांस आगाशे उपस्थित असावयाचे आणि मग नाट्य, काव्य, विनोद, संगीत यांत तासन् तास निघून जावयाचे. खरे-शास्त्री हे १९२४ सालीं वारले. त्यांच्या स्मारकाची योजना आगाशे यांनीं आंखली व स्वतः हिंडून स्मारकासाठीं निधि गोळा केला. मिरजेचें 'खरे-मंदिर' हें त्यांच्या कल्पकतेचें व श्रमाचें फळ होय.

आगाशे यांचे बरेच लेख 'ग्रंथमाला', 'विश्ववृत्त' व 'चित्रमयजगत्' यांत प्रसिद्ध झालेले आहेत. 'रंगभूमि' मासिकांतून त्यांनीं कोल्हटकरांचें 'मतिविकार' व खाडिलकरांचें 'विद्याहरण' या नाटकांवर केलेली विस्तृत टीका त्या काळीं फार गाजली होती.

आगाशे हे आजन्म ज्ञानोपासक होते. अनेक विषयांचें त्यांचें वाचन चाले, टांचणें-टिप्पणें लिहून ठेविलीं जात. 'ज्ञानेश्वरी'प्रमाणेंच तुकारामाचे अभंगहि संपादण्याचें काम त्यांनीं सुरू केलें होतें. परंतु त्यांच्या मृत्यूमुळें तें काम तसेंच अर्धवट राहिलें.

**वाङ्मय :**

(१) पाश्चात्य राष्ट्रांची सामाजिक उत्क्रांति, [Benjamin Kiddकृत 'Social Evolution' चे आधारें]; 'ग्रंथमालें'तून प्रसिद्ध; १९०१; कोल्हापूर.

(२) कीटकसृष्टि, [किड्यांची शास्त्रीय माहिती; इंग्रजी ग्रंथांच्या आधारें]; 'ग्रंथमालें'तून प्रसिद्ध; १९००; कोल्हापूर.

(३) संगीत मतिविकार व संगीत विद्याहरण या नाटकांवरील टीकात्मक लेख, 'रंगभूमि' मासिकांतून प्रसिद्ध (१९१४), पुणें.

(४) श्री ज्ञानेश्वरी टीका; १९३३; प्रकाशक : आगाशे, टिळक आणि मंडळी, मिरज.

**आगाशे, गणेश जनार्दन** [१८५२-१९१९] कवि. जन्म पुणें येथें झाला. ह्यांचें प्राथमिक शिक्षण आळंदी व सासवड येथें व इंग्रजी शिक्षण पुण्यांत झालें. बुद्धिवान् विद्यार्थी म्हणून त्यांची ख्याति होती. पहिल्या इयत्तेपासून तों बी. ए. होईपर्यंत सर्व परीक्षांतील बक्षिसें व शिष्यवृत्त्या यांनीं पटकाविल्या होत्या. मॅट्रिकच्या

परीक्षेंत पहिली जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति व बी. ए. च्या परीक्षेंत चारशें रुपयांची भगवानदास पुरुषोत्तमदास संस्कृत शिष्यवृत्ति ह्या त्यांनीं मिळविल्या. यांचें बरेंचसें आयुष्य शिक्षणखात्यांत नोकरी करण्यांत गेलें. हायस्कुलाच्या मुख्य अध्यापकापासून तों गव्हर्न्मेंट सेंट्रल बुकडेपोच्या क्युरेटरच्या जागेपर्यंत हे चढत गेले. पेन्शन घेतल्या-वर कांहीं दिवस यांची डेक्कन कॉलेजांतील इंग्लिश भाषेच्या अध्यापकाच्या जागीं नेमणूक झाली होती. यांचें इंग्लिश, संस्कृत व मराठी या भाषांवरील प्रभुत्व वाखाणण्याजोगें असून त्यांतील वाङ्मयाचा त्यांनीं कसोशीनें अभ्यास केला होता. ‘सुंदरेची संक्रांत’, ‘सद्गुणमंजरी’, ‘बालशिक्षण’, ‘अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें,’ ‘राज्यारोहण’, ‘बिरुदावलि’, ‘बाष्पांजलि’ हीं त्यांचीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. मराठी वाङ्मयांत प्राचीनांचा अभिमानी असा पंडित कवि म्हणून त्यांची गणना केली जाते.

आगाशे यांच्या कवितेपैकीं ‘बिरुदावलि’ व ‘बाष्पांजलि’ हीं दोन शोककाव्यें उत्तमांत गणलीं जातात. या काव्यांविषयीं व त्यांच्या इतर कवितेविषयीं आपल्या ‘विलापिका’ नांवाच्या चर्चात्मक पुस्तकांत ग. त्र्य. माडखोलकर म्हणतात : “लेंभे किंवा टिळक यांच्या शोककाव्यांच्याइतकी जरी आगाशे यांची वैलापिक रचना सरस नसली, तरी निव्वळ संख्येच्या बाबतींत ते या दोन कवींनाच काय, पण शोककवि मोगरे यांनाहि मागें टाकतील अशी भीति वाटते. त्यांच्या तीन खण्डकाव्यांपैकीं ‘बिरुदावलि’ व ‘बाष्पांजलि’ हीं दोन काव्यें वैलापिक असून शिवाय ‘तीन हरिभाऊ’, ‘एडवर्ड बादशहा’, ‘गो. कृ. गोखले’, ‘यंदांचा हिंवाळा’ इत्यादि कविताहि शोकपर आहेत. निव्वळ पद्यसंख्याच लक्षांत घेतली, तर त्यांच्यापुढें मोगरे यांचा टिकाव लागणें कठीण आहे. त्यांना धीटपाट,—त्या शब्दाच्या चांगल्या अर्थानें,—कवि म्हणतां येईल. मोगरे यांच्या वाणींतील सुगमता किंवा लेंभे व टिळक यांच्या वाणींतील सहजरम्यता त्यांच्या वाणींत नाहीं. जुन्या पिढींतील नामांकित पंडितांत त्यांची गणना होत असे. आणि प्रतिभा किंवा प्रसाद यांच्यापेक्षां पंडितगिरीचाच प्रकर्ष यांच्या काव्यांत अधिक दृष्टीस पडतो. त्यांनीं वर्णिलेली निसर्गसिद्ध कविताशक्ति त्यांच्या ठिकाणीं होती, असें म्हणवत नाहीं. त्यांच्या ‘कृश’ कवित्वाला विद्वत्तेमुळें काय डौल आला असेल तेवढाच. शोककाव्य-रचनेच्या बाबतींत मोगरे यांच्याइतकी त्यांची प्रवृत्ति निरपेक्ष नव्हती. ज्या व्यक्तीशीं त्यांचा निकट संबंध आला किंवा ज्यांच्यावर त्यांची निरतिशय भक्ति होती, अशाच व्यक्तींवर त्यांनीं शोकपर काव्यें लिहिलेलीं आढळतात. ‘बिरुदावलि’ हें शोककाव्य

त्यांनीं आपले गुरु, आधुनिक महाराष्ट्राचे जनक रावसाहेब रानडे यांच्यावर, तर ' बाष्पांजलि ' ही विलापिका बी. ए. च्या वर्गांत असतांना मरण पावलेला आपला अत्यंत बुद्धिमान् पुत्र राजाराम याच्यावर लिहिली आहे. त्यांनीं कवीला अवश्य म्हणून सांगितलेल्या ज्ञान आणि दृढानुरक्ति या दोनहि गुणांचा मिलाफ त्यांच्या या शोककाव्यांत झालेला दिसतो. ' बिरुदावली 'पेक्षां ' बाष्पांजली 'तील शोकाचा उमाळा साहजिकच अधिक उत्कट आहे. ' उपनिषदें ', ' भगवद्गीता ', ' अजविलाप ' व ' इन् मेमोरियम् ' यांत आत्म्याच्या मरणोत्तर गतीविषयीं आलेल्या कल्पनांचा उपयोग केल्यामुळें, ' बाष्पांजलीं 'त करुण-शांताचा मोटा सुरेख संगम झाला आहे. करुण रस उत्कट असला, तरी अगदीं शीग सांडून जाणारें उधान नव्हे. आणि शांत-रसाचा परिपोषहि, पूर्वसूरींच्या उज्ज्वल विचारांचें स्मरण मनाला देईल, इतक्या बेताचा. त्यामुळें या काव्यांत विकाराचे आवर्त नाहींत किंवा विचाराचे विवर्तहि नाहींत. तीरावरील तरुलतांना आपल्या तुषारांनीं भिजवीत स्वैरगतीनें धांवणाऱ्या ओढ्याची आठवण ' बापाचे अश्रु ' देतात, तर दुतर्फा बांधून काढलेल्या पात्रांतून संथपणानें मार्ग क्रमणाऱ्या राजधानींतील नदीसारखी ' बाष्पांजली ' ची अवस्था आहे. "

कवितांचे व्यतिरिक्त आगाशे यांचे भिन्न भिन्न विषयांवरील बरेच लेख ' विविध-ज्ञानविस्तारा'दि मासिकांत प्रसिद्ध झालेले आहेत.

इंदूर येथें १९१७ सालीं भरलेल्या साहित्य-संमेलनाचे हे अध्यक्ष होते.

**वाङ्मय :**

(१) अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें, [मिसेस फॉसिटकृत इंग्रजी ग्रंथाधारें]; १८९१, निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(२) बालशिक्षण [फ्रोबेलेच्या इंग्रजी ग्रंथाधारें]; १८९२; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

(३) महाराष्ट्र वाङ्मय, निबंध; १९०३; इंदुप्रकाश, मुंबई.

(४) महाराष्ट्र वाङ्मयाचें पर्यालोचन; निबंध; १९०९; इंदुप्रकाश, मुंबई.

(५) सुंदरेची संक्रांत; १८९२; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

(६) शुक्रग्रस्त विचित्र सूर्यग्रहण; [चिंतामणि आचार्यकृत मूळ संस्कृत व मराठी भाषांतर]; ज्ञानप्रकाश छापखाना, पुणें.

(७) बिरुदावलि; काव्य; १९०१; आपटे छापखाना, धुळें.
(८) राज्यारोहण; पद्य; १९१२; निर्णयसागर छापखाना, मुंबई.
(९) बाष्पांजलि; काव्य; १९१६; लक्ष्मीनारायण छापखाना, मुंबई.

## चरित्र, चर्चा, अभ्यास

(१) अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें; परीक्षण; विविधज्ञानविस्तार, मे, १८९२.
(२) बाष्पांजलि, परीक्षण, लक्ष्मणशास्त्री लेले, विविधज्ञानविस्तार, पुस्तक ४८, अंक २, १९१७.
(३) ,, ; परीक्षण; 'एक रसज्ञ विद्वान्'; नवयुग, ऑगस्ट १९१७.
(४) ,, ; समालोचन; प्रो. रा. श्री. जोग; अर्वाचीन मराठी काव्य; पृ. १२३–१२५.
(५) चरित्र; वि. मो. महाजनी; विविधज्ञानविस्तार, पुस्तक ५०, अंक ९, १९१९.

**आचरेकर, गंगाधर भिकाजी** [ १८८५–१९३९ ] संगीतज्ञ व तंतुवाद्यविशारद. रत्नागिरी जिल्ह्यांतील आचरें या गांवीं यांचा जन्म झाला. मराठी सहा-सात इयत्तांपर्यंत शिक्षण झाल्यावर यांच्या वडिलांनीं यांना गायनाचें शिक्षण देण्याचें ठरवून त्याकरितां सुप्रसिद्ध बापटबुवा यांस शिक्षक नेमलें. बापटबुवा हे जुन्या पिढींतील एक थोर दर्जाचे गवई बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर यांचे सहाध्यायी होते.

आचरेकर हे प्रथम राजकोट येथील राजकुमार कॉलेजांत (१९१०) व नंतर पुणें येथील ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन या संस्थेंत (१९१०–१९३८) संगीत विषयाचे शिक्षक होते. एक अव्वल दर्जाचा संगीतज्ञ व बीनकार म्हणून यांचा लौकिक होता. इंग्रजी किंवा संस्कृत या भाषांचें ज्ञान नसतांहि ध्वनिशास्त्र व रत्नाकरांतील श्रुतिग्राममूर्च्छना बुद्धिमत्तेनें ग्रहण करून त्यांनीं चतुःसारणा गणितसिद्ध केल्या आहेत. फॉक्स स्ट्रँग्वे या पाश्चात्य पंडिताला इकडील प्राचीन ग्रंथांतील श्रुतिविषय समजावून घेण्यास यांच्याशिवाय दुसरा तज्ज्ञ मिळाला नाहीं. हा विषय समजावून घेतल्यानंतर त्यानें आपल्या 'म्युझिक ऑफ हिंदुस्थान' या ग्रंथांत यांचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. यांचा संगीतावरील गाढ शास्त्रीय

व्यासंग त्यांनीं ' भारतीय संगीत ' या पुणें येथें निघणाऱ्या त्रैमासिकांत लिहिलेल्या लेखांत व संगीतविषयक ग्रंथांत उत्तम रीतीनें प्रतीत होतो. यांनीं बाजाच्या पेटींत सुधारणा करून कोणत्याहि स्वरापासून आपल्या संगीतांतील नैसर्गिक स्वरसप्तक सिद्ध करण्याची अजब युक्ति योजली आणि अनैसर्गिक स्वरान्तराचा बाजाच्या पेटीवरील कलंक आपल्या अचाट कल्पनेनें काढून टाकला. [ आधार : ' भारतवर्षीय अर्वाचीन चरित्रकोश. ]

**वाङ्मय :**

(१) शालेय संगीतपद्धति–पुष्पें ७ एकत्र; [ रागतालासह स्वरमाला ] १९२६; श्रीगणेश प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(२) शालोपयोगी प्रार्थनागीतमाला; १९३१; श्रीगणेश प्रिं. प्रेस, पुणें.

(३) शास्त्रीय संगीत रागपद्धति—द्वितीय गुच्छ—मत्सरीकृत मूर्च्छना (प्रचलित केदार थाट)—रागलक्षण गीतावलि, १९३३; श्रीगणेश प्रिं. प्रेस, पुणें.

## आचार्य ( कालगांवकर ), कृष्णाजी विष्णु [ १८५७–१९१९ ]

इतिहास-संशोधक. यांचा जन्म सातारा जिल्ह्यांतील कालगांव या गांवीं झाला. हे शालाखात्यांत मराठी शिक्षक होते. साने, खरे वगैरे थोर संशोधकांच्या सान्निध्यांत यांस संशोधनाची गोडी लागली. जुन्या कागदपत्रांचा तपास व संग्रह करून, तद्विषयक व इतर ऐतिहासिक माहितीचे अनेक लेख, त्यांनीं पुणें येथील ' भारत-इतिहास-संशोधक मंडळ ' या संस्थेच्या नियतकालिकांतून व इतर मासिक पुस्तकांतून प्रसिद्ध केले. पारसनीस यांच्या ' भारतवर्ष ' व ' इतिहाससंग्रह ' या दोन्ही मासिकांतून ' जुन्या ऐतिहासिक गोष्टी ' या सदराखालीं त्यांचे बरेच लेख गोष्टीरूपानें प्रसिद्ध झाले आहेत. त्याशिवाय ' काव्येतिहाससंग्रह ', ' विविधज्ञानविस्तार ', ' शाला-पत्रक ' यांतहि त्यांचे लेख प्रसिद्ध झाले आहेत.

**वाङ्मय :**

जुन्या ऐतिहासिक गोष्टी, १९००, सातारा; द्वि. आ., पुणें

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

(१) माझ्या इतिहास-संशोधनाची अव्वल अखेर हकीकत व तदंतर्गत आत्मचरित्र; विविधज्ञानविस्तार, सप्टेंबर १९१९.

(२) कृ. वि. आचार्य यांच्या आत्मचरित्राची पूरणिका, गो. प्र. जांबळे; विविधज्ञानविस्तार, सप्टेंबर १९१९.

**आठल्ये, कृष्णाजी नारायण** [१८५२–१९२७] कवि व निबंधकार. सातारा जिल्ह्यांतील कऱ्हाड तालुक्यांतील टेंभू या गांवीं यांचा जन्म झाला. यांचे वडील दशग्रंथी ब्राह्मण असून, ब्रह्मावर्तास शेवटचे बाजीराव पेशवे यांचेपाशीं वामनराव म्हणून एक वैद्य असत त्यांचे आश्रयास पुष्कळ वर्षे होते. वयाच्या बाराव्या वर्षापर्यंत कृष्णाजीपंतांचें घरींच शिक्षण झालें. यांचे वडिलांनीं यांजकडून संहिता, शिक्षा, ज्योतिष, छंद, निघंट, पूजा, वैश्वदेव, सौर, रुद्र यांचा अभ्यास करून घेतला होता. या वयापर्यंत यांस मोडी लिहितां किंवा वाचतां येत नसे. तेराव्या वर्षी यांचें लग्न झालें. सासुरवाडी थोरामोठ्यांची होती. जांवईबुवांनीं इंग्रजी शिकावें अशी श्वशुरांची इच्छा असल्यामुळें त्यांनीं त्यांस कोल्हापुरास नेण्याची खटपट चालविली. परंतु वडील परवानगी देईनात. पुढें त्यांच्या बंधूंनीं त्यांस १८६६ त कऱ्हाडास शाळेंत घातलें. या ठिकाणीं त्यांचें मराठी पांच-सहा बुकें व थोडेंसें इंग्रजी शिक्षण झालें. इंग्रजी शाळेंत असतां प्रि. गोपाळराव आगरकर त्यांचे वर्गबंधु होते. पुरेसा आश्रय न मिळाल्यामुळें कृष्णाजीपंतांस कऱ्हाड सोडून पुण्याचा मार्ग धरावा लागला. तेथील ट्रेनिंग कॉलेजांत राहून, माधुकरी मागून त्यांनीं मराठी अभ्यास पुरा केला व सातारा जिल्ह्यांत शिक्षकाची नोकरी पत्करली. ही नोकरी त्यांनीं पांच वर्षे केली.

साताऱ्यांत असतां, तेथील त्यावेळचे एक सबजज्ज रावबहादुर चिंतामणराव भट यांच्याशीं त्यांचा परिचय घडून येऊन, त्यांजवर लोभ जडला. कृष्णाजीपंतांस लहानपणापासून चित्रकलेचा फार नाद असे. हा त्यांचा नाद पाहून भट यांनीं चित्रकलेचें शास्त्रशुद्ध ज्ञान संपादण्याकडे त्यांचें मन वळविलें व त्यांस मुंबईस जे. जे. स्कूल ऑफ आर्टमध्यें राहण्यास उत्तेजन दिलें. त्यांच्या इच्छेप्रमाणें कृष्णाजीपंतांनीं आपल्या जागेचा राजिनामा दिला व मुंबईस येऊन आर्टस्कूलमध्यें नांव नोंदलें. आर्टस्कूलमध्यें हे जवळ जवळ तीन वर्षे राहिले व तैलचित्रकलेचें ज्ञान त्यांनीं

पूर्णपणें अवगत करून घेतलें. मध्यंतरीं साताऱ्च्या आबासाहेब महाराजांनीं यांस आपल्याजवळ ठेवून घेऊन आपली एक मोठी तसबीर त्यांचेकडून काढून घेतली. आर्टस्कूलमधील अभ्यास पुरा झाल्यावर ते बडोद्यास गेले. तेथील हायस्कुलांत त्यांचें ' रंगकले ' वर एक व्याख्यान झालें. तें व्याख्यान त्या वेळचे बडोद्याचे दिवाण सर टी. माधवराव यांस इतकें आवडलें कीं, त्यांनीं त्यांस दरमहा शंभर रुपये पगारावर आपल्याकडे ठेवून घेतलें. माधवराव चित्रकलेचे फार मोठे चहाते असत; त्यांनीं त्यांस आपल्या बैटकीच्या खोलीशेजारील एक खोली काम करावयास दिली होती. या ठिकाणीं त्यांनीं जम्नाबाईसाहेब गायकवाड, ताराबाबा सावंतवाडीकर, रघुनाथराव भोंसले सावंतवाडीकर, डॉ. भालचंद्र, रावबहादुर कीर्तने यांच्या तसबिरी चितारल्या. पुढें राजे सर टी. माधवराव दिवाणगिरीचें काम सोडून मद्रासेस गेले. अर्थातच कृष्णाजीपंतांसहि त्यांचेबरोबर तिकडे जाणें भाग पडलें. कृष्णाजीपंतांचे बंधु त्या वेळीं मलबारांत कोचीस असत. ते आजारी पडल्यामुळें मद्रास सोडून त्यांस कोचीस जावें लागलें. याच ठिकाणीं ते जवळ जवळ वीस वर्षें राहिले. तेथील व्हॉलकॉर्ट ब्रदर्स या कंपनींत क्लैन नांवाचे एक मुख्य अधिकारी होते त्यांनीं यांस हिंदुस्थानी भाषाशिक्षक म्हणून आपल्याकडे ठेवून घेतलें.

कोचींत थोडेंसें स्थैर्य प्राप्त होतांच वाचनलेखनाकडे यांनीं आपलें लक्ष वळविलें. श्रीमद्भगवद्गीतेवर नानावृत्तात्मक श्लोकांचें रचिलेलें 'गीतापद्य–मुक्ताहार' हें यांचें पहिलें पुस्तक येथेंच तयार झालें. या पुस्तकाबद्दल निर्णयसागर छापखान्याच्या मालकांनीं त्यांच्या हातांत १२ तोळ्यांचें सोन्याचें कडें घालून सन्मान केला. याच वेळीं त्यांस श्रृंगेरी मटाचे जगद्गुरु शंकराचार्य ह्यांच्याकडून 'महाराष्ट्र-भाषाचित्र-मयूर' ही पदवी अर्पण करण्यांत आली. यानंतर ज्याच्यायोगें त्यांचें नांव महाराष्ट्रभर झालें, तें ' केरळ कोकिळ ' मासिक त्यांनीं संपादण्यास सुरुवात केली. हें मासिक प्रथम पांच वर्षें कोचीस निघत असे, नंतर तें मुंबईस गुर्जर कंपनीकडून प्रसिद्ध केलें जाऊं लागलें. या मासिकाचे भर अमदानींत त्याचे तीन हजारांवर वर्गणीदार होते. महाराष्ट्रांत सामान्य जनांत बहुविध वाचनाची गोडी जर कोणीं प्रथम उत्पन्न केली असेल तर ती कृष्णाजीपंतांच्या ' केरळ कोकिळ ' मासिकानेंच होय. यांत विविध विषयांवर लेख येत. यांतील कविता, पुस्तकपरीक्षणें, ' लोकोत्तर चमत्कार ' यांवर वाचकांच्या अधिक उड्या पडत.

"यांची भाषाशैली चटकदार, कविता टापटिपीची व व्याकरणशुद्ध, आणि विषययोजना बहुविध व चमत्कृतिमय; तथापि त्यांच्या समालोचनपद्धतीबद्दल मतभेद असून ती अनेक वेळां अवास्तव कडक, दंशपूर्ण आणि वैयक्तिक, छद्मी, थोडक्यांत विघटनात्मक होती, असा पुष्कळांचा आशय आहे. 'कलमबहादुरांस शेलापागोटें' देण्याचा त्यांचा उपक्रम सद‌भिरुचीस विरुद्ध असून त्यांत शारदोपासकांची थट्टा असे. दरबाराचा आव घालणारे हे 'पंच' स्वतः अश्लीलपणाच्या थडीवर घसरतांना कित्येकदां वाचकांनीं पाहिले असतील. अशांनीं कलमांच्या अणीवर व शाईच्या गहिरेपणावर भिस्त ठेवून भालाईती गाजविणें असमंजसपणाचें होतें. परंतु हा प्रत्याघात धाकट्या चिपळोणकरांच्या टीकापद्धतीचा अतिरेक झाल्यामुळें अवश्यप्राप्त होता; आणि तो केव्हां तरी आलाच असता. तथापि त्यांची चलती अल्पकाळ राहिल्यामुळें वाङ्मयाच्या प्रागतिक ओघास विशेष अपाय झाला नाहीं. इंग्लंडांत देखील सुरुवातीला पांचपन्नास वर्षे अशा प्रकारची टीकापद्धति मान्य झाली होती. जेफ्रे, सिडने स्मिथ, मेकॉले हे याच पद्धतीचे पुरस्कर्ते व प्रवर्तक होते. आणि त्यांचें पोतेरें खाल्लें नाहीं असा लेखक त्यावेळीं विरळ आढळे. एखाद्यानें ग्रंथ तयार करून छापला कीं, तो चव्हाट्यावर आला असें समजून, त्याच्या उणेपणाची तपासणी भर चावडीवर करून, त्याचे असते नसते दोष वेशीवर टांगावयाचे, ही त्या वेळची रीत होती. विधायक टीका, घटनात्मक चर्चा व रसिकावलोकन हे समालोचनपद्धतीचे भाग पुढें फ्रेंच नमुन्यावरून मॅथ्यू अर्नाल्डनें इंग्लंडांत प्रचलित केले. अर्थात् शास्त्रीबुवांच्या वेळेस हे (जेफ्रे, मेकॉले वगैरेंचे) नमुने लोकहितवादी, रानडे, दयानंद सरस्वती, प्रार्थनासमाजवाले इत्यादिकांच्या उपहासासाठीं कदाचित् गिरविण्यासारखे असतील, म्हणून त्यांचा फायदा त्यांनीं चाणाक्षपणानें घेतला. परंतु ही अस्त्रें परत कशीं आणावीं हें जाणणाऱ्यांनींच काल, प्रसंग व माणूस ओळखून अमलांत आणावी लागते. 'केरळ कोकिळ' चीं जुनीं पुस्तकें चाळल्यास आमच्या म्हणण्यास पोषक असें त्यांत पुष्कळ सांपडेल. टीकात्मक लेख वाङ्मयाच्या व्यवसायास उन्नतपणा व जबाबदारी आणतात; पण ती टीका नेहमीं न्याय्य असावी. निःस्पृहपणा हा गुण आहे, पण त्याची पडसांवली फटकळपणावर पडत असल्यामुळें न्यायीपणाचें परिवर्तन अनेक वेळां निष्ठुरपणांत होतें. म्हणून तें न होण्याची खबरदारी बाळगली नाहीं, तर मुक्तेश्वरानें वर्णिलेली अवगुणाची एकच माशी या रसानुभूतीच्या भोजनांत माती कालवून अरुचि आणण्यास पुरेशी

होते. असा प्रकार कोकिळकारांच्या पुष्कळ टीकाविषयक लेखांत आढळतो; परंतु अशी विघातक टीका ग्रंथकारांस उत्साहकारक होतच नाहीं, पण वाचकांस मात्र ती गारठवून सोडते, हें पुष्कळांस उमजतच नाहीं[1]! ''

कृष्णाजीपंतांचें लिहिणें हृद्य आणि आकर्षक असें आहे. त्यांची भाषा बरीचशी संस्कृतप्रचुर असली तरी त्यांतील लालित्यामुळें ती वाचकांच्या हृदयास भुलावणी पाडी. कृष्णाजीपंतांची एक वादकुशल टीकाकार म्हणून विशेष ख्याति होती.

टीकालेखांप्रमाणेंच त्यांच्या कविताहि एके काळीं फार लोकप्रिय झाल्या होत्या. "सासरची पाठवणी किंवा 'माहेरचें मूळ' यांत आलेली प्रसादपूर्ण रचना पाहिली कीं, हीं काव्यें त्यांच्या प्रसिद्धिकालीं इतकीं लोकप्रिय कां झालीं होतीं याची कल्पना सहज येते. शब्दांनीं वर्णनीय विषयांचीं चित्रें वाचकांच्या डोळ्यांपुढें उभीं करण्याचें त्यांचें सामर्थ्यहि 'एका नाटक्याचा पश्चात्ताप' किंवा 'तुफान' या कवितांमधून प्रत्ययास येतें. समकालीन इतर बऱ्याच कवींच्या काव्यांत दिसून येणारी भाषेची जडता यांच्या कवितेंत नाहीं. उत्प्रेक्षादि अलंकारांपेक्षां सहज आलेल्या अर्थान्तरन्यासाकडे त्यांचें अधिक लक्ष असे, पण आपल्या लेखनास केवळ उपदेशाचें स्वरूप त्यांनीं क्वचितच येऊं दिलें, नवीन कवितेविषयीं आठल्ये यांस सहानुभूति नसे, तशी ती फार सुधारकी विचारांविषयींहि नव्हती. त्यामुळें विचाराच्या आणि रचनेच्या दृष्टीनें ते जुनेच राहिले. जुने असूनहि आपलें काव्य चटकदार करण्याची कला त्यांनीं आत्मसात् केली होती हा त्यांचा विशेष होय. कवि म्हणून त्यांना मिळालेली मान्यता या गुणांपेक्षां अधिक उदात्त गुणांवर अधिष्ठित असती, तर आजहि त्यांना लोकप्रियता लाभली असती.[2]''

'केरळ कोकिळां'तील लेखन व कविता यांव्यतिरिक्त यांनीं अनेक विषयांवर विपुल लेखन केलें. त्यांतील अधिकांश अनुवादात्मक आहे. स्वामी विवेकानंद यांच्या 'कर्मयोग', 'भक्तियोग' व 'राजयोग' यांचा स्वैर अनुवाद, त्याचप्रमाणें एकनाथी भागवताचें भाषांतर विशेष प्रसिद्ध आहेत. यांनीं कांहीं चरित्रेंहि लिहिलीं आहेत. त्यांतील 'लोकहितवादी' व 'रामदास' यांचीं चरित्रें स्वतंत्रपणें लिहिलीं आहेत. परंतु ऐतिहासिक सत्यासत्याचा फारसा विवेक नसल्यामुळें व्यक्ती व काळ यांची

१ विविधज्ञानविस्तार, वर्ष ५७, पृ. २०२; नी. ब. भवाळकर
२ अर्वाचीन मराठी काव्य, प्रा. रा. श्री. जोग, पृ. १२६

छाननी करून त्याचप्रमाणें त्यांच्यांतील अंतर्प्रवाहाचें सूक्ष्म निरीक्षण करून यथार्थ चित्र रेखाटण्याचें कसबहि त्यांच्यांत नसल्यामुळें तीं अगदींच सामान्य उतरलीं आहेत. विशेषतः लोकहितवादींच्या घरचें दप्तर हातीं आलें असतांहि ते त्याचा उपयोग करून घेऊं शकले नाहींत. सत्यासत्यविवेक, वैशिष्ट्यपूर्ण विवेचकता व रचनाकौशल्य या चरित्रकारांत आवश्यक असलेल्या गुणत्रयीचा त्यांच्यांत जवळ जवळ अभावच होता.

**वाङ्मय :**

(१) शृंगारतिलकादर्श; [ महाकवि कालिदासविरचित 'शृंगारतिलक' नामक खण्डकाव्याचें मराठी पद्यात्मक भाषांतर; मूळ संस्कृतासह पद्य ]; १८८४; सुधाकर छापखाना, पेण.

(२) गीतापद्यमुक्ताहार अथवा श्रीमद्भगवद्गीतेचें पद्यात्मक प्राकृत भाषांतर; [ मूळासह ]; १८८४; १९०९; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(३) वैराग्यशतकादर्श अथवा भर्तृहरीकृत वैराग्यशतकाचें पद्यात्मक प्राकृत भाषांतर; १८८५; आर्यभूषण छापखाना, पुणें.

(४) ग्रहदशेचा फटका आणि स्वदेशवसनग्रहण; १८९६; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(५) आर्याबद्ध श्रीमद्भगवद्गीता; [ मूळ संस्कृत व मराठी पद्यात्मक भाषांतर ]; १९०८; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(६) मुलीचा समाचार; पद्य; आ. ५ वी, १९२५; रामकृष्ण प्रिं. प्रेस, मुंबई.

(७) सासरची पाठवणी; पद्य; नवीन आवृत्ति, १९२३; के. भि. ढवळे, मुंबई.

(८) माहेरचें मूळ; पद्य; आवृत्ति ७ वी, १९३०; रामकृष्ण प्रेस, मुंबई.

(९) दंपत्यसुखाचा ओनामा; पद्य; मुंबई वैभव छापखाना, मुंबई.

(१०) तिकुडचें पहिलें पत्र; पद्य; ; १९१७; जगद्धितेच्छु छापखाना, पुणें.

(११) टिळकमाहात्म्य; फटका; मुंबई वैभव छापखाना, मुंबई.

(१२) श्रीतुकारामस्तोत्र; १९१७; यशवंत छापखाना, पुणें.

(१३) मंगळसूत्र; [ मुलींस बोध ]; गुर्जर आणि मंडळी, मुंबई.

(१४) श्रीमज्जावजी भवनांतील दोन लग्नमहोत्सव; १९२५; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(१५) मथुरा-गणेश सौभाग्य अथवा वधुवरांस अहेर; [ जावजी यांची कन्या मथुरा इच्या विवाहप्रसंगानिमित्त ]; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(१६) मराठ्यांची धामधूम; [ 'इन् धि वाइल्ड मराठा बॅटल्' या ऐतिहासिक कादंबरीचा अनुवाद ]; १९१६; यशवंत छापखाना, पुणें.

(१७) युद्धांतील अघोर कर्मकथा; [ युद्धविषयक गोष्टी ]; १९१७; हरिहर छापखाना, पुणें.

(१८) श्वेतांबरा; सामाजिक कादंबरी; १९१८; सुरसग्रंथमाला, पुणें.

(१९) फांकडे तरवारबहाद्दर; [ स्पॅनिश लेखक सर्व्हांटिस याच्या 'डॉन क्विक्झोट' या कादंबरीचें संक्षिप्त रूपांतर ]; १९२५; विश्वनाथ गणेश आणि मंडळी, पुणें.

(२०) इराणच्या राजांच्या गोष्टी; ज्ञानोद्यान छापखाना; पुणें.

(२१) पंडित विष्णुशर्माकृत पंचतंत्राच्या आधारानें–पंचतंत्रामृतचषक, १ ला [ सचित्र निवडक वेंचक गोष्टी ]; १९०२; निर्णयसागर छापखना, मुंबई.

(२२) कोकिळाचे बोल किंवा महाराष्ट्रभाषाचित्रमयूर कृ. ना. आठल्ये यांचे निवडक लेख; १९२६; धनंजय छापखाना, खानापूर.

(२३) चीनचा इतिहास; [ 'पिक्चर्स ऑफ चायना अँण्ड इटस् पीपल्'च्या आधारें ]; १८९१; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(२४) मधुयामिनीस्वप्न नाटक; [ शेक्सपियरकृत 'मिड्समर नाइटस् ड्रीम'च्या आधारें ]; १८८७.

(२५) योगी रामचरककृत आत्मसामर्थ्ययोग अथवा निसर्गशास्त्रयोगदर्शन; [हटयोग]; १९२६; धनंजय छापखाना, खानापूर.

(२६) सुलभ वेदान्त; [ मॅक्समुल्लरकृत 'रामकृष्ण : हिज लाइफ अँण्ड टीचिंग्स'चें भाषांतर ]; १९००; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(२७) कर्मयोग; [ स्वामी विवेकानंद यांच्या ग्रंथाचें भाषांतर ]; आ. १ ली, १९००; आ. २, री १९०४; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(२८) भक्तियोग; [ स्वामी विवेकानंद यांच्या ग्रंथाचें भाषांतर ]; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(२९) राजयोग; [ स्वामी विवेकानंद यांच्या ग्रंथाचें भाषांतर ]; आ. १ ली, १८९९, आ. ३ री १९१९; मुंबई.
(३०) मेस्मेरिझम इन्स्ट्रक्टर अर्थात् मोहिनीविद्याशिक्षक; आ. ३ री, १९२०; हरिहर छापखाना, पुणें.
(३१) महाभारत वनपर्वांतर्गत व्याधगीता; [ गोष्टीच्या रूपानें वनपर्व अध्याय २०६ ते २१६ मधील ]; निर्णयसागर छापखाना मुंबई.
(३२) माझें कळसूत्री घर अथवा नरदेहाची रचना; [ एका इंग्रजी ग्रंथाचा अनुवाद ]; १८९४; एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई.
(३३) ब्रह्मचर्याश्रम; आ. २ री, १९३२, हरिहर छापखाना, पुणें.
(३४) सुलभ फोटोग्राफी; १९१०; ब्रिटिश इंडिया छापखाना, मुंबई.
(३५) सचित्र हेल्थ इन्स्ट्रक्टर अर्थात् आरोग्यचिकित्साशिक्षक; १९२३; हरिहर छापखाना, पुणें.
(३६) धि इंग्लिश टीचर; आ. २ री, १९३२; हरिहर छापखाना, पुणें.
(३७) सचित्र नजरबंद शिक्षक अर्थात् मॅजिक इन्स्ट्रक्टर—भाग १; १९२४; भाग २, १९२६; हरिहर छापखाना, पुणें.

**आठल्ये, श्रीकृष्ण विठ्ठल** [ १८७२ – १९४० ] इतिहाससंशोधक. रत्नागिरी जिल्ह्यांतील शिपोशी या गांवीं यांचा जन्म झाला. प्राथमिक शिक्षण शिपोशी येथें व सुरुवातीचें इंग्रजी शिक्षण पुणें येथील भावे स्कुलांत झालें. मॅट्रिकची परीक्षा इंदूर हायस्कूलमधून व बी. ए. ची उज्जैनच्या माधव कॉलेजांतून त्यांनीं दिली. घरची गरिबी असल्यामुळें सर्व शिक्षण त्यांना स्वावलंबनानेंच पार पाडावें लागलें. बी. ए. झाल्यावर इंदुरांतील सरदारदरकदारांकडे कांहीं दिवस खाजगी नोकर म्हणून व पुढें कांहीं वर्षें पिंपळवध्याचे टाकूरसाहेब, श्रीमंत तात्यासाहेब होळकर यांचे दिवाण म्हणून त्यांनीं नोकरी केली. परंतु ही सेवावृत्ति त्यांच्या स्वाभिमानाला न जुळण्यासारखी असल्यामुळें ती त्यांनीं पुढें सोडून दिली. यांचें अखेरचें आयुष्य यांच्या जन्मग्रामीं–शिपोशीस–गेलें. ता. २४–१–१९४० रोजीं शिपोशीहून कोल्हापुरास जात असतां, मोटारअपघातांत मृत्यु आला.

आठल्ये हे जुन्या पिढींतील, एक नामांकित इतिहाससंशोधक होते. मराठ्यांच्या इतिहासांतर्गत एखाद्या स्वतंत्र विषयावर त्यांनीं जरी ग्रंथरचना केली नसली तरी

गेल्या पन्नास–साठ वर्षांपासून मराठ्यांच्या इतिहाससंबंधाचीं जीं शेंकडों साधनें उपलब्ध होऊन प्रसिद्ध झालीं त्यांचा सूक्ष्म व मार्मिकपणें त्यांनीं अभ्यास केला होता. या साधनांच्या प्रसिद्धीमुळें व मराठ्यांच्या इतिहासाच्या अभ्यासाकडे महाराष्ट्रांतील अनेक सुशिक्षित लोकांचें लक्ष वेधलें गेल्यामुळें मराठयांच्या इतिहासांत अंतर्भूत होणारे अनेक नूतन वादग्रस्त प्रश्न उपस्थित होऊन त्यांविषयीं वर्तमानपत्रांत नूतन चर्चा होऊं लागल्या. या चर्चेत आठल्ये यांनीं बराच भाग घेतला. ऐतिहासिक विविध वादग्रस्त प्रश्नांवर त्यांनीं सूक्ष्म, मार्मिक, विवेचनात्मक लेख लिहिले. सुरुवातीचे त्यांचे कांहीं लेख कोल्हापुरास निघणाऱ्या 'ग्रंथमाले'त प्रसिद्ध झाले असून, पुढील बरेच लेख, १९०० सालापासून 'केसरी' पत्रांत प्रसिद्ध झाले आहेत. त्यांतील कांहीं ठळक लेखांचीं नांवें पुढीलप्रमाणें :

१ शहाजीचें पाळण्यांतील नांव शाहू होतें. २ आदिकवि मुकुंदराय यांचा एक योगपर ग्रंथ. ३ अप्रसिद्ध महाराष्ट्र कवि. ४ साधुवर्य तुकाराम यांचा समाधिकाल-निर्णय. ५ मुत्सद्दी नाना फडणवीस. ६ जंजिऱ्यावरील मराठ्यांची मोहीम व ब्रह्मेंद्र-स्वामींची योग्यता. ७ कोल्हापूरकर चिमणाजी दामोदर पंडित प्रधान. ८ बाजीराव पेशव्यांची फिरंग्यावर स्वारी. ९ राजवाडे व चिमणाजी दामोदर. १० राणेखान भाईची सनद. ११ स्वराज्यस्थापनेंत रामदासस्वामींचें अंग होतें काय? १२ मि. किंकेड व पारसनीस यांनीं केलेला बाजीराव पेशवे यांजवरील मिथ्यारोप. १३ शिवाजी व अफझुलखान. १४ संताजी घोरपडे कधीं मारला गेला? १५ मराठी रियासत मध्यविभाग-पुस्तक-परीक्षण. १६ संभाजीनें आपल्या मुलास शाहू या नांवानें लिहिलेलें पत्र. १७ भानू विरुद्ध पांगारकर. १८ नानासाहेब व गारदीचा शेवट. १९ पानिपत प्रकरणाचा उत्तर भाग.

सन १८९९ पासून त्यांच्या अंतकालापावेतों आठल्ये यांनीं लिहिलेले अनेक लेख 'केसरी' पत्रांत प्रसिद्ध झाले. राजवाड्यांनीं मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचे खंड प्रसिद्ध करण्यास सुरुवात करून या ग्रंथांच्या त्यांनीं लिहिलेल्या विस्तृत प्रस्तावनांत मराठ्यांच्या इतिहासान्तर्गत अनेक प्रश्नांची चर्चा करण्यास सुरुवात केली. राजवाड्यांच्या या लिखाणाचें सूक्ष्म परीक्षण करून राजवाड्यांनीं प्रतिपादन केलेले जे सिद्धान्त आठल्ये यांस मान्य झाले नाहींत, त्यांवर त्यांनीं आपल्या टीकेचें अस्त्र सोडण्यास सुरुवात केली. पानिपत युद्धाच्या अपयशाला गोविंदपंत बुंदेले यांचा नाकर्तेपणा व ढिलाई कारणीभूत झाली असें राजवाड्यांनीं

'म. इ. सा.' खण्ड १ चे प्रस्तावनेंत प्रतिपादन केलें आहे. गोविंदपंत बुंदेले हे कऱ्हाडे ब्राह्मण होते. राजवाड्यांनीं या प्रश्नाची चर्चा करीत असतां सद्भिरुचीला न शोभण्यासारखी सर्व कऱ्हाडे ब्राह्मण जातीविषयीं कडक टीका केली. आठल्ये हे कऱ्हाडे ब्राह्मण होते, व मानवी स्वभावास अनुसरून राजवाड्यांच्या या प्रश्नाच्या चर्चेंत त्यांनीं सर्व कऱ्हाडे जातीवर जो आरोप केला त्यामुळें आठल्यांचें पित्त खवळून जाऊन त्यांनीं राजवाड्यांचें या मुद्द्यांविषयींचें विवेचन सदोष व अन्यायाचें कसें आहे, हें एका लेखांत दर्शविलें आहे. राजवाड्यांच्या प्रस्तावनेंत समर्थ रामदासस्वामी व ब्रह्मेंद्रस्वामी यांची राजवाड्यांनीं तुलना करून ब्रह्मेंद्रस्वामी हा व्यवहारी, स्वार्थसाधु, पोटभरू संन्यासी असून समर्थ रामदासस्वामींसारखा तो निःस्वार्थी व राष्ट्रहितरक्षक नव्हता असें प्रतिपादन केलें. राजवाड्यांचें हें प्रतिपादन आठल्यांस मानवलें नाहीं व त्यांनीं राजवाड्यांवर आपल्या टीकेचें अस्त्र सोडलें. ऐतिहासिक संशोधनात्मक वादग्रस्त प्रश्नाचे बाबतींत राजवाडे व आठल्ये यांच्यांत अनेक मतभेद उत्पन्न झाले, त्यांचा नमुना म्हणून वरील दोन उदाहरणें नमूद केलीं आहेत.

**आठल्ये, जनार्दन हरि** [ १८२६–१९०० ] वृत्तपत्रकार, मुद्रक व प्रकाशक. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत, त्यांचें वडिलोपार्जित इनाम गांव शिपोशी येथें झाला. त्यांचें घराणें विद्येविषयीं व थोरपणाविषयीं फार प्रसिद्ध आहे. रत्नागिरी येथें इंग्रजी शाळेची सुरुवात झाली त्याच सालीं त्यांत प्रवेश करून त्यांनीं मॅट्रिकपर्यंतचा आपला अभ्यास पुरा केला. त्यांनीं कांहीं दिवस त्या शाळेंत शिक्षकाचेंहि काम केलें. डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर हे त्या वेळच्या त्यांच्या विद्यार्थ्यांपैकीं एक होते. पुढें सरकारी नोकरी न करण्याचा निश्चय करून त्यांनीं रत्नागिरीस 'जगन्मित्र' नांवाचा छापखाना १८५४ सालीं सुरू केला. व दुसऱ्या वर्षापासून त्याच नांवाचें ते वर्तमानपत्रहि काढूं लागले. हें काम चाळीस वर्षें चालवून वृद्धत्वामुळें पुढें बंद केलें. रत्नागिरीसारख्या कोपऱ्यांतील शहरांत जुन्या काळीं छापखाना घालून व्यवस्थेनें वर्तमानपत्र चालवणें हें काम सामान्य नव्हतें. त्यांची बुद्धि, हिंमत, कर्तृत्व व यांत्रिक कलेंतील गति पाहून अधिकाऱ्यांकडून

---

१ आधार : 'आठल्ये चरित्र व लेख', संशोधक त्रैमासिक, जुलै १९४२.

सरकारी नोकरी पत्करण्याविषयीं त्यांना आग्रह होत असे. परंतु त्यांनीं त्यांच्या करारी स्वभावास शोभणारा निश्चय कधींहि सोडला नाहीं.

हे मोठे विद्याव्यासंगी, शोधक व बहुश्रुत असत. धर्मशास्त्र, ज्योतिष यांत यांची चांगली गति असे. पुण्यास झालेल्या पुनर्विवाहाच्या बड्या वादांत हे शंकराचार्यांच्या मुख्य सल्लामसलतगारांपैकीं होते. या वादांतील त्यांच्या कामगिरी-बद्दल श्रींकडून त्यांस एक जरीकांठी शालजोडी मोठ्या सन्मानानें देण्यांत आली होती. सायन-निरयन वादांत यांनीं पुढाकार घेऊन, धर्मशास्त्राप्रमाणें यथाकालीं कर्में करण्यास निरयनगणनाच युक्त आहे असें सिद्ध करून दाखविलें व यांचे बरेच मुद्दे जनार्दन बाळाजी मोडक यांस मान्यहि झाले होते. या विषयावरचा त्यांनीं आपला निबंध मुंबई, पुणें, बडोदें, धुळें, कोल्हापूर वगैरे शहरांच्या विद्वानांपुढें वाचला होता.

आठल्ये यांनीं धर्मसिंधु, बृहत्संहिता, भावार्थदीपिका, मुहूर्तमार्तंड वगैरे उपयुक्त ग्रंथ अनेक मूळ प्रती जमवून शुद्ध रीतीनें छापून काढले व कित्येकांचीं भाषांतरेंहि केलीं.

**वाङ्मय :**

(१) तर्कदीपिका, १८५८

(२) मुल्की उमेदवार; १८५९; [कलेक्टर खात्यांत चाकरी करण्यास इच्छिणारे उमेदवारांचें अभ्यासाचें बूक]; जगन्मित्र शिळा छापखाना, रत्नागिरी.

(३) बालवैद्य; १८६१; [ 'A Domestic Guide to Mothers in India' चे आधारें. गर्भधारणा, प्रसूति, बालशुश्रूषा इ० ]; जगन्मित्र शिळा छापखाना, रत्नागिरी.

(४) घरचें आयव्यय कोष्टक; १८६३.

(५) शब्दसिद्धि निबंध; १८७१; [संस्कृत धातूंवरून मराठी शब्द कसे निर्माण झाले तें दर्शविणारा धातुकोश.] सरकारी विद्याखातें; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

(६) बृहत्संहिता (वराहमिहिरकृत); १८७४ [मूळ संस्कृत मराठी भाषांतर]; जगन्मित्र छापखाना, रत्नागिरी.

---

१ आधारः नेटिव्ह ओपिनिअन, १९ एप्रिल, १९००

(७) गोत्रावळी आणि प्रवरपट करहाटे ऊर्फ करहाडे ब्राह्मण यांची; १८९८; श्री वेंकटेश छापखाना, मुंबई.
(८) न्यायाब्धिसेतु–भाग १ ला ; [मोरेश्वर श्रीधर चितळे यांस साहाय्य]: 'A Guide to the East India Company's Bombay Body of Regulations': १८९५; जगन्मित्र शिळा छापखाना, रत्नागिरी.
(९) न्यायाब्धिसेतु–भाग २ रा ; [मोरेश्वर श्रीधर चितळे यांस साहाय्य]: पुरवणी वगैरे; ८४ कायद्यांचें हांशील: १८५७; जगन्मित्र शिळा छापखाना, रत्नागिरी.

**आठवले, नरहर लक्ष्मण** [ –१९३८] शैक्षणिक मानसशास्त्राचा अभ्यासक व लेखक. यांचें बालपण व बरेंचसें शिक्षण काठेवाडांत झालें. मुंबई विद्यापीठाचे हे बी. ए. होते. विद्यार्थीकालापासून राष्ट्रसेवेकडे ओढा असल्यामुळें आजन्म अविवाहित राहून यांनीं स्वतःस राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्याला वाहून घेतलें होतें. पदवीधर झाल्यावर बारा वर्षे यांनीं प्रो. अण्णा विजापूरकर यांच्या तळेगांव येथील नवीन समर्थ विद्यालयांत शिक्षक म्हणून काम केलें. येथें असतांना त्यांनीं 'बालमानसशास्त्रा'चा विशेषेंकरून अभ्यास केला. पुढें काकासाहेब कालेलकर यांच्या आग्रहावरून ते वर्धा येथील 'महिलाश्रम' या विद्यालयाचे प्रमुख म्हणून काम करूं लागले. अखेरपर्यंत ते याच संस्थेंत होते.

**वा ङ्म य :**

(१) ब्रिटिश राज्यव्यवस्थेचा इतिहास; शके १८४३; आर्यभूषण, पुणें.
(२) दुर्वर्तनी मुलांची सुधारणा; १९३३; समर्थ भारत छापखाना, पुणें.
(३) आत्महत्या : त्यांचा प्रसार व प्रतिकार; १९३३; भारत प्रेस, औंध.
(४) बालकांचा मनोविकास.
(५) डॉक्टर शरच्चंद्र, [आंग्ल लेखक रॉबर्ट लुई स्टीव्हसन यांच्या 'डॉ. जेकिल आणि मि. हाइड' या नवलकथेचें रूपांतर]; नारायण मुद्रणालय, नागपूर.
(६) व्यास विद्याश्रम [शिक्षणविषयक कादंबरी].
(७) राणा कोल्हा; [Caxtonकृत 'Reynard the Fox' या गोष्टीच्या आधारें]; शके १८५३; समर्थ भारत छापखाना, पुणें.

**आनंद** [ १८९६–१९४८ ] कवि, कथालेखक, नाटककार व निबंधलेखक. यांचें संपूर्ण नांव विनायक लक्ष्मण बर्वे. हे आपली कविता 'आनंद' या टोपण-नांवानें व गद्य लेखन आपल्या संपूर्ण नांवानें प्रसिद्ध करीत. रत्नागिरी जिल्ह्यांतील खेड तालुक्यांत चिपळूणपासून सहा मैलांवर वासिष्ठी नदीच्या उत्तर कांठीं सोनगांव नांवाचें एक खेडें आहे. पेशवाईच्या काळापासून या खेड्यांत बरवे घराण्याची एक शाखा इनामदार आणि मानकरी म्हणून नांदत आलेली आहे. कवि आनंद हे या शाखेंतले होत. यांचे वडील लक्ष्मणराव हे सोनगांवांतील आपली शेतीभाती सांभाळून चिपळूण येथें कान्हेरे नामक एका वकिलाकडे कारकुनी करीत. शेतीभाती व कारकुनी यांखेरीज सावकारीचा धंदाहि त्यांनीं चालविला होता.

कवि आनंद यांचा जन्म सोनगांवीं झाला. त्यांचें मराठी शिक्षण व चार इयत्ता-पर्यंतचें इंग्रजी शिक्षण चिपळूणला झालें. पुढील शिक्षणासाठीं ते रत्नागिरी येथें सरकारी हायस्कुलांत गेले आणि प्रवेश परीक्षेमध्यें उत्तीर्ण झाल्यावर उच्च शिक्षणा-साठीं मुंबईतील विल्सन कॉलेजमध्यें दाखल झाले. त्या कॉलेजांतून बी. ए. झाल्या-नंतर त्यांनीं कायद्याचा अभ्यास केला आणि एल्एल्. बी. होऊन इ. स. १९२४ पासून ते चिपळूणला वकिली करूं लागले.

मुंबईस कॉलेजविद्यार्थी असतांना (१९१९) त्यांना प्रथम कविता लिहिण्याचा नाद लागला. 'आनंद' या टोपण नांवाखालीं ते कविता लिहूं लागले. मुंबईत असतांना त्यांचा प्रस्तुत लेखकांशीं, त्याचप्रमाणें प्र. के. अत्रे (केशवकुमार), दि. गं. केळकर (अज्ञातवासी), ग. त्र्यं. माडखोलकर वगैरे नवोदित साहित्यिकांशीं परिचय घडून येऊन लेखनाला प्रोत्साहक असें वातावरण त्यांना मिळालें. तत्कालीन 'नवयुग' या प्रमुख मासिकांतून त्यांच्या कवितेला प्रसिद्धीहि मिळूं लागली. 'घार' ही त्यांची पहिली प्रसिद्ध कविता होय. मुंबई सोडण्यापूर्वी नाटकें लिहिण्यापर्यंत त्यांची लेखनप्रगति झालेली होती. चिपळूणला राहूं लागल्यावर त्यांनीं कविता व नाटकें यांच्या जोडीला आणखी कथा, लघुनिबंध, व नभःश्रुतिका लिहावयास सुरुवात केली आणि आयुष्याच्या अखेरच्या काळांत एक विस्तृत कादंबरी लिहून काढली.

राम गणेश गडकरी, बालकवि ठोमरे आणि नरसिंह चिंतामण केळकर हे त्यांचे आवडते मराठी लेखक होते. त्यांना आवडणाऱ्या इंग्लिश–अमेरिकन लेखकांपैकीं

थॉमस हार्डी, ग्रे, ब्राउनिंग आणि ओ हेनरी हीं नांवें सांगतां येतील. संस्कृत नाटकांमध्यें शूद्रकाचें मृच्छकटिक त्यांना विशेष आवडे. वकिलीचा व्यवसाय त्यांना विशेष आवडत नसे. त्यांचें लक्ष वाचन व लेखन यांत असे. त्यामुळें काम भरपूर मिळण्यासारखें असूनसुद्धां तिकडे दुर्लक्ष असल्यामुळें त्यांची वकिली साधारणच होती. पहाटे उठून लेखन, सकाळीं अशिलांच्या भेटी व कोर्टाचें काम, दुपारीं कोर्ट, कोर्टांतून परत आल्यावर लेखन अगर वाचन, सायंकाळीं वाचनालयांत जाऊन नियतकालिकांचें वाचन व त्यानंतर रपेट आणि रात्रीं वाचन अशी त्यांची दिनचर्या असे. त्यांना प्रवासाची आवड होती. नागपूर, ग्वाल्हेर, अहमदाबाद, बडोदें, गोवा, बेळगांव आणि धारवाड इतक्या ठिकाणीं त्यांनीं प्रवास केलेला होता. रत्नागिरी जिल्हांतील खाडीकांट व समुद्रकांठचीं गांवें यांतून फिरण्याची त्यांना फार हौस असे.

१९३६ सालीं ते मोटारींतून पुण्याला जात असतां वाटेंत त्यांना पक्षघाताचा झटका आला. त्यांतून पुढें ते बरे झाले पण पूर्वीचे राहिले नाहींत. त्यांचें स्वरूप पार बदलून गेलें. ते कृश आणि वृद्ध दिसूं लागले. चालतांना ते लंगडत. पुढील आयुष्यांत पथ्यावर राहून आणि सायंकाळच्या वेळीं शीर्षासन वगैरे कित्येक आसनें नियमितपणें करून त्यांनीं आपली प्रकृति सांभाळली होती. त्यांची वकिली चालू होती आणि लेखनवाचन देखील चालू होतें. आपल्या आयुष्यामध्यें जी विस्तृत कादंबरी ('मुचकुंद दरी') त्यांनीं लिहिली तिचा उत्तरार्ध, आणि पूर्वार्धाचा बराच भाग त्यांनीं या पंगु अवस्थेंत लिहिलेला आहे.

कवि आनंद हे व्यवहारी सृष्टीपेक्षां काव्यसृष्टींतच जगत असत आणि व्यवहारी रुपया-आण्यांपेक्षां निसर्गाच्या धनदौलतींतच त्यांचें मन रमत असे. काव्य आणि नाट्य या गुणांची देणगी त्यांना निसर्गदत्त होती. सोनगांव, चिपळूण आणि रत्नागिरी येथील सृष्टिशोभेनें त्यांच्या काव्यगुणांचें लालन केलें. चिपळूणमधील-शिमग्यांतल्या तमाशांनीं आणि फिरत्या नाटक मंडळ्यांच्या चिपळूण-रत्नागिरी-मधील नाटकप्रयोगांनीं त्यांच्या अंगीं असलेल्या काव्य-नाट्यगुणांना जोपासलें. उच्च शिक्षणासाठीं कवि आनंद पुढें मुंबईस गेल्यावर तेथें त्यांच्या अंगच्या त्या गुणांना वाचा फुटली. वाङ्मयाचे जेवढे म्हणून प्रकार विनायकरावांनीं हाताळले त्या सर्वांतून त्यांच्या अंगचे हे गुण प्रतीत होतात.

कवि आनंद हे नांवाप्रमाणेंच आनंदी वृत्तीचे होते. या त्यांच्या वृत्तीला बंडखोरीची जोड मिळाली होती. त्यांचें वाङ्मय वाचीत असतां त्यांच्या या उभयविध वृत्तीचें दर्शन वारंवार घडून येतें. धार्मिक, सांस्कृतिक, सामाजिक व राजकीय बाबतींतील त्यांच्या कल्पना व्यापक आणि डोळस असत. तंत्राची अरेरावी त्यांना खपत नसे. आनंदनिर्मितीप्रीत्यर्थ त्यांनीं वाङ्मय लिहिलें, त्याचप्रमाणें अन्यायांच्या चिडीनें प्रेरित होऊन देखील त्यांनीं तें लिहिलें आहे. ते आशावादी असल्यामुळें त्यांच्या वाङ्मयांत नैराश्याला स्थान नाहीं.

त्यांच्या लेखणींतून अवतरलेली शेवटली कलाकृति म्हटली म्हणजे त्यांची ‘सवत् सडा’ नांवाची कविता होय. या कवितेंत ते म्हणतात :

**“ कोंकण माझी वास्तुदेवता, कोंकण मम तन्मन—”**

आणि हें त्यांचें म्हणणें अक्षरश: खरें आहे. त्यांची वास्तुदेवता जी कोंकण, ती त्यांच्या कवितांत, नाटकांत, नभःश्रुतिकांत, कथांत, लघुनिबंधांत आणि कादंबरींत अशी सगळीकडे दृग्गोचर होते. इतक्या विविध प्रकारांनीं कोंकणदेवीची भक्तिपूर्वक पूजा बांधणारा साहित्यिक दुसरा आढळणार नाहीं.

आपल्या शेवटल्या कवितेच्या शेवटीं वाचकांना त्यांनीं खालीलप्रमाणें प्रार्थना केलेली आहे :

**“प्रत्येकानें सांभाळावी कलावन्त पायरी**
**गोडधोड वाचका ! करा ही ‘आनन्दिय शाहिरी”**

त्यांनीं जेवढ्या कविता लिहिल्या तेवढ्या साऱ्या कोणत्या ना कोणत्या तरी नियतकालिकांत प्रसिद्ध झालेल्या आहेत. त्यांची अमुद्रित अशी कविता सहसा सांपडणार नाहीं. आपल्या कवितांचें[1] त्यांनीं पुढीलप्रमाणें वर्गीकरण करून ठेवलेलें आढळतें: १ प्रासंगिक गीतें. २ ‘गझल’ गीतें. ३ प्रेमगीतें. ४ कोंकणगीतें. ५ शाहिरी गीतें. ६ जीवनविषयक गीतें. ७ सौंदर्यविषयक कविता.

“ कवि आनंदांनीं अशी विविध प्रकारची काव्यरचना केली आहे. त्यांतून त्यांची भावनोत्कटता, कल्पनेची भरारी, सौंदर्यदृष्टि, शब्दमाधुरी नि रचनाकौशल्य दिसून येतें. त्यांची भाषा शब्दांच्या नादानेंहि अर्थ प्रतीत व्हावा वा चित्र डोळ्यांपुढें

---

१ कवि आनंद याच्या कवितांचा संग्रह अद्याप पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेला नाहीं.

उभें रहावें अशी परिणत झालेली आहे. भावनांची वा कल्पनांची दुरमड वा गुंतागुंत ते तितक्याच कौशल्यानें अगदीं लीलया, शब्दांची रास किंवा उपमांची उतरंड न रचतां अगदीं मोजक्या शब्दांत यथार्थ दिग्दर्शित करतात. निसर्गाची आवड, मनुष्यस्वभावाचें ज्ञान नि स्वातंत्र्यसमतेच्या ध्येयाची ओढ यांनीं त्यांच्या काव्याचें अंतरंग रंगलें आहे; आणि अर्थानुकूल अशा शब्दांची योजना केली आहे. जीवनांतील सौंदर्य नि आनंद उपभोगण्याची निरोगी आणि निरागस हौस 'आनंदां'च्या काव्यांत प्रतीत होते. त्याचप्रमाणें तें सौंदर्य आणि आनंद वाङ्मयरूपानें आविष्कृत करण्याची त्यांची सहज आणि उत्कट अशी प्रवृत्ति प्रत्ययास येते.[1]"

"[2]आनंद कवींचा विशेष म्हणजे त्यांची शुद्ध भावगीतात्मक प्रतिभा. आधुनिक मराठी कवितांत अजरामर होऊन राहण्यासारखीं कांहीं भावगीतें 'आनंदा'च्या लेखणींतून उतरलीं आहेत. भावनेच्या गोड तारा 'आनंदा'च्या भावगीतांतून इतक्या सफाईनें छेडलेल्या आहेत कीं, वाचकांच्या हृदयांत त्यांचे पडसाद ओळी-ओळीबरोबर जागृत होतात. 'आनंदा'चीं सर्वच भावगीतें सरस नाहींत. कला-सक्तीचा अतिरेक व त्यामुळें उत्पन्न झालेली कृत्रिमता हा 'आनंद' कवींचा मुख्य दोष होय. 'आनंदां'च्या प्रतिभेचे झरे सदा सर्वकाळ नैसर्गिकपणें वाहत नाहींत. त्यांतील पाणी शुद्ध असतें; पण त्याचा मार्ग कवीनें मोठ्या चतुराईनें दुतर्फा वनराजी लावून त्यांमधून काढून दिलेला असतो. 'आनंदां'च्या कोंकणगीतांनीं सृष्टिसौंदर्याची वाचकांना ओळख पटली तरी त्यांतील अठरा विश्वे दारिद्र्याची व इतर शेंकडों कोंकणविषयक प्रश्नांची त्यांना कल्पना येणार नाहीं. कोंकण ही या गीतांची पार्श्वभूमि असली व यांतील वर्णनें नैसर्गिक आणि सहजसुंदर असलीं तरी कवीची दृष्टि सत्यकथनपर नसून तिचा ओढा अद्भुतरम्यतेकडे आहे. 'आनंदांच्या' कलानिष्ठेची परिसीमा या कोंकणगीतांतून झालेली आढळते. 'आनंदां'चे गझल् दहा ओळींचे आहेत. जग हें अपूर्ण व विषम आहे; प्रीति ही अद्भुत, पुण्यस्वरूप व दुर्लभ वस्तु आहे, प्रीतीची शुभ घडी पूर्वपुण्याईनें कोणाच्या तरी वांट्यास केव्हां तरी येते; प्रेम व सौंदर्य यांशिवाय या अपूर्व व नश्वर जगांत कवीला दुसऱ्या कशाची जरूर नाहीं, अशा तऱ्हेचा या गझल् गीतांचा विषय आहे. 'आनंद'

---

१ "कै. वि. ल. बरवे"—अ. स. फडके; साप्ताहिक चंद्रोदय, चिपळूण, ता. १०-२-१९४९.

२ "दोन आनंद"—प्रो. वि. स. टिळक.

कवींची भाषा बरेच वेळां अशुद्ध असते. तरी 'आनंदां'चीं भावगीतें व कोंकण-गीतें यांनीं त्यांचें नांव मराठी भाषेंत कायम राहील."

'दिल्दौलत' हें कवि आनंद यांनीं विद्यार्थीदशेंत लिहिलेलें पहिलें नाटक होय. या नाटकाचे पांच अंक असून तें छत्रपति संभाजीच्या कारकीर्दीवर लिहिलेलें आहे व गडकऱ्यांच्या नाटकांचा त्या नाटकावर परिणाम झालेला आहे. त्यानंतर त्यांनीं 'लग्नमंडप' नांवाचें नाटक लिहिलें. इंग्रज नाटककार बर्नार्ड शॉ याच्या 'गेटिंग मॅरिड' या नाटकावरून इ. स. १९२३ सालीं त्यांनीं हें नाटक लिहिलें. हें तीन अंकी सामाजिक नाटक आहे. हें इ. स. १९२७ अखेर रंगभूमीवर आलें आणि नंतर लवकरच पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालें. हें नाटक बरेंच लोकप्रिय झालेलें होतें. कवि आनंद यांची वृत्ति स्वभावतःच नाट्यानुकूल होती. परकायाप्रवेशाची कला त्यांना अवगत होती आणि नाट्यानुकूल घटनाहि अचूक शोधून काढणारी दृष्टि त्यांना होती. यांच्या जोडीला आणखी पाश्चात्य नाट्यपद्धतीचा अभ्यास त्यांनीं केलेला होता. त्यांच्या नाटकांतील संवाद खटकेबाज असून त्यांना कल्पनाविलासाची व काव्यात्मकतेची मुरड असल्यामुळें ते मनोहर वाटतात. 'लग्नमंडपा'खेरीज रंगभूमीवर आलेलें आणि पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेलें असें त्यांचें दुसरें नाटक 'माणिक एम्. ए.' हें होय. एका इंग्लिश मासिकांतील गोष्टीवरून त्यांनीं हें नाटक लिहिलें. हें नाटक प्रथम पांच अंकी असून त्याचें नांव वेगळेंच होतें. पण त्याला रंगभूमीवर आणण्याच्या प्रयत्नांत नाटकमंडळीच्या आग्रहाला बळी पडून त्याची त्यांनीं छाटाछाट केली व त्याला दोन अंकी बनवून 'माणिक एम्. ए.' हें नांव दिलें. पांच अंकी नाटक दोन अंकी बनल्यामुळें त्यांतलें मूळचें स्वारस्य नाहींसें झालेलें आहे. या तीन नाटकां-खेरीज 'दख्खनशाही अथवा मुक्तबंधन', 'कबीर', 'कलामंदिर', 'भिल्लीण', 'श्रमसाफल्य,' 'मंगळसूत्र,' 'कोंकणचे अण्णा' इत्यादि लहानमोठीं नाटकें त्यांनीं लिहिलीं. तीं अमुद्रित आहेत. 'दख्खनशाही अथवा मुक्तबंधन' हें पांच अंकी नाटक छत्रपति राजारामाच्या कारकीर्दीवर असून त्याचा प्रयोग चिपळूण-नजीक शिरळ गांवीं करण्यांत आलेला होता व स्वतः लेखकानें त्यांतील गणोजी शिर्क्याची भूमिका घेतली होती. बाळाजी विश्वनाथ पेशव्यावर एक नाटक ते लिहीत होते. परंतु त्यांच्या हातून तें शेवटास गेलें नाहीं. त्या नाटकाचे फक्त पहिले दोनच अंक काय ते त्यांनीं लिहिलेले आहेत. 'जांव काय् कोडतांत?' 'अन्यायाची चीड' आणि 'खरा शिमगा' या त्यांनीं लिहिलेल्या नभःश्रुतिका होत.

कवि आनंद यांनीं लिहिलेल्या कथांचे ‘लघुकथा’ आणि ‘ऐतिहासिक व विस्मयावह कथा’ असे दोन वर्ग पडतात. त्यांनीं लिहिलेल्या बहुतेक कथा पुस्तक-रूपानें प्रसिद्ध झालेल्या आहेत. ‘कलमी आंबे’ आणि ‘कोंवळीं पोफळें’ हे त्यांच्या लघुकथांचे संग्रह होत. ‘कलमी आंब्यां’त त्यांच्या लघुकथांचें प्राथमिक स्वरूप दिसतें आणि ‘कोंवळ्या पोफळां’त परिणत स्वरूप आढळतें. ‘विजा व मेघ’ हा त्यांच्या ऐतिहासिक व विस्मयावह कथांचा संग्रह होय. “त्यांच्या लघुकथा बहुतांशीं मनुष्यस्वभावांतील ढोबळ दोष अगर विसंगति यांवर आधारलेल्या आहेत. त्यांच्या सर्वच लघुकथांना विनोदाची झिलई आहे व पुष्कळ कथांतून उपहासगर्भ पद्धति अवलंबिलेली आहे. त्यांच्या लघुकथा बहुतेक हेतुप्रधान आहेत व या लघुकथांच्याद्वारेंच त्यांनीं आपल्या बोंचक प्रतिभेचा प्रकाशझोत पाडला.”[1]

लघुनिबंध हा वाङ्मयप्रकार मराठींत ज्यांनीं रूढ केला त्या मंडळीमध्यें बर्वे (कवि आनंद) यांची गणना होते. त्यांनीं लिहिलेले लघुनिबंध नियतकालिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांतले सुमारें एक तृतीयांशच काय ते पुस्तकाच्या रूपानें संग्रहित झलेले दिसतात. त्या पुस्तकाचें नांव ‘पिसारा’ हें होय. उरलेले निबंध आणखी दोन पुस्तकांच्या रूपानें प्रसिद्ध करण्याच्या खटपटींत ते होते व त्यांतील एका पुस्तकाला ‘झरोके’ असें नांव देण्याचा त्यांचा विचार होता. विनायकरावांच्या लघुनिबंधांत त्यांचें मार्मिक निरीक्षण, विपुल ग्रंथपरिशीलन आणि जिव्हाळा हीं जागोजाग प्रतीत होतात.

‘मातेश्वरी’ नांवाची एक ध्येयप्रधान नवलकथा बर्वे यांनीं १९२८ च्या अखेरीस लिहिली. त्यांची ही नवलकथा म्हणजे एक छोटीशी कादंबरी होती. पण ती धांदलीनें लिहिली गेल्यामुळें घटनाविकासाला तींत पुरेसा वाव मिळालेला नाहीं. त्यानंतर ‘गांवगुंफा’ नांवाची एक विस्तृत कादंबरी त्यांनीं लिहावयास घेतली. या कादंबरीचें लेखन ते धीरे धीरे करीत होते. कांहीं प्रकरणें लिहून झाल्यानंतर ‘गांवगुंफा’ हें नांव त्यांना आवडेनासें झालें व कादंबरीला त्यांनीं ‘मुचकुंद दरी’ असें नांव दिलें. या कादंबरीचा पूर्वार्ध १९४० सालीं छापून प्रसिद्ध झाला. त्यानंतर कादंबरीचा उत्तरार्ध त्यांनीं लिहावयास घेतला व आपल्या मृत्यूपूर्वी तो

---

१ ‘आशावादी आनंद’, वि. प. चितळे; चंद्रोदय साप्ताहिक, चिपळूण, ता. २७–१–१९४९; ता. ३–२–१९४९.

लिहून पुरा केला. हा उत्तरार्ध अजून अप्रकाशित आहे. या कादंबरींतील ' मुचकुंद-दरी ' नांवाचें ठिकाण म्हणजे कवि आनंद यांचें ' सोनगांव ' होय ! प्रादेशिक दीर्घ कथेचा ही कादंबरी म्हणजे एक सुंदर नमुना आहे.

मा. के. काटदरे

**वाङ्मय :**

(१) लग्नमंडप; सा० नाटक, गद्य; सचित्र; १९२७; मनोरंजन छापखाना, मुंबई.
(२) माणिक एम्. ए.; संगीत सा० नाटक; १९३२; मौज प्रिंटिंग प्रेस, मुंबई.
(३) मातेश्वरी, [ध्येयप्रधान नवलकथा]; १९२९; कर्नाटक छापखाना, मुंबई.
(४) मुचकुंद दरी, पूर्वार्ध; १९४०; महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई.
(५) कलमी आंबे, [लघुकथासंग्रह]; १९४०; विजय छापखाना, पुणें.
(६) कोवळीं पोफळें, [ ,, ]; १९३५; न्यू भारत छापखाना, मुंबई.
(७) विजा व मेघ, [ ,, ]; १९३५; चित्रशाळा, पुणें.
(८) पिसारा, [लघुनिबंधसंग्रह]; १९३७; चित्रशाळा, पुणें.

**आपटे, गोविंद विनायक** [ १८६९–१९२५ ] इतिहाससंशोधक. यांना विद्यालयीन शिक्षण विशेषसें मिळालें नसतांहि केवळ सार्वजनिक कार्य करण्याच्या हेतूनें प्रेरित होऊन, त्यांनीं इतिहाससंशोधनाचें व लेखनाचें काम हातीं घेतलें. प्रारंभीं हे ' धर्म ', ' नीति ', ' मद्यपाननिषेध ' यांसंबंधीं व्याख्यानें देत फिरत असत. १८९६ सालीं कुलाबा जिल्ह्यांत अशींच कांहीं व्याख्यानें त्यांनीं दिलीं. सरकारला तीं आक्षेपार्ह वाटून त्यांजवर खटला भरण्यांत आला व त्यांस दोन वर्षांची सजा झाली. आपटे यांनीं हायकोर्टापर्यंत आपला खटला नेला. परंतु त्यांस यश आलें नाहीं. या खटल्याची हकीकत त्यांनीं ' न्यायाचा मासला ' या नांवानें पुस्तक-रूपानें प्रसिद्धि केली आहे. तुरुंगांतून सुटून आल्यावर ते श्री क्षेत्र वांई येथे येऊन राहिले असें दिसतें. तेथील प्रसिद्ध पंडित भाऊशास्त्री लेले यांच्या ' धर्म ' या नियतकालिकाच्या प्रचाराचें काम ते करीत. त्यांचें बरेंचसें आयुष्य वांईसच गेलें. तेथें बापट नांवाच्या गृहस्थाकडे ते राहात. हे गृहस्थ त्यांचें सर्व कांहीं आस्थेनें करीत. आपटे यांचा स्वतःचा असा संसार नव्हता. ' विंचवाचें घर पाठीवर ' अशीच त्यांची स्थिति होती.

यांनीं १९०० सालीं 'निर्मळ क्षेत्रवर्णन व स्थानवर्णन' व १९११ सालीं 'श्रीक्षेत्र वांईवर्णन' अशीं दोन छोटीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. क्षेत्रवर्णनाबरोबरच त्यांचा इतिहासहि संशोधून त्यांनीं यांत दिला आहे.

आपटे यांची महत्त्वाची कामगिरी म्हणजे त्यांनीं लिहून प्रसिद्ध केलेले, आपटे, बरवे, पटवर्धन व गोखले यांच्या घराण्यांचे इतिहास होत. 'ब्राह्मण घराण्यांचा सविस्तर व साधार इतिहास लिहिण्याचा पहिला प्रयत्न' आपटे यांचाच होय. आपण 'घराण्यांचे इतिहास' लिहावयास कसे प्रवृत्त झालों याची हकीकत त्यांनीं स्वतःच 'हिंदुस्थानांतील गोखले व गोखले–रास्ते घराण्याचा इतिहास' या पुस्तकांत 'लेखकाचे विचार' या मथळ्याखालीं पुढीलप्रमाणें दिले आहेत :

"शके १८३४ त (इ. स. १९१२) मी रावसाहेब सानेकृत पेशव्यांची बखर वाचली. सदरहू बखरीमध्यें सरदार नारो विष्णु आपटे हे शेवटचे बाजीराव-साहेब पेशवे यांच्या पदरीं सरदार होते, हें वाचून या लेखकास जिज्ञासा उत्पन्न झाली कीं, सर्व आपटे एकगोत्रज असल्यामुळें, आपणहि सरदार आपटे यांच्या-पैकींच आहोंत; अशी मनाची समजूत होऊन, त्याच्या संशोधनास सुरुवात केली. आमचें कोंकणांतील मूळ गांव आजगांव असल्यामुळें त्या गांवीं जाऊन मी चौकशी करतों तों सरदार नारो विष्णु आपटे यांचे वंशज ग्वाल्हेर येथें असून त्यांचेंहि मूळ गांव आजगांवच! तेव्हां विशेष चौकशी करतां, सरदार आपटे हे या लेखकास अगदीं जवळचे म्हणजे देशांतील असल्याचें समजलें. मग 'आपटे घराण्याचा इतिहास मी तयार करीत आहें, ज्यांचें उपनांव आपटे आहे, त्यांनीं आपली माहिती पाठवावी,' म्हणून वर्तमानपत्रांत जाहिरात दिली व दहा प्रश्नांचें एक विनंतिपत्र छापलें. विनंतिपत्रें सर्वांना पाठविलीं, आणि मी माहिती मिळविण्या-करितां प्रवास करूं लागलों. सर्व हिंदुस्थानांतील आपटे यांची माहिती मिळवून पुस्तक तयार केलें आणि या पुस्तकास 'आपटे घराण्याचा इतिहास' हें नांव देऊन, अभिप्रायार्थ जगमान्य 'केसरी' वर्तमानपत्राचे संपादकांकडे पाठविलें. 'केसरी'कारांनीं माझ्या या नवीन कल्पनेचा गौरव करून त्यांनीं या लेखकास आज्ञा केली कीं, 'तुम्हीं आपल्या आयुष्यांत निरनिराळ्या ऐतिहासिक कोंकणस्थ घराण्यांची माहिती मिळवून ती पुस्तकरूपानें छापा. आणि कोंकणस्थ ब्राह्मणांचीं जीं कांहीं ४।५ ऐतिहासिक घराणीं आहेत, तीं झाल्यावर इतर ऐतिहासिक घराणीं संशोधनास

घ्या.' या लोकमान्यांचे आज्ञेप्रमाणें संशोधनाचें काम चालविलें आहे. इतिहासाचा अभ्यास करणाऱ्या या अज्ञ लेखकास लोकमान्यांनीं उत्तेजन देऊन कायमची स्फूर्ति उत्पन्न केली. स्फूर्ति कायम होणें याला विशेष कारण माझ्या 'आपटे घराण्याच्या इतिहासा'वर त्यांनीं दिलेला अभिप्राय होय."

आपटे यानीं तयार केलेले 'घराण्यांचे इतिहास' पाहून महाराष्ट्रांत अनेकांनीं आपापल्या घराण्यांचे 'इतिहास' व कुलांचे 'वृत्तांत' लिहावयास घेतले. हे 'इतिहास' व 'वृत्तांत' महाराष्ट्राचा राजकीय तसाच सामाजिक इतिहास अभ्यासिण्याच्या व लिहिण्याच्या दृष्टीनें आज उपयुक्त ठरले आहेत.

आपटे हे १९२५ सालीं गोव्यांत हिंडत असतां तेथील केरी या गांवीं वैद्य नांवाच्या गृहस्थांकडे वारले.

**वाङ्मय :**

(१) निर्मळ क्षेत्रवर्णन व स्थानवर्णन; १९००.
(२) श्रीक्षेत्र वांईवर्णन; १९११.
(३) आपटे घराण्याचा इतिहास; शके १८३६.
(४) ब्रवे घराण्याचा इतिहास; शके १८३८.
(५) संस्थानिक पटवर्धन घराण्याचा इतिहास; १९१९.
(६) सर्व हिंदुस्थानांतील गोखले व गोखले-रास्ते घराण्याचा इतिहास; १९१२.
(७) गोविंद विनायक आपटे यांचा खटला ऊर्फ न्यायाचा मासला : १९०२.

**आपटे, गोविंद सदाशिव** [ १८७०–१९३६ ] ज्योतिषशास्त्रज्ञ. यांचा ज्योतिषशास्त्राचा व पंचांगाचा व्यासंग जबर होता. हे मूळचे सातारचे रहाणारे. यांचें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण पुण्यास व पुढचें उज्जयिनी येथें माधव कॉलेजांत झालें. हे एम्. ए., बी. एस्सी. होते. ग्वाल्हेर व उज्जयिनी येथें सायन्स, गणित व विशेषतः रसायनशास्त्राचे हे अध्यापक होते. कॉलेजांत काम करीत असतांना यांना ज्योतिषशास्त्राचा नाद लागला. हे १९०४ सालीं मुंबईस भरलेल्या अखिल भारतीय पंचांगसभेस उज्जयिनीचे प्रतिनिधि म्हणून उपस्थित होते. १९२५ सालीं पुणें येथें झालेल्या पंचांगसभेंत शुद्ध पंचांग पक्षातर्फे हे पंच होते. यांनीं

ज्योतिर्गणितवार्तिक ' व ' सर्वानंदकरणकम् ' इत्यादि संस्कृत व मराठी ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले आहेत.

यांचे ग्रंथ ग्रहलाघवाच्या धर्तीवर आहेत. त्यांत यांनीं सूक्ष्मता साधण्याकरितां आधुनिक सुधारणा समाविष्ट केल्या आहेत. उज्जयिनीच्या वेधशाळेंत स्वतः वेध घेऊन यांनीं हे ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले असल्यानें त्यांना विशेष महत्त्व आहे. तसेंच प्रथम संस्कृत भाषेंत लिहिल्यानें सर्व प्रान्तांत त्यांचा प्रसार होण्यास मदत झाली आहे. ' सर्वानंदलाघवा' चें त्यांनीं स्वतःच मराठींत भाषांतर केलें. हिंदींतहि पं. मुकुंद वल्लभ मिश्र यांनीं या ग्रंथाचें भाषांतर केलें आहे.

यांनीं पंचांग जलद तयार करण्यास उपयुक्त असणाऱ्या ' पंचांगचिंतामणि ' व ' ग्रहचिंतामणि ' या दोन सारण्या तयार केल्या. यांचें इंग्रजींत लिहिलेलें ' The Initial Point of Our Zodiac ' या नांवाचेंहि एक पुस्तक आहे. शके १८३७ च्या ज्योतिष संमेलनानें ' गणकचूडामणि ' ही पदवी त्यांना दिली होती. [ अ. च. को. ]

**वाङ्मय :**

(१) वल्गनाविवेचन अथवा चहाकाव्य, १९१९.
(२) पंचांगचिंतामणि (शुद्ध पंचांग सारणी), १९३३.
(३) सर्वानन्दलाघव करण ग्रंथ, [मराठी विवरण व उदाहरण यांसहित; संस्कृत, मराठी, इंग्रजी परिभाषेंसह ]; १९३६ इंदूर.

**आपटे, चिंतामण मोरेश्वर** [ ] कादंबरीकार. यांचा जन्म पुण्याजवळील चिंचवड या गांवीं झाला. यांचे वडील मोरशास्त्री आपटे हे चिंचवड येथील सरकारी मराठी शाळेंत पुष्कळ वर्षें शिक्षक होते. ते वैदिकी व वैद्यकीहि करीत. पुढें सरकारनें त्यांस नागपूर येथील मुलींचे शाळेवर मुख्याध्यापक नेमिलें, या नोकरीनिमित्तानें आपटे कुटुंब जें एकदा वऱ्हाडांत गेलें तें तिकडे कायमचेंच स्थायिक झालें.

चिंतामणराव आपटे यांस शालेय शिक्षण विशेषसें मिळालें नसतांहि त्यांनीं स्वावलंबी व्यासंगानें ज्ञान संपादिलें. सात रुपये पगाराच्या शिपायाचे जागेवरून

वाढत वाढत ते रजिस्ट्रेशन खात्यांत इन्स्पेक्टरचे जागेपर्यंत पोंचले. उमरावतीस पुढें एक घर बांधून तेथील ते कायमचे रहिवासी बनले. यानीं नोकरी संभाळून वाचन व लेखन चांगल्या प्रकारचें केलें. यांनीं लिहिलेल्या पुस्तकांत 'पुतळाबाई' व 'शामभट्ट व त्याचा शिष्य बटो' या दोन कादंबऱ्या विशेष प्रसिद्ध आहेत.

'पुतळाबाई' या कादंबरींत "श्री छत्रपति शिवाजी ह्यांच्या कारकीर्दीतील गोष्टी गोंवल्या आहेत. स्वधर्मरक्षणासाठीं, व म्लेंच्छांपासून देशाची मुक्तता करण्याकरितां, शिवाजी प्रभृति मंडळींनीं जीवापाड किती श्रम केले, किती कष्ट भोगले इत्यादि गोष्टींचें चित्र काढलें आहे." "जुन्या बखरी, इतिहास व गोष्टी यांची अतिश्रमानें माहिती मिळवून ही तयारी केली," असें आपटे स्वतःच प्रस्तावनेंत सांगतात. या कादंबरीपेक्षां त्यांच्या 'शामभट्ट आणि त्याचा शिष्य बटो' या कादंबरीची वाखाणणी त्या काळीं विशेष झाली. न्या. मू. महादेव गोविंद रानडे यांनीं या कादंबरीसंबंधीं पुढीलप्रमाणें आपला अभिप्राय व्यक्त केला होता : "अलीकडे बरेच वर्षांत अभिप्रायाकरितां जीं पुस्तकें आलीं, त्यांत या पुस्तकाच्या योग्यतेचें क्वचितच पुस्तक आढळण्यांत आलें. फलज्योतिषावर जी आपल्या लोकांची अत्यंत श्रद्धा आहे, ती बहुतेक अंशीं निर्मूल व अहितकारक आहे हें दाखविण्याचा मुख्य उद्देश मनांत धरून पुस्तककर्ते आपटे यांनीं ही गोष्ट रचली आहे; व त्यांत जरी कांहीं ठिकाणीं मुख्य उद्देशास सुटून विषयांतर झालें आहे, तरी एकंदरींत गोष्टीचें अनुसंधान चांगल्या प्रकारें आरंभापासून शेवटपर्यंत राखलें आहे. फलज्योतिषासारख्या गोष्टीविषयीं लोकांत अश्रद्धा उत्पन्न करण्याचे मुख्य दोन मार्ग : एक तत्त्वविचाराचा, व हल्लींच्या गोष्टीसारखी गोष्ट रचून अत्यंत श्रद्धा ठेवल्यानें व्यवहारांत कसे फसगतीचे प्रकार होतात हें दाखविणें, हा दुसरा मार्ग. तत्त्वविचाराचा मार्ग अशा कामीं फारसा उपयोगीं पडत नाहीं, म्हणून या दुसऱ्या मार्गाचें अवलंबन ग्रंथकर्त्यांनीं केलें आहे तें यथायोग्य आहे. इंग्रजींत स्पॅनिश भाषेंतून भाषांतर झालेलें डॉन क्विक्झोट या नांवाचें एक पुस्तक आहे. सुमारें ४०० वर्षांपूर्वी युरोपांतील कांहीं देशांत वेड्या शिलेदारीचें खूळ फार पिकलें होतें. त्या वेळीं त्या वेडाची फजिती करण्याकरितां म्हणून डॅान क्विक्झोटची गोष्ट स्पेन देशांतील एका ग्रंथकर्त्यानें रचली. त्या गोष्टीच्या धर्तीवर ही शामभट्टाची गोष्ट आपटे यांनीं रचली आहे. इकडे वेड्या शिलेदारीचें खूळ नाहीं, व इकडील रिवाजाप्रमाणें तशा खुळास जागाहि नाहीं, यामुळें मूळ गोष्टीच्या धर्तीवर ही गोष्ट रचतांना त्यासारखें आपले देशांत जे

फलज्योतिषविषयाचें वेड आहे तें घालविण्याच्या उद्देशानें मूळ गोष्टीचें रूपांतर केलें आहे, त्यांत आपटे यांनीं फार कौशल्य दाखविलें आहे. सदरील रूपांतर झाल्यामुळें गोष्टीचें संविधानकहि बदलावें लागलें, त्याप्रमाणें बदलून मुख्य उद्देशास न सुटतां रचना फार चांगली केली आहे. मूळ गोष्टींत ज्याप्रमाणें मुख्य नायक डॉन क्विक्झोट व त्याचा नौकर सांकोपांझा यांचें हुबेहूब चित्र वटविलें आहे त्याचप्रमाणें शामभट्टाचे गोष्टींत 'शामभट्ट' व 'बटो' या पात्रांची योजना होऊन, कथाभाग चांगला साधला आहे. इंग्रजींतून ग्रंथ स्वभाषेंत करणें झाल्यास मुळास किती चिकटून रहावें व कोठपर्यंत रूपांतर करावें याविषयीं नियम घालून देतां येत नाहींत; तथापि आपटे यांनीं ज्याप्रमाणें रूपांतर करून ही गोष्ट रचली आहे, तशा गोष्टी रचल्या गेल्या तर मराठी भाषेची उन्नति खचित होईल. मूळ पुस्तकाचा विस्तार फार मोठा आहे. शामभट्टाच्या गोष्टीचा विस्तार तितका नाहीं; तथापि जे पांच-सात प्रसंग त्यांत वर्णिले आहेत तेवढ्यानें कार्यभाग होणार आहे. फलज्योतिषाच्या ग्रंथाविषयीं माहिती करून घेऊन नंतर पुस्तक लिहिलें आहे किंवा कसें याविषयीं प्रथम थोडीशी शंका वाटत होती, परंतु या पुस्तकांत ज्योतिष ग्रंथांतील वचनांचे जे आधार दिले आहेत ते मुळाशीं तपासून पाहिल्यावरून ती शंका दूर झाली. फलज्योतिषावर अत्यंत विश्वास असल्यानें हल्लीं किती अडचणी येतात याचा विचार केला असतां या भ्रमाचें निरसन होणें अति अवश्य आहे. तो हेतु कांहीं अंशानें तरी ही गोष्ट वाचल्यानें सिद्धीस जाईल असा भरंवसा वाटतो. ग्रंथाची भाषा प्राकृत तऱ्हेची, सर्वांस समजण्यासारखी आहे. केवळ मराठी भाषेच्या अंगीं सर्व रीतीचे अर्थबोध करण्याचें सामर्थ्य किती आहे, हें या पुस्तकांत स्थलविशेषीं चांगलें दिसून येतें. पुस्तकाचा हेतु मुख्यत्वें थट्टा करण्याचा असून ती थट्टा ग्राम्य शब्दांनीं न करतां पात्रांच्या तोंडून सहजगत्या निघालेल्या उद्गारांनीं व एकंदर गोष्टीच्या संविधानकानें स्पष्ट झाली असल्यामुळें वाचकांच्या मनास बोध व आनंद दोन्हीहि होण्याचा संभव आहे. फलज्योतिषाचा ताळा पुष्कळांस पटत नसून श्रद्धा कमी होत नाहीं, यामुळें अशा अस्पष्ट थट्टेच्याद्वारें त्याचें अन्यथा स्वरूप दाखविणें जरूर होतें...नक्षत्रें, ग्रह, व राशी यांच्या ठिकाणीं कार्यकर्तृत्व कल्पितां येणार नाहीं. हें कार्यकर्तृत्व परमेश्वराकडे आहे व त्यानें कांहीं अंशानें मनुष्याच्या स्वाधीन ही गोष्ट ठेविली आहे. हाच मनुष्यजन्माचा मुख्य अधिकार सर्व धर्मांनीं मानिला आहे. ते सर्व धर्मविचार एकीकडे ठेवून, परमेश्वराची सत्ताहि

कमी करून, युक्ति व अनुभव यांचा आधार नसतां, हें जें मिथ्या व वेड्या श्रद्धेचें पाखंड देशांत पसरलें आहे तें ज्या दिवशीं दूर होईल तो सुदिन आहे. तसा सुदिन कांहीं अंशांनीं तरी लवकर आणण्याचें श्रेय आपटे यांस प्राप्त झाल्यास त्यांच्या श्रमाचें साफल्य होईलें. ”

वरील दोन कादंबऱ्यांखेरीज ‘सुमित्र नाटक’, ‘उत्तम शेतकरी’, ‘सत्यासत्य विचार’ अशीं तीन छोटीं पुस्तकें त्यांनीं लिहिलीं आहेत.

**वाङ्मय :**

(१) सुमित्र नाटक; [ अलेक्झांडर डयुमाकृत ‘कॅप्टन पॉल’ चे आधारें ]; १८८७.
(२) पुतळाबाई; १८८९; ऐतिहासिक कादंबरी.
(३) शामभट्ट आणि त्याचा शिष्य बटो; भा. १, २, ३; १८९३.
(४) सत्यासत्यविचार, १८९३.
(५) उत्तम शेतकरी; पांचवी आवृत्ति, १९१४.

**आपटे, दत्तात्रय विष्णु** [ १८८१–१९४३ ] इतिहाससंशोधक; गणितज्ञ. यांचा जन्म ता. १३ मार्च १८८१ रोजीं सांगली संस्थानांतील हनगंडी या गांवीं झाला. त्यांचें इंग्रजी शिक्षण जमखंडी व बेळगांव येथें झालें. १८९७ सालीं ते मॅट्रिकची परीक्षा पास झाले. परीक्षेनंतर एक वर्ष त्यांना घरींच काढावें लागलें. त्या मुदतींत शंकर बाळकृष्ण दीक्षित यांचा ‘ज्योतिर्विलास’ व व्यंकटेश बापूजी केतकर यांचा ‘केतकीग्रहगणितम्’ हे दोन ग्रंथ त्यांच्या वाचण्यांत आले. त्यामुळें ज्योतिर्गणिताची आवड त्यांच्यांत उत्पन्न झाली. त्यांच्या वडिलांना ज्योतिषाचा नाद असल्यामुळें त्यांनीं त्यांना त्या विषयाचा अभ्यास करण्यास उत्तेजन दिलें. पुढें उच्च शिक्षण घेण्याच्या हेतूनें ते दोन वर्षें कोल्हापुरास व तदनंतर पुण्यास येऊन राहिले. बी. ए. चे परीक्षेस त्यांनीं गणित विषय घेतला होता. डॉ. रघुनाथ पुरुषोत्तम

१ हा दीर्घ उतारा येथें हेतुपुरस्सरच दिला आहे. रावसाहेब रानडे यांच्या सारख्यांची अशा वाङ्मयप्रकाराकडे पाहण्याची दृष्टि कशा प्रकारची होती, हें तर कळतेंच, पण तत्कालीन सुविद्य मंडळीचे विचार व अपेक्षा यांचीहि ओळख होते. मराठी कादंबरी त्या वेळीं नुकती कुठें बाळसें धरूं लागली होती.

परांजपे विलायतेहून रँग्लर होऊन फर्ग्युसन कॉलेजांत शिकवूं लागल्यावर, पहिल्याच वर्षी त्यांनीं ज्या विद्यार्थ्यांना गणित विषय शिकविला त्यांपैकीं दत्तोपंत आपटे हे एक होते. दत्तोपंत १९०२ सालीं बी. ए. झाले. परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर कांहीं दिवस मुधोळ येथें शिक्षकाचें काम करून ते वऱ्हाडांत गेले. तेथें ते सर मोरोपंत जोशी यांच्या मुलांस शिकवीत. पण मोरोपंत जोशांकडे ते फार दिवस राहिले नाहींत. त्यांच्या डोक्यांत स्वदेशसेवेचे विचार जोरानें घोळूं लागले होते. १९०५ च्या बंगाल-फाळणीमुळें आपले विचार प्रत्यक्षांत आणण्याची त्यांची धडपड सुरू झाली. स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण या चळवळींना त्या वेळेस भरती येऊं लागली होती. दत्तोपंतांनीं मोरोपंत जोशांकडील नोकरी सोडली व यवतमाळ येथें आपल्या कांहीं समान विचारांच्या स्नेह्यांच्या सहकारितेनें ‘ राष्ट्रीय शाळा ’ स्थापन केली. पृथ्वीराज हरिगीर या नांवाचे एक गृस्थ ‘हरिकिशोर’ नांवाचें एक राष्ट्रीय बाण्याचें साप्ताहिक तेथें प्रसिद्ध करीत असत, त्यांतहि ते नियमितपणें लिहूं लागले. १९०८ सालीं सरकारनें ही शाळा व ‘हरिकिशोर’ पत्र बंद करविलीं. दत्तोपंत मुंबईस आले. तेथें टिळकांच्या राष्ट्रीय पक्षानें चालविलेल्या ‘राष्ट्रमत’ या दैनिकांत ते काम करूं लागले. पुढें ब्रिटिश सरकारनें राष्ट्रीय चळवळच अत्यंत निर्घृणपणें दडपून टाकल्यामुळें हें दैनिकहि संपुष्टांत आलें. ते व त्यांचे स्नेही अत्यंत हाल-अपेष्टा सोसून, कित्येकदां अर्धपोटीं राहूनहि हें दैनिक चालवीत असत. ज्या महत्त्वाकांक्षेला उराशीं बाळगून, अनेक आपत्तींना तोंड देत, त्यांनीं आपलें कार्य चालविलें होतें, तिच्या मुळावरच कुऱ्हाड फेंकली गेल्यामुळें तिच्या ठिकऱ्या ठिकऱ्या झाल्या. सहकारी, स्नेही पांगले; कित्येकांच्या आयुष्याची वाताहत झाली. दत्तोपंतानीं ब्रिटिशनियंत्रित मुलखांतून आपलें पाऊल काढून, पोर्तुगिजांच्या मुलखांत—गोव्यांत—टाकलें. ते निराश झाले नाहींत. त्यांनीं धीर सोडला नाहीं. देशाच्या स्वातंत्र्याचे विचार त्यांच्या डोक्यांत चालूच राहिले. सशस्त्र क्रांति घडवून आणणाऱ्या धड-पड्यांपैकीं त्यावेळेस ते एक होते. १९१४ च्या महायुद्धाचे आरंभीं, एम्डेन या पाणबुडीवरून जर्मनींतून शस्त्रें आणवून तीं गोव्यांत उतरवून घ्यावयाचीं असा आपटे व त्यांचे क्रांतिकारक स्नेही यांचा बेत होता. पण दत्तोपंतांनीं आयत्या वेळीं कच खाल्ली, शस्त्रें ताब्यांत घेण्याचा त्यांना धीर झाला नाहीं. ‘ब्रिटिश गुप्त पोलि-सांच्या जागरूकतेपुढें याबाबत कांहीं हालचाल करणें आपणास अशक्य वाटलें,’ असें ते याचें कारण सांगत.

गोव्यांत, निर्वाहासाठीं त्यांनीं आल्मैद कॉलेज या शिक्षणसंस्थेंत शिक्षकाची नोकरी पत्करली; येथेंच ते पोर्तुगीज भाषा शिकले. येथील वास्तव्यांत त्यांच्या आयुष्याला एक नवीनच वळण लावणारी घटना घडली. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांची व त्यांची पहिली भेट येथें झाली. राजवाडे या सुमारास संशोधनार्थ गोव्यांत भ्रमण करीत होते. त्यांचेबरोबर ते गोव्यांत, तसेंच रत्नागिरी जिल्ह्यांत हिंडले. इतिहाससंशोधनाची दीक्षा त्यांस राजवाड्यांकडून याच काळांत मिळाली. राजवाड्यांच्या सहवासांत ते ताम्रपट, शिलालेख, पोथ्या व जुने फार्सी, मोडी कागद वाचण्यांत अल्पावधींत तयार झाले. 'संस्कृत भाषा व गणित या विषयांत मूळचीच गति असल्यामुळें संशोधनाच्या कालनिर्णय शाखेंत ते सर्वांत पुढें सरसावले.'

१९१६ सालीं बेळगांवास राजकीय परिषद् भरली होती, तिला हजर राहण्याच्या निमित्तानें त्यांनीं गोवें जें सोडलें तें कायमचेंच. लोकमान्य टिळक यांची भेट घेऊन पुढील उद्योगाची निश्चिति करावी असा विचार करून, बेळगांवाहून ते पुण्यास १९१७ सालीं आले. इतिहाससंशोधनाचा नाद त्यांना आतां जडलाच होता, पण त्याबरोबरच राजकीय जागृतीसाठीं कांहीं वैचारिक कार्य करणें आपणास जुळेल किंवा कसें याचा ते विचार करीत होते. टिळकांनीं, 'केसरी'च्या संपादकवर्गांत त्यांनीं यावें अशी आपली इच्छा व्यक्त केली. पण केसरी कचेरींतील एकंदर वातावरण पाहून, आपल्या मनःप्रवृत्तीला तें जुळण्यासारखें नाहीं असें त्यांना वाटलें. इतिहाससंशोधनाकडेच आपण आपलें लक्ष पुरवावें असा त्यांनीं आपल्या मनाशीं निश्चय केला. पण तें निर्वाहाचें साधन होण्यासारखें नव्हतें. त्यासाठीं कांहीं तरी वेगळी व्यवस्था पाहणें त्यांना भागच होतें. त्यासाठीं त्यांनीं चित्रशाळेंत नोकरी धरली व पुढें 'चित्रमयजगत्' या मासिकाचें संपादनहि ते करूं लागले. चित्रशाळेंत त्यांना पगार बेताबाताचाच मिळे. पण त्यांतच समाधान मानून, नोकरीचे वेळेव्यतिरिक्त राहिलेला वेळ ते इतिहासाभ्यासाकडे व संशोधनाकडे खर्च करूं लागले. भारत-इतिहास-संशोधक मंडळाच्या मंदिरांत त्यांची इतिहासोपासना निष्ठापूर्वक सुरू झाली. आयुष्याच्या अखेरपर्यंत ती अप्रतिहत चालली होती.

'चित्रमयजगत्'चे कचेरींत ते सात वर्षें होते. १९२०–२१ सालीं टिळकयुग संपून गांधीयुग सुरू झालें. महाराष्ट्रांतील अनेक नियतकालिकांचीं राजकीय धोरणें बदलूं लागलीं. 'चित्रमयजगत्'चेंहि धोरण बदलूं लागलें. विचारांच्या बदलत्या

प्रवाहांत आपटे यांच्यासारख्या निष्ठावंताला आपले अनेक वर्षांचे विचार बदलणें व चालकांचा सूर ओळखून लिहिणें कठीण वाटूं लागलें; खटका उडण्याचा प्रसंग उद्भवायचेपूर्वीच, आपण परस्परांतील सदिच्छा कायम ठेवून स्वतः होऊन दूर व्हावें हें बरें, असें त्यांना वाटूं लागलें व त्यांनीं चित्रशाळेंतील नोकरी सोडली. त्यानंतरचीं त्यांचीं दोन–तीन वर्षे फारच हलाखीचीं गेलीं. स्वतःचीं पुस्तकें खपवून ते आपली गुजराण कशीबशी करीत. त्यांचें इतिहासविषयक लेखन, वाचन, संशोधन चालूच होतें. १९२४ च्या जानेवारी महिन्यांत, पुणें येथील, संस्कृत ग्रंथांचें संशोधन व प्रकाशन करणाऱ्या 'आनंदाश्रम' या संस्थेच्या व्यवस्थापकाचे जागीं त्यांची नेमणूक झाली. या जागीं ते अखेरपर्यंत होते. या नव्या रोजगारामुळें त्यांच्या मागची आर्थिक विवंचना कांहीं अंशीं सुटली. या संस्थेंत केवळ दैनंदिन कामापुरतेंच लक्ष देऊन ते थांबले नाहींत, तर त्यांनीं अनेक संस्कृत ग्रंथांचा स्वतः सूक्ष्म अभ्यास करून त्यांचें संपादन–प्रकाशन केलें.* "या कालांतील उत्कृष्ट कामगिरीचा भाग म्हणजे संपूर्ण अभ्यासाअंतीं त्यांनीं केलेलें चतुःस्कन्धात्मक 'सिद्धान्तशिरोमणि' या ग्रंथाचें आनन्दाश्रम–संस्कृत-मालेंतील प्रकाशन. 'लीलावती' (१९३७), 'बीजगणित' (१९३०), 'गणिताध्याय' (१९३९), आणि 'गोलाध्याय' (१९४१) हे सर्व प्राचीन टीकांसह प्रकाशित करण्याचें काम त्यांच्या हातून जवळ जवळ पार पडलें. ही त्यांची भारतवर्षाला केवढी मोठी देणगी आहे! तिचें खरें महत्त्व आपण तिचा उपयोग कसा करून घेतों यावरच अवलंबून आहे. आजपर्यंत तरी दत्तोपंतांची ही कामगिरी अद्वितीय आहे. ग्रंथसंपादन करणें म्हणजे काय, याचा तो नमुना आहे; आणि जें त्या पुस्तकांत दिसेल त्यापेक्षां किती तरी अधिक दत्तोपंतांनीं केलेलें आहे. या ग्रंथांतील प्रत्येक सूत्र त्यांनीं हातांनीं गणित करून पारखून मग छापलेलें आहे. प्रकाशकाची भूमिका बाजूला ठेवून लेखकाची, रचनाकाराचीच, भूमिका त्यांनीं त्या प्रकाशनकार्यांत खेळविली असल्यामुळें ह्या चारहि ग्रंथांचें प्रकाशन म्हणजे दत्तोपंतांच्या रूपानें अवतरलेल्या भास्कराचार्यांनींच आपल्या ग्रंथांची द्वितीयावृत्ति काढावी, तशासारखें झालें आहे. अभ्यास, अभ्यास म्हणजे काय असतो याचा, त्या कामांत गढलेल्या दत्तोपंतांना पाहाण्याचें व विषय त्यांपासून समजून घेण्याचें भाग्य ज्यांना लाभलें असेल त्यांना, साक्षात्कार झालाच असला पाहिजे."

---

* कै. दत्तोपंत आपटे, परिचयात्मक लेख; दि. वि. काळे, सह्याद्रि, डिसेंबर १९४३.

" महाराष्ट्रांत भारतीय गणित ज्योतिषाचें अध्ययन करणारे जे फार थोडे लोक आहेत त्यांत दत्तोपंतांची गणना अग्रस्थानींच केली पाहिजे. विशिष्ट ग्रंथांचा अभ्यास पुष्कळांनीं केला असेल, परंतु मुख्य सर्वच ग्रंथ अभ्यासून त्यांची पाश्चात्य ग्रंथांशीं तुलना करण्याची दृष्टि फारच थोड्यांनीं चालविली असेल. विशेषतः ग्रहगणितांत त्यांनीं बरीच उत्क्रांति घडवून आणली असती असें दिसतें. आजतागायत ग्रहणाधिकाऱ्यांचें पूर्णतया आकलन करून स्वतःची अशी एक विशिष्ट विचारसरणी त्यांनीं ठरविली होती. विशेषतः युरोपीयन पद्धतीपेक्षां भारतीय पद्धतीच कशी श्रेयस्कर व सुलभ होती, यावर त्यांचा कटाक्ष होता. युरोपीयन पद्धतींत आक्रमवृत्तावरील संपातबिंदूपासूनच्या ग्रहणमर्यादा ठरवून नंतर गणितानें तें ग्रहण सर्व पृथ्वीवर कोठें कोठें होईल हें निश्चित केलें जातें व त्यावरून एखाद्या विशिष्ट ठिकाणीं तें केव्हां होईल असा विचार करतात. एखादें ग्रहण विशिष्ट ठिकाणीं होईल कीं नाहीं हें या आगाऊ पूर्वतयारीशिवाय सांगतां येणार नाहीं. दत्तोपंतांनीं एखादें सूर्यग्रहण भारतवर्षांत कोठें होईल कीं नाहीं हें निश्चित करणाऱ्या मर्यादा बारकाईनें ठरविण्याचा प्रयत्न चालविला होता व त्याप्रमाणें कांहीं कल्पना बसवून त्यांना मूर्त स्वरूप देण्याचेंहि निश्चित केलें होतें. या संबंधांत दप्तरी व निरनिराळ्या वेधशाळांचे अधिकारी यांच्याशीं त्यांचा पत्रव्यवहार सुरू होता. त्यांच्या या संशोधनाच्या प्रकटनानें पंचांगांतील या एका विशेष गणिताची मोठी सोय झाली असती." आपटे आपलें हें संकल्पित ज्योतिर्गणितविषयक कार्य पूर्ण करण्यास जगले नाहींत. त्यांचा ता. २७ ऑक्टोबर १९४३ रोजीं एकाएकीं हृदयक्रिया बंद पडून अंत झाला.

आपटे यांच्या इतिहासविषयक कामगिरीचें, त्यांच्या नित्य सहवासांतील एक इतिहासलेखक प्रा. रा. वि. ओतुरकर यांनीं पुढीलप्रमाणें थोडक्यांत समालोचन केलें आहे:*

"त्यांचें सारें लक्ष स्वतः इतिहासाचा अभ्यास करून जवळ येणाऱ्या तरुणांना त्या अभ्यासांत गुंतवावें इकडे असे. दत्तोपंतांचें अंतर्मन गेलेलें स्वातंत्र्य भारतास पुनः कसें मिळेल याच्या चिंतनांत गुंतलेलें असे व या चिंतनशील वृत्तींतून मराठ्यांचें स्वातंत्र्य कां गेलें, मराठ्यांनीं राज्य तरी कसें कमावलें व राखलें? या ऐतिहासिक विषयांकडे लागलें. त्या विषयाचा व्याप जसजसा त्यांना दिसूं लागला

* महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, जानेवारी १९४४.

तसतसें ऐतिहासिक तत्त्वज्ञानापेक्षां इतिहासाच्या शास्त्रीय रचनेकडे व त्यासाठीं आवश्यक असलेल्या संशोधनाकडे त्यांचें चित्त गुंतलें. सारांश, त्यांच्या शास्त्रीय संशोधन वृत्तीचा उगम राष्ट्रीय व तात्त्विक विचारसरणींतून झाला होता, व जरी ते मुख्यतः आपला वेळ संशोधनांत व साधनचिकित्सेंत घालवीत तरी इतिहासाची तात्त्विक चर्चा त्यांना फार आवडे. आधुनिक पाश्चिमात्य इतिहासतत्त्वज्ञानी टॉयनबी, स्पेंग्लर यांचे ग्रंथ ते लक्षपूर्वक वाचीत."

"दत्तोपंतांनीं फुटकळ लेख, निबंध पुष्कळ लिहिले तरी त्यांची ग्रंथसंपत्ति मर्यादितच आहे. (१) श्रीरंगपट्टणची मोहीम, पृष्ठसंख्या २४८; (२) शिवभारताची प्रस्तावना, पृष्ठसंख्या २००; (३) मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास, प्रस्तावना, पृष्ठसंख्या १८७; (४) शिवचरित्रप्रदीप व निबंधावली या ग्रंथांतील अनेक शिवचरित्र संशोधनविषयक निबंध हेंच त्यांचें प्रदीर्घ स्वरूपाचें वाङ्मय. या चार ग्रंथांतून कै० दत्तोपंतांचे विशिष्ट गुण नजरेस पडतात. 'श्रीरंगपट्टणची मोहीम' या ग्रंथांत भरपूर पुराव्याच्या तपशीलांतून विषयाची सुसंगत मांडणी व त्यांत मराठ्यांचें 'मराठपणाचें तेज' खुलवून दाखविणें हें कार्य त्यांनीं साधलें आहे. तपशीलाच्या गोंधळांत स्वतःच गडबडून ते गेले नाहींत. 'शिवचरित्रप्रदीपां'तील शिवजन्मतिथीच्या निर्णयावरील त्यांचा निबंध पुढें आलेल्या पुराव्याची शहानिशा कशी करावी, ग्राह्याग्राह्यता कशी ठरवावी, हें दाखविणारा आदर्श निबंध होय. यांतच त्यांच्या ज्योतिर्गणितविषयक ज्ञानाची भर पडल्यानें अनेक सन-शक-मित्यांच्या गुंतागुंतींतून अचूक कालनिर्णयाची पद्धतहि त्यांनीं दाखवून दिली. 'शिवभारता'च्या प्रस्तावनेंत त्यांनीं लिहिलेलीं पहिलीं १ ते १३ व ३४ ते ५९ पृष्ठें नवशिक्यास संशोधनशास्त्रांत प्रवेश करून देण्यास उपयोगी पडतील. 'शिवभारता'ची अवशिष्ट प्रस्तावना व 'मुधोळकर घोरपडे संस्थानचा इतिहास' याची प्रस्तावना या लेखांतून उपलब्ध पुराव्यांवरून सुचणाऱ्या सिद्धान्तांचें त्यांनीं पूर्वग्रहापासून अलिप्त, अनाग्रही पण मुद्देसूद असें तात्त्विक विवेचन केलें आहे. सारांश, तपशीलाची मांडणी, कालनिर्णयाची हातोटी, संशोधनास पद्धतशीरपणा लावून देण्याचें कौशल्य व तात्त्विक विवेचनाचा मगदूर या चतुर्विध कार्यांत दत्तोपंत चतुरस्र होते. विद्यापीठाचा पाठिंबा नसल्यानें मराठी इतिहाससंशोधन एक प्रकारें पोरकें असतांहि मराठी इतिहाससंशोधनास प्रारंभापासून इतर प्रांतांत दिसून न

येणारें शास्त्रीय वळण लागलें ही अभिमानाची गोष्ट आहे व हा अभिमान राज-वाड्यांनंतर सकारण कायम राहण्यास दत्तोपंत आपटे हे कारणीभूत झाले. ही दत्तोपंतांची इतिहासविषयक कामगिरी आहे."

**वाङ्मय :**

(१) ऐतिहासिक दंतकथा व गोष्टी, भा. १ व २; १९३६,१९४२; चित्रशाळा, पुणें.

(२) दोस्तांची श्रीरंगपट्टणावर मोहिम–अथवा सव्वाशें वर्षांपूर्वीचा दक्षिण हिंदुस्थान; १९२१; चित्रशाळा, पुणें.

(३) महाराष्ट्र इतिहासमंजिरी अथवा निवडक ऐतिहासिक उतारे; पूर्वार्ध; चित्रशाळा, पुणें.

(४) संशोधकाची छोटी जंत्री; १९२१; भारत इतिहाससंशोधक मंडळ, पुणें.

(५) करणकौस्तुभ; [संपादित]; १९२७; आनंदाश्रम, पुणें.

(६) गोलाध्याय– पूर्वार्ध व उत्तरार्ध [संपादित], आनंदाश्रम, पुणें.

(७) ग्रहगणित–भा. १ व २; १९३९,१९४१; आनंदाश्रम, पुणें.

(८) चंद्रचूडदप्तर–कला पहिली; गंगोबा तात्यांची कारकीर्द; १९२०; भारत इतिहाससंशोधक मंडळ, पुणें.

(९) बीजगणीत; १९३०; आनंदाश्रम, पुणें.

(९) मराठ्यांच्या इतिहासाचें साहित्य [शेजवल्कर, सरदेसाई, वाकसकर मिळून संपादित ]; १९२४.

(१०) मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास [संपादित] १९३४; आर्यभूषण छापखाना, पुणें.

(११) लीलावती, भाग १ व २ [संपादित]; १९३७; आनंदाश्रम, पुणें.

(१२) लीलावतींतील सार्थ वेंचे; [संपादित] दु. आ. १९४१; के. भि. ढवळे, मुंबई.

(१३) शिवकालीन पत्रसारसंग्रह, भा. १ व २; [संपादित]; १९२९; शिवचरित्र कार्यालय, पुणें.

(१४) शिवचरित्रनिबंधावलि; [संपादित]; १९२९; श्रीशिवचरित्र कार्यालय, पुणें.
(१५) शिवचरित्रप्रदीप; [स. म. दिवेकर मिळून संपादित]; १९२५; भारत इतिहाससंशोधक मंडळ, पुणें.
(१६) शिवाजी निबंधावलि – भा. १ व २; १९२९; शिवचरित्र कार्यालय, पुणें.
(१७) सुवचनानि; [संपादित]; १९३३; के. भि. ढवळे, मुंबई.
(१८) साधनपरिचय अर्थात् महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास; [संपादित–प्रा. रा. वि. ओतुरकर यांच्या सहकार्यानें]; १९४१; अनाथ विद्यार्थीगृह, पुणें.
(१९) दत्तोपंत आपटे लेखसंग्रह; १९४५; अ. वि. गृह प्रकाशन, पुणें.

**चरित्र चर्चा, अभ्यास :**

[१] दत्तोपंत आपटे : व्यक्तिदर्शन; त्र्यं. शं. शेजवलकर; १९४५; इंटरनॅशनल बुक सर्व्हिस, पुणें.
[२] कै. दत्तोपंत आपटे, चरित्रात्मक लेख, दि. वि. काळे, सह्याद्रि, डिसेंबर १९४३.
[३] D. V. Apte, Obituary; T. S. Shejwalkar, New Indian Antiquary, November 1943.
[४] कै. दत्तात्रय वि. आपटे; रा. वि. ओतुरकर; महाराष्ट्र साहित्यपत्रिका, अंक १, वर्ष १७, जानेवारी १९४४.
[५] मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास; परीक्षण; कृ. पां. कुळकर्णी; महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जानेवारी १९३५.

**आपटे, महादेव चिमणाजी** [१८४५–१८९४] कादंबरीकार हरि नारायण आपटे यांचे हे चुलते. मुंबईचे हायकोर्टांत हे वकिली करीत असत. वकिलींत यांनीं अमूप पैसा मिळविला. 'मौंजेच्या चार घटिका' या नांवानें कालिदासाच्या शाकुंतलाचें यांनीं मराठींत भाषांतर केलें आहे, तें चांगलें वठलें आहे. यांनीं लाख दीड लाख रुपये खर्च करून, पुणें येथें संस्कृत ग्रंथांचा संग्रह,

संरक्षण व प्रकाशन करण्याच्या उद्देशानें 'आनंदाश्रम' नांवाची संस्था स्थापन केली. मृत्यूपूर्वी यांनीं संन्यास घेऊन 'आनंदसरस्वती' हें नांव धारण केलें होतें.

**वाङ्मय :**

(१) मौजेच्या चार घटका– भाग १ ला-कालिदासाचें अभिज्ञान शाकुंतल नाटक [सटीक भाषांतर]; १८८१; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(२) अपकृत्यशास्त्र अथवा 'टॉर्ट' व नुकसानाचे परिणाम; [Charles Collet कृत Manual of the Law of Torts and of the Measure of Damages चे आधारें] १८७०; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

**आपटे, वासुदेव गोविंद** [१८७१–१९३०] बालवाङ्मयलेखक, टीकाकार व कोशकार. जन्म पूर्वखानदेश जिल्ह्यांतील धरणगांव येथें झाला. मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण धुळें येथें व पुढील उच्च शिक्षण इंदूर व नागपूरचें हिस्लाप कॉलेज येथें झालें. १८९३ सालीं ते कलकत्ता विश्वविद्यालयाची बी. ए. ची परीक्षा पास झाले. या परीक्षेचा अभ्यास करीत असतांना त्यांनीं बंगाली भाषेचा अभ्यास केला. परीक्षा पास झाल्यावर त्यांनीं नूतन मराठी विद्यालयांत चार वर्षें शिक्षक म्हणून काम केलें व पुढें मुंबई येथें सेक्रेटरिएटमध्यें रिपोर्टर ऑफ धी नेटिव्ह प्रेस ह्या जागेवर फक्त दहा महिने काम केलें. वरिष्ठ अधिकाऱ्यांशीं न पटल्यामुळें त्यांनीं या जागेचा राजिनामा दिला. याच वेळीं इंदूरच्या महाराणीसाहेबांकडून त्यांना राजकन्येसाठीं अध्यापक म्हणून बोलाविण्यांत आलें. वासुदेवरावांनीं मुंबई सोडली आणि ते अलाहाबादेस गेले. राजकन्येची स्वारी तेथेंच होती. अलाहाबादेस त्यांना बरेच दिवस रहावयाला मिळालें. या ठिकाणींच त्यांचा मॉडर्न रिव्ह्यूचे संपादक रामानंद चट्टोपाध्याय यांच्याशीं परिचय झाला. रामनंदांनीं 'मॉडर्न रिव्ह्यू' नुकताच काढला होता. त्यांच्या सांगण्यावरून वासुदेवरावजी मॉडर्न रिव्ह्यूंत मराठी पुस्तकांचें परीक्षण करूं लागले. ते अखेरपर्यंत या मासिकाचे मराठी पुस्तकांचे परीक्षक होते. अलाहाबादेस असतांना त्यांनीं मिसेस हेन्री वुडच्या 'ईस्टलिन्' ह्या कादंबरीचें 'माणिकबाग' नांवानें रूपांतर करून प्रसिद्ध केलें. याच ग्रंथकर्त्रीची दुसरी कादंबरी

'मिसेस हॅल्बिर्टन्स ट्रबल्स्' ही वासुदेवरावजींच्या वाचण्यांत आली. ती त्यांना फारच आवडली आणि 'दुःखाअंतीं सुख' हें नांव देऊन त्यांनीं तिला मराठी वेषांत लोकांसमोर आणलें.

कांहीं दिवस अलाहाबाद व नंतर इंदूर येथें काढल्यावर वासुदेवरावजींना कै. नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांनीं पुण्यास बोलावून घेतलें आणि 'ज्ञानप्रकाश'चें संपादकत्व त्यांजकडे सोंपविलें. वासुदेवरावजींनीं तो दैनिक केला. परंतु प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळें एक वर्षानेंच त्यांनीं संपादकत्व सोडलें. पुढें ते नूतन मराठी विद्यालयांत शिक्षक म्हणून राहिले आणि त्या संस्थेचे आजन्म सेवक झाले. तेथें ते १९१० पर्यंत होते. मध्यंतरीं, १९०६ सालीं वासुदेवरावजींनीं सुप्रसिद्ध 'आनंद' मासिक काढलें.

'आनंद' मासिकाच्या आरंभापूर्वींची थोडीशी हकीगत ऐकण्यासारखी आहे. कै. विनायक कोंडदेव ओक हे 'बालबोध' नांवाचें एक मासिक काढीत असत. ओकांची सुबोध भाषाशैली आणि गोड विवेचनपद्धति वासुदेवरावजींना फार आवडत असे. 'बालबोधां'त कांहीं सुधारणा व्हाव्यात आणि तें सर्वांगसुंदर बालमासिक व्हावें असें वासुदेवरावजींना अंतःकरणपूर्वक वाटत होतें. त्यांनीं ओकांची गांठ घेतली आणि त्यांना आपलें म्हणणें सांगून 'मी पाहिजे तर आपणाला लेखनसाह्य करतों' असेंहि सांगितलें. ओकांना तें पटलें नाहीं. 'माझ्या मासिकांत दुसऱ्याची ओळहि नको. बालबोधांत कांहीं सुधारणा अवश्य आहेत असें मला वाटत नाहीं,' असें ओकांनीं स्पष्ट उत्तर दिलें. यावर वासुदेवरावजींनीं आपल्या बालमासिकाच्या कल्पनांस मूर्तस्वरूप देण्याकरितां 'आनंद' मासिक काढलें.

'आनंदाचें' बालपणीं संगोपन करीत असतां वासुदेवरावजींना अत्यंत त्रास पडला. आर्थिक नुकसान होत होतें. नोकरीचा व्याप पाठीमागें होताच. तरी आपल्या वेतनांतील कांहीं भाग 'आनंदा'करितां खर्च करून आणि टपालापासून तों लेखनापर्यंत सर्व काम स्वतः सांभाळून त्यांनीं 'आनंद' नांवारूपाला आणिला.

१९१० सालीं त्यांना पुनः दुखण्यानें घेरलें. थोडासा आराम पडल्यानंतर त्यांनीं इंदूर येथें चंद्रावती महिला विद्यालयांत नोकरी पत्करली. पुढें इंदूर सरकारनें 'मल्हारी मार्तंड' या पत्राचें संपादकत्व त्यांना दिलें. तें काम त्यांनीं सुमारें पांच वर्षें केल्यानंतर संपादकत्वाचा राजिनामा देऊन ते पुण्यास आले. १९२२ सालीं

त्यांचा एकुलता एक मुलगा वारला. त्यामुळें त्यांच्या जीवितावर औदासीन्याचें धुकें पसरलें. तरी लेखन, वाचन आणि अध्यापन–टिळक महाविद्यालयांत–यांत ते आपलें चित्त नेहमीं गुंतवून दुःखाचा भार हलका करीत. टिळक महाविद्यालयांतील काम त्यांनीं १९२७ सालीं सोडलें. १९२८ सालीं ते आपली पत्नी व एकुलती एक कन्या यांना घेऊन काशीयात्रेला गेले होते. तेथून परत आल्यानंतर 'अशोक चरित्र', 'लेखनकला' या आपल्या पुस्तकांची सुधारून वाढविलेली आवृत्ति त्यांनीं प्रसिद्ध केली आणि 'ज्ञानदीप' व 'भारतकन्या' हीं पुस्तकें लिहिलीं.

वासुदेवरावजींनीं आपल्या हयातींत अनेक विषयांवर विपुल लेखन केलें. 'मराठी शब्द-रत्नाकर', 'शब्दार्थ चंद्रिका', 'मराठी भाषेचे संप्रदाय व म्हणी', 'अशोक चरित्र', 'बौद्धपर्व' इत्यादि त्यांचीं पुस्तकें वाचून त्यांच्या परिश्रमाची, विद्वत्तेची, विवेचनशक्तीची पूर्ण साक्ष पटते. 'दुःखाअंतीं सुख', 'संपूर्ण बंकिम-चंद्र' या कादंबऱ्यांत त्यांचें अप्रतिम रूपान्तरकौशल्य व भाषाप्रभुत्व व्यक्त झालें आहे.

परंतु त्यांचें नांव सर्वतोमुखीं होण्यास त्यांचें बाल वाङ्मय मुख्यतः कारणीभूत झालें. 'बालभारत', 'बालरामायण', 'मनी आणि मोत्या', इत्यादि त्यांचीं पुस्तकें लहान मुलें मोठ्या आवडीनें वाचतात. त्यांनीं मुलांसाठीं लिहिलेलीं इतर पुस्तकेंहि सुंदर आहेत. एखादी गोष्ट सुबोध रीतीनें सांगण्याची हातोटी त्यांना उत्कृष्ट साधली होती. मुलांकरितां लिहिलेलें लिखाण भाषेच्या दृष्टीनें अत्यंत सोपें असावें म्हणून पहिल्या पहिल्यानें तर गोष्ट लिहून होतांच ते ती एखाद्या लहान मुलास वाचून दाखवीत. गोष्टींतील एखादा भाग त्याला समजला नाहीं असें दिसून आलें तर तेवढाच पुनः लिहून काढीत. आपल्या लिखाणांत दुर्बोधता, अनौचित्य किंवा अनैसर्गिकता मुळींच राहूं नये याविषयीं ते फार काळजी घेत.

वासुदेवरावजींची लेखनाची शिस्त वाखाणण्यासारखी होती. ज्या विषयावर लिहावयाचें त्याची सांगोपांग माहिती मिळवून ते टांचण तयार करीत. नंतर त्या विषयाचा सर्व बाजूंनीं विचार करून ते लिहावयास बसत. लिहिणें कसें रेखीव! तर्कांचे दुवे कुठें निखळलेले दिसावयाचे नाहींत. शाब्दिक कोट्या, कल्पनेच्या भराऱ्या किंवा चमत्कृतिपूर्ण आकर्षक शब्दरचना यांच्या नादीं लागून विषयांतर, अर्थ-विपर्यास, क्लिष्टता, किंवा वृथा पांडित्य केलेलें वासुदेवरावजींच्या लिखाणांत कोठें

आढळणार नाहीं. 'शब्दरत्नाकरा'ची प्रस्तावना, अशोक व बुद्ध यांच्या चरित्रांतील विवेचन, लेखनकलेंतील चर्चात्मक भाग इत्यादि त्यांच्या वाङ्मयांतील स्थळें लेखनाचे नमुने म्हणून नवीन लेखकांनीं पुढें ठेवण्यासारखे आहेत. त्यांच्या अदूषित आणि सुबोध लेखनानेंच त्यांना इतकी मान्यता मिळाली. [संक्षेप : गो. ग. तळवल्करकृत चरित्रात्मक निबंध, यशवंत, फेब्रु. १९३० ]

वासुदेवरावजींनीं १९२० सालीं, विलायतेंतील मुलांच्या साप्ताहिकाच्या धर्तीवर 'विचारसाधन' नांवाचें एक वर्तमानपत्र काढलें होतें. पण तें फार दिवस चालूं शकलें नाहीं. महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे ते जवळ जवळ दहा वर्षे चिटणीस होते.

**वाङ्मय :**

(१) नवयुग, सामाजिक कादंबरी; [जुन्या व नव्या युगांतील बऱ्यावाईट गोष्टींचें चित्र]; १९०३; का. र. मित्र, मुंबई.
(२) माणिकबाग; [मिसेस हेन्री वुडकृत 'ईस्ट लीन' या कादंबरीचें रूपांतर] द्वि. आ. १९१४, तृ. आ. १९२३, मनोरंजन छापखाना, मुंबई.
(३) दुःखाअंतीं सुख; [ मिसेस हेन्री वुडकृत ' मिसेस हॅलीबर्टन्स ट्रबल्स ' या कादंबरीचें रूपांतर];चौथी आवृत्ति१९१४; मनोरंजन छापखाना, मुंबई.
(४) विलक्षण भोळेपणा; [सॅम्युएल लव्हरकृत ' हॅंडी अँडी 'च्या आधारें]; द्वि. आ. १९२४; मनोरंजन छापखाना, मुंबई.
(५) मूर्तिमंत देशाभिमान; ऐ० कादंबरी [राजाराम महाराजांची कारकीर्द व तत्कालीन समाजस्थिति], १९०७; प्र. का. र. मित्र, मुंबई.
(६) संपूर्ण बंकिमचंद्र-प्रथम खण्ड [इंदिरा; सिताराम; विषवृक्ष] १९२३; भारत गौरव ग्रंथमाला, मुंबई.
(७) ,, – द्वितीय खण्ड [दुर्गेशनंदिनी; आनंदमठ; मृणालिनी]; १९२३; भा. गौ. ग्रं. माला, मुंबई.
(८) ,, तृतीय खण्ड [कृष्णकांताचें मृत्युपत्र; कपालकुंडला; देवी चौधुराणी; चंद्रशेखर]; १९२४; भा. गौ. ग्रं. माला, मुंबई.
(८) ,, चतुर्थ खण्ड [रजनी; युगलांगलीय; राधाराणी; राजसिंह] १९२५; भा. गौ. ग्रं. माला, मुंबई.

(९) मराठी भाषेचे संप्रदाय व म्हणी; १९१०, आर्यभूषण, पुणें; १९२६, आनंद छापखाना, पुणें.
(१०) व्यावहारिक संस्कृत-मराठी कोश; १९१३, आर्यभूषण, पुणें.
(११) बंगाली-मराठी कोश; शके १८४७; आनंद छापखाना, पुणें.
(११) मराठी शब्दरत्नाकर; १९२२, १९३२, आनंद छापखाना, पुणें.
(१२) मराठी बंगाली शिक्षक; तृ. आ. १९२५; आनंद छापखाना, पुणें.
(१३) मराठी भाषेची मूळ पीठिका; १८८३; न्यायसुधा, हरदा.
(१४) मराठी भाषेची शब्दसंपत्ति; १९२२; आनंद छापखाना, पुणें.
(१५) सौंदर्य आणि ललितकला; १९१९, १९२१; लक्ष्मीनारायण, मुंबई.
(१६) लेखनकला आणि लेखनव्यवसाय; १९२६, आनंद छापखाना, पुणें.
(१७) भवभूति; [विविधज्ञान विस्तारांतील निबंध]; कर्नाटक छापखाना, मुंबई.
(१८) मत्स्य पुराण; [मत्स्य पुराणसार; सूचीसह]; १९१२; इंदुप्रकाश, मुंबई.
(१९) जैन धर्म; १९०४; जैनेंद्र छापखाना, कोल्हापूर.
(२०) बौद्धपर्व अथवा बौद्धधर्माचा साद्यंत इतिहास; १९१४; यशवंत छापखाना, पुणें.
(२१) रवीचे उज्वल किरण; [रवीन्द्रनाथ टागोर यांच्या अनुवादित कथा]; १९२०; आनंद छापखाना, पुणें.
(२२) बालोद्यान पद्धतीचें गृहशिक्षण; [फ्रोबेलच्या अभिनव बालशिक्षण पद्धतीचें सांगोपांग विवेचन]; १९१८; श्रीसयाजीविजय छापखाना, बडोदें.
(२३) बालक, त्याची प्रकृती आणि संवर्धन; ['टेम्पल प्रायमर्स सिरीज'-मधील 'धि चाइल्ड, हिज नेचर ॲण्ड नर्चर' या पुस्तकाचें रूपांतर]; १९३१; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.
(२४) अरविंद बाबूंचीं आपल्या पत्नीस पत्रें; १९१४; आनंद, पुणें,

बालवाङ्मय:

(२५) मनी आणि मोत्या; १९१३; तृ. आ. १९२२; आनंद, पुणें,
(२६) एक दिवसाच्या सुट्टींत; १९१६; आनंद, पुणें.

(२७) कां व कसें ? भा. १, २, ३; द्वि. आ. १९२९; आनंद, पुणें.

(२८) बालभारत; द्वि. आ. १९३१; आनंद, पुणें.

(२९) बालभागवत; च. आ. १९२७; आनंद, पुणें.

(३०) बालरामायण; च. आ. १९२९; आनंद, पुणें.

(३१) रामायणांतल्या सोप्या गोष्टी; १९०६; निर्णयसागर, मुंबई.

(३२) ल्हान मुलांसाटीं मौजेच्या गोष्टी, भा. १, च. आ. १९२२; आनंद, पुणें.

(३३) बालमनोरंजन; १९१५; लक्ष्मीनारायण, मुंबई.

(३४) वाल्मीकीचा जय; [हरप्रसादशास्त्री यांच्या 'वाल्मीकीर जय' या बंगाली पुस्तकाचा अनुवाद]; १९१०; भट आणि मंडळी, पुणें.

(३५) ल्हान मुलांमुलींसाटीं अगदीं सोपें रामायण; १९२१, १९३३; आनंद, पुणें.

(३६) चित्तरंजन अथवा मुलांचें अरेबियन नाइटस्—भाग १, २; १९११ कर्नाटक, १९२०, १९३०; आनंद, पुणें.

(३७) महर्षींचा प्रसाद, द्रोण १ ला—२ रा; १९२३; आनंद, पुणें.

(३८) महाभारतांतील सोप्या गोष्टी; पूर्वार्ध; आ. ७ वी १९२६; आनंद, पुणें.

(३९) भारतकन्या; १९२९, तत्त्वविवेचक, मुंबई.

(४०) साधुसंतांच्या गोष्टी; श्री लक्ष्मीनारायण प्रेस, मुंबई.

(४१) परीस्तानांतल्या गोष्टी; आनंद, पुणें.

(४२) बालविनोदमाला, भा. १ ते ४; १९२०; आनंद, पुणें.

(४३) बालविहारमाला, भा. १ ते ४; १९३०; आनंद, पुणें.

(४४) वीरांच्या कथा—भा. १; जगद्धितेच्छु, पुणें.

(४५) मराठ्यांचा दरारा—अथवा मराठ्यांच्या बंगाल प्रांतावर स्वाऱ्या; १९१६; लक्ष्मीनारायण, मुंबई.

(४६) मुलांचा विविधज्ञानसंग्रह; १९१७; आनंद, पुणें.

(४७) मुलांचें शहाणपण; १९२७; आनंद, पुणें.

(४८) नाट्यरूप भारतवर्ष—भा. १ ला; आनंद, पुणें.

(४९) गोष्टींच्या रूपानें सांगितलेला महाराष्ट्र देशाचा बालबोध इतिहास–भा. १; १९०७, जगद्धितेच्छु, पुणें.
(५०) हिंदुस्थानचा सचित्र मनोरंजक इतिहास; आनंद, पुणें.
(५१) पेशवाईची हकीगत; पां. आ. १९२४; चित्रशाळा, पुणें.
(५२) राष्ट्रीय शिक्षणाचे शिशुपाठ, पुस्तक १ ते ४; १९२३, १९२४; आनंद, पुणें.
(५३) देशभक्तिपर वाचनपाठ, भा. १ ते ४; १९२१, १९२२; आनंद, पुणें.

सा मा जि क ल घु क था

(५४) त्रिवेणी, [' अवगुंठिता' या बंगाली कथेवरून]; १९१२; जगद्धितेच्छु, पुणें.
(५५) मोतीमिनार; [अकबरकालीन गोष्ट]; १९१२, आर्यभूषण, पुणें.

**आपटे, विष्णु गोपाळ** [१८५१–१८९९] वैद्यकीय ग्रंथांचा लेखक. मराठी व इंग्रजी शिक्षण धारवाड व कोल्हापूर येथें झालें. राजाराम हायस्कुलांतून मॅट्रिक झाले. परीक्षेंत उत्तम रीतीनें उत्तीर्ण झाल्यावरून यांस आल्फ्रेड शिष्यवृत्ति मिळाली. त्यामुळें उत्साहित होऊन त्यांनीं वैद्यकीय शिक्षण घेतलें व एल्. एम्. एस्. ही पदवी पहिल्या वर्गांत येऊन मिळविली. कांहीं वर्षे सरकारी नोकरी केल्यावर यांची नेमणुक कोल्हापुरास दरबारचे असिस्टंट सर्जनचे जागीं झाली. तेथेंच ते अखेरपर्यंत काम करीत असत. हे व्यासंगी व शोधकबुद्धीचे होते. त्यांनीं 'ग्रामवैद्य', 'प्रसूतिचिकित्सा' व 'न्यायवैद्यक' असे तीन ग्रंथ लिहिले आहेत. वैद्यकीमध्यें ते फार निष्णात असून आपल्या शांत, निरभिमानी, व परसेवापरायण स्वभावामुळें ते कोल्हापूरच्या प्रजेस फार प्रिय झाले होते.

**वा ङ्म य :**

(१) ग्रामवैद्य अथवा खेड्यांतील प्रजा निरोगी राखण्याचे उपाय; १८८५; कोल्हापूर.
(२) न्यायवैद्यक; [कोल्हापूर येथील 'ग्रंथमालें'तून प्रसिद्ध]
(३) प्रसूतिचिकित्सा.

**आपटे, हरि नारायण** [१८६४–१९१९] कादंबरीकार. यांचा जन्म खानदेशांतील पारोळें या गांवीं ता. ८ मार्च १८६४ सालीं (मंगळवार मिति माघ वद्य अमावास्या शके १७८५) झाला. यांचें प्राथमिक शिक्षण मुंबईत नाना शंकरशेटच्या शाळेंत व इंग्रजी तीन इयत्तांपर्यंतचें गिरगांव बॅकरोडवरील 'बिशप हायस्कूल' मध्यें झालें. १८७८ सालीं त्यांच्या वडिलांनीं आर्थिक कारणाकरितां आपली कुटुंबीय मंडळी पुण्यास धाडली व तेथें शेवड्यांच्या बोळांतील जानवेकरांच्या वाड्यांत बिऱ्हाड केलें. येथपासून हरिभाऊंचें आयुष्य पुण्यासच गेलें. त्यांनीं आपलें नांव त्या वेळेस सरकारी व्यवस्थेखालीं चाललेल्या 'पूना हायस्कूल'मध्यें दाखल केलें. या वेळेस हायस्कूलचे मुख्याध्यापक प्रसिद्ध विद्वान् व पट्टीचे वक्ते महादेव मोरेश्वर कुंटे हे असून प्रो. जिन्सीवाले, विष्णुशास्त्री चिपळूणकर यांसारखी मंडळी अध्यापक होती. यांपैकीं विष्णुशास्त्री चिपळूणकरांकडे हरिभाऊंचा ओढा विशेष असे. आणि त्यामुळेंच, विष्णुशास्त्र्यांनीं आपल्या जागेचा राजीनामा देऊन, ता. १ जानेवारी १८८० रोजीं 'न्यू इंग्लिश स्कूल' ही स्वतंत्र शाळा सुरू करतांच, सरकारी शाळा सोडून ते या शाळेंत दाखल झाले. न्यू इंग्लिश स्कूलच्या प्रतिष्ठापनेच्या दिवशीं जीं १९ मुलें हजर होतीं त्यांपैकीं हरिभाऊ हे एक होते. शास्त्रीबोवांबद्दल वाटणाऱ्या असीम आदरामुळेंच केवळ ते या शाळेंत आले. शाळेच्या शिक्षकवर्गात टिळक, आगरकर, नामजोशी, वासुदेवशास्त्री खरे, हरि कृष्ण दामले, नंदर्गीकरशास्त्री, संस्कृत कोशकार वामन शिवराम आपटे यांसारखी मंडळी होती.

हरिभाऊ न्यू इंग्लिश स्कूलमध्यें दाखल झाले त्या वेळीं ते इंग्रजी सहावीच्या (हल्लींचा दहावा) वर्गात होते. विष्णुशास्त्री व आगरकर इंग्रजी शिकवीत. टिळक गणित घेत, तर आपटे, खरे व नंदर्गीकरशास्त्री संस्कृत शिकवीत. आगरकर इतिहासहि शिकवीत. अशा या थोर शिक्षकांच्या सहवासांत त्यांच्यांतील ज्ञानाभिलाष वाढून विचारांना योग्य असें वळण लागूं लागलें. वर्गातील अभ्यासाव्यतिरिक्त संस्कृत व इंग्रजी वाङ्मयाचें अवांतर वाचन त्यांनीं विपुल केलें. त्या वयांत त्यानीं कालिदासाचीं बहुतेक सर्व काव्य-नाटकें, त्याचप्रमाणें मिल्टन, शेक्सपिअर, स्कॉट, शेली, कीट्स, मोलीएर, डीकन्स, जेन ऑस्टिन इत्यादींचे ग्रंथ वाचून काढले होते. शास्त्रीबोवांना रेनॉल्डसच्या कादंबऱ्या आवडत म्हणून त्याहि

त्यांनीं वाचल्या. संस्कृत, इंग्रजी व मराठी या विषयांतील त्यांच्या प्रावीण्याबद्दल शिक्षकमंडळींत त्यांचेबद्दल गौरवोद्गार निघत.

१८८२ सालच्या मार्च महिन्यांत विष्णुशास्त्री चिपळूणकर आकस्मिक रीतीनें निधन पावले. हरिभाऊंना त्यामुळें अतिशय दुःख झालें. शास्त्रीबोवा हे त्यांच्या जीवनाचे आदर्श बनले होते. त्यांच्याप्रमाणें विद्याव्यासंग करून आपण आदर्श ग्रंथकार बनावयाचें अशी महत्त्वाकांक्षा त्यांनीं धरली होती. शास्त्रीबोवांच्या मृत्यूमुळें आपला एक मोठा आधार नाहींसा झाला असें त्यांस वाटून ते शोकाकुल झाले. आणि त्या अवस्थेंत त्यांनीं आपल्या अंतःकरणांतील वेदनांना वाट काढून देण्या-करितां 'शिष्यजनविलाप' ही कविता लिहिली. अनेक वृत्तांत लिहिलेली ही ८९ श्लोकांची कविता आहे. ही कविता शास्त्रीबोवांच्या निधनाच्या दहाव्या दिवशीं पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यांत आली. कवीचें नांव त्यावर छापलें नव्हतें. पण ती इतकी लोकप्रिय झाली कीं, दोन दिवसांत तिच्या हजार प्रती खपल्या. आगरकरांनीं या कवितेचें एका जाहीर सभेंत कौतुक करून म्हटलें, कीं 'ज्या संस्थेंत शिक्षण घेणारे विद्यार्थी इतकें सुंदर काव्य निर्माण करूं शकतात, त्या संस्थेचा भविष्यकाळ उज्ज्वल स्वरूपाचा खात्रीपूर्वक होईल.'

विष्णुशास्त्री वारले त्यानंतर दोन-तीन महिन्यांनीं शाळेवर दुसरी एक आपत्ति ओढवली. टिळक व आगरकर यांजवर कोल्हापूरप्रकरणीं बनावट पत्रें 'केसरी' व 'मराठा' या पत्रांत प्रसिद्ध केल्याच्या आरोपावरून खटला भरण्यांत येऊन त्यांस चार महिने साध्या कैदेची शिक्षा करण्यांत आली. जनमत त्याविरुद्ध फार खवळलें होतें. शिक्षा रद्द व्हावी यासाठीं खूप चळवळहि झाली. विद्यार्थ्यांनीं टिळक-आगर-करांना खटला लढविण्यासाठीं मदत म्हणून एक मोठा निधि उभारला. यांत हरिभाऊंनीं प्रामुख्यानें पुढाकार घेतला होता. पुढें या चळवळीस यश न येतां टिळक-आगरकर यांस कैदेंत दिवस काढावे लागलेले पाहून त्यांना व त्यांच्या कांहीं मित्रांना इतकें वाईट वाटलें कीं, दोघेहि सुटून येईपर्यंत त्यांनीं शाळेंत पाऊल टाकलें नाहीं. याचा परिणाम त्यांच्या अभ्यासावर होऊन, ते त्या वर्षाच्या मॅट्रिकच्या परीक्षेस बसूं शकले नाहींत; परीक्षा पास होण्यास त्यांना आणखी एक वर्ष लागलें. १८८३ सालीं ते मॅट्रिक झाले व त्याच वर्षी उच्च शिक्षणाकरितां त्यांनीं पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत प्रवेश केला.

हरिभाऊंचें विद्यालयीन अभ्यासाकडे लक्ष असण्यापेक्षां अवांतर वाचनाकडेच तें अधिक असे. गणितविषयाचा तर त्यांना मूळचाच कंटाळा. त्यामुळें इंग्रजी, संस्कृत वगैरे विषयांत भरपूर गुण मिळूनहि गणित विषयांतील कच्चेपणामुळें ते प्रिव्हियसची परीक्षाहि उत्तीर्ण होऊं शकले नाहींत. एक वर्ष डेक्कन कॉलेज सोडून ते फर्ग्युसन कॉलेजांतहि दाखल झाले होते. पण तेथेंहि तीच स्थिति. अखेर परीक्षेचें धार्जिणें आपल्याला नाहीं हें ओळखून १८८६ अखेर त्यांनीं कॉलेजचा कायमचा निरोप घेतला. कॉलेजांत घालविलेल्या या काळाचा परीक्षेंत यश मिळविण्याच्या दृष्टीनें जरी उपयोग झाला नाहीं, तरी त्यांचा संकल्पित भावी आयुष्यक्रम यशस्वी होण्याच्या दृष्टीनें पुष्कळच उपयोग झाला. हरिभाऊंनीं कॉलेजांतील हीं वर्षें अनेक विषयांवरील ग्रंथांच्या वाचनांत घालविलीं. काव्य, कादंबरी, नाटक, तत्त्वज्ञान, इतिहास, साहित्यशास्त्र या शाखांतील अनेक नामांकित ग्रंथकारांच्या ग्रंथांचा त्यांनीं बारकाईनें अभ्यास केला. आगरकर, वामन शिवराम आपटे, डॉ. भांडारकर, झळकीकरशास्त्री, वासुदेवराव केळकर अशांचें त्यांस सान्निध्य घडून ग्रंथवाचनाला पद्धतशीर वळण लागलें, त्यांची दृष्टि व्यापक बनली; वाङ्मयीन महत्त्वाकांक्षा त्यांच्या मनांत रुजल्या, अंकुरल्या व द्रुतगतीनें वाढ घेऊं लागल्या.

हरिभाऊ शाळेंत असल्यापासून 'केसरी' वगैरे पत्रांतून लेख लिहूं लागले होते आगरकरांसारख्या आपल्या विद्वान् गुरूच्या 'विकारविलसित' या नाटकावर सडेतोड व विस्तृत टीका लिहिण्याइतकी त्यांची तयारी झाली होती. 'निबंधचंद्रिके'तील (१८८२) त्यांचा हा ७२ पानी टीकात्मक लेख वाचून अनेकांना आश्चर्य वाटलें. खुद्द आगरकरांना, त्यांत प्रतिकूल सूर असूनहि, वैषम्य न वाटतां आनंदच वाटला. आपल्या विद्यार्थ्यानें इतक्या चिकित्सक, स्वतंत्र, व निर्भीड दृष्टीनें टीकालेख लिहिला ही त्यांना अभिमानाची व आनंदाचीच गोष्ट वाटली. लेखापेक्षांहि शेक्सपियरच्या नाटकांचा त्यांनीं केलेला सूक्ष्म अभ्यासच त्यांना अधिक कौतुकास्पद वाटला. हरिभाऊंना ही दृष्टि येण्यास प्रो. वासुदेवराव केळकर यांचें सान्निध्य हेंच बव्हंशीं कारण होतें. वासुदेवरावांचें इंग्रजी वाङ्मयाचें वाचन दांडगें होतें. विशेषतः शेक्सपियरच्या नाटकांचा त्यांच्याइतका व्यासंग इंग्रज प्रोफेसरांतहि क्वचित् आढळे. विद्यार्थी त्यांच्या मार्मिक विवेचनशैलीवर नेहमींच खूष असत. त्यांच्या निर्भेळ वाङ्मयभक्तीबद्दल त्यांना केवळ कौतुकच नव्हे तर आदरहि वाटे.

१८८६ सालीं हरिभाऊंनीं कॉलेज सोडलें तेव्हां त्यांचा वाङ्मयविषयक व्यासंग कोणाहि विश्वविद्यालयीन उच्च पदवीधरापेक्षां अधिक होता. पण पदवीविना त्या व्यासंगाला व्यावहारिक जगांत मोल नव्हतें. हरिभाऊंचे चुलते व वडील यांस त्यांनीं हा असा शिक्षणक्रम बंद केल्याबद्दल फार वाईट वाटलें. विशेषतः त्यांचे चुलते महादेव चिमणाजी यांस ती गोष्ट फारच लागली. ते स्वतः बी. ए., एल एल. बी असून मुंबई हायकोर्टांतील एक भरभराटीस आलेले पहिल्या दर्जाचे नामांकित वकील होते. आपल्या पुतण्यानें आपल्याप्रमाणेंच कायद्याची परीक्षा पास होऊन आपल्या व्यवसायांत पडावें व नांवलौकिक मिळवावा अशी त्यांची इच्छा होती. पण ती सफल होण्याचें चिन्ह नाहीं असें त्यांना कळतांच, त्यांनीं त्यांस पुस्तकप्रकाशनाच्या धंद्यांत पडण्याचा सल्ला दिला व छापखान्याच्या कामाची माहिती व्हावी म्हणून त्यांस कांहीं दिवस मुंबईतील जगदीश्वर छापखान्यांत सहा महिने उमेदवार म्हणून ठेविलें. पण हरिभाऊंचें त्यांतहि कांहीं लक्ष लागेना. त्यांची इच्छा आपलें आयुष्य वाचन-लेखनांत घालविण्याची होती. ती ज्यायोगें साधेल असाच व्यवसाय त्यांना हवा होता. पुस्तक-प्रकाशनाचा धंदा त्यांना साहाय्यकच झाला असता. पण त्याची व्यावहारिक बाजू सांभाळणें आपल्या हातून शक्य होणार नाहीं व चुलत्याचे पैसे बुडवायला मात्र आपण कारण होऊं असें वाटल्यावरूनच केवळ त्यांनीं चुलत्याची सूचना मान्य केली नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं (१८८८) त्यांच्या मित्रमंडळीनें 'कुळकर्णी आणि मंडळी' नांवाची एक प्रकाशनसंस्था स्थापन केली. या संस्थेचे ते एक भागीदार बनले. या संस्थेच्या द्वारा, त्यांचें नांव मराठी वाङ्मयांत अमर करणाऱ्या कादंबऱ्या ज्यांतून पहिल्यानें प्रकाशित झाल्या, तें 'करमणूक' पत्र निघूं लागलें. हें साप्ताहिक पत्र १८९० सालच्या ऑक्टोबर महिन्याच्या शेवटच्या शनिवारीं विजयादशमीच्या सुमुहूर्तावर सुरू झालें. या पत्राचें संपादन हाच हरिभाऊंच्या आयुष्यांतील मुख्य व्यवसाय बनला. सतत सत्तावीस वर्षे त्यांनीं हें पत्र चालविलें. त्यांच्या चुलत्यांना, आपल्या पुतण्यानें वृत्तपत्रव्यवसायांत पडावें हें तितकेंसें पसंत नव्हतें, परंतु त्याच्यांतील वाङ्मयगुणांना वाव मिळून त्याचा लौकिक होईल अशी त्यांना खात्री वाटत होती. हरिभाऊंना त्यांच्या कलाप्रमाणेंच आपलें आयुष्य घालवावयाला वाव देणेंच अधिक इष्ट असें त्यांच्या दूरदृष्टीला वाटून त्यांनीं त्यांच्या योगक्षेमाची कायमची व्यवस्था करण्याची योजना केली.

हरिभाऊंचे चुलते महादेव चिमणाजी यांनीं कीर्तीप्रमाणेंच संपत्तीहि विपुल

संपादिली होती. त्यांना मूलबाळ नव्हतें. हरिभाऊंनाच ते आपला मुलगा मानीत. त्यामुळें त्यांना आयुष्यांत कशाचीच उणीव न पडतां, त्यांच्यांतील नैसर्गिक गुणांची वाढ होण्यास त्यांस आवश्यक तें स्वातंत्र्य व स्वास्थ्य मिळावें यासाठीं पुण्यास लाख–दोन लाख रुपये खर्च करून 'आनंदाश्रम' नांवाची संस्था त्यांनीं स्थापन केली. या संस्थेचें मुख्य कार्य हिंदुस्थानांतील प्राचीन ग्रंथ मिळवून, त्यांचें रक्षण व प्रकाशन करणें हें असावें असें त्यांनीं ठरवून देऊन, त्यासाठीं एक भव्य इमारत बांधून दिली व द्रव्याचीहि कायमची व्यवस्था केली. या संस्थेच्या व्यवस्थापकाचें काम त्यांनीं हरिभाऊंकडे सोंपवून त्यांना त्याबद्दल मासिक तनखाहि ठरवून दिला. या व्यवस्थेमुळें हरिभाऊंना आर्थिक दृष्ट्या स्थैर्य प्राप्त होऊन, त्यांच्या आवडीच्या कामांत लक्ष गुंतवावयास भरपूर अवसर मिळाला. मराठी भाषेवर महादेव चिमणाजींचे हे फार मोठे उपकार समजले पाहिजेत.

'करमणूक' व 'आनंदाश्रम' यांचीं कामें सांभाळून अनेक प्रकारच्या सार्वजनिक कामांत हरिभाऊ भाग घेत असत. तत्कालीन राजकीय, सामाजिक, शैक्षणिक, औद्योगिक, वाङ्मयिक चळवळींत ते प्रामुख्यानें भाग घेतांना आढळत. ते पुणें म्युनिसिपालिटीचे १९००–१९१९ पर्यंत सभासद असून शेवटचीं तीन वर्षें अध्यक्ष होते. राजकारण व समाजसुधारणा या बाबतींत ते रानडे, गोखले, आगरकर यांचे अनुयायी होते. महाराष्ट्रांतील बहुतेक सांस्कृतिक चळवळींत ते कांहीं ना कांहीं भाग घेतांना आढळत. मराठी साहित्यविषयक चळवळींत तर ते प्रामुख्यानें भाग घेत. १९१२ सालीं अकोला येथें भरलेल्या साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान याचमुळें त्यांस इतर वयस्क साहित्यिकांचे आधीं मिळाला.

अखेरी अखेरीच्या वर्षांत हरिभाऊंचें लेखनावरील लक्ष उडून सार्वजनिक खटाटोपांकडेच अधिक खेंचलें गेलें होतें. त्यामुळें सतत २७ वर्षें चाललेलें 'करमणूक' पत्रहि १९१७ सालीं बंद करण्याची पाळी आली. त्यांचा सारा वेळ व सारी शक्ति त्यांतच प्रमाणाबाहेर खर्च होऊं लागली होती. त्याचा परिणाम त्यांच्या प्रकृतीवर होऊन ती खालावत चालली व ती विकोपास पोंचून ता. ३ मार्च १९१९ रोजीं त्यांचा पुणें येथें अंत झाला. त्यांचें वय त्या वेळेस पंचावन्न वर्षांचें होतें.

हरिभाऊंचा साहित्यसंसाराला पद्धतशीर प्रारंभ 'करमणूक' पत्रापासूनच होतो. तसें म्हटलें तर त्यांच्या लेखनाला सुरुवात विद्यार्थीकालांतच झाली. त्यांची 'मधली स्थिति' ही पहिली कादंबरी १८८६ सालीं 'पुणें वैभव' या साप्ताहिकाची मासिक पुरवणी म्हणून प्रसिद्ध होऊं लागली होती; पुढें १८८८ सालीं 'कुलकर्णी आणि मंडळी' नें ती पुस्तकरूपानें प्रसिद्ध केली. त्यांचें स्फुट लेखनहि 'मनोरंजन आणि निबंधचंद्रिका' या मासिकांतून प्रसिद्ध होत होतें. पण हें सारें हौसेखातर चाललें होतें. व्यवसाय म्हणून हरिभाऊंनीं लेखनाला प्रारंभ 'करमणुकी'पासूनच केला.

हरिभाऊंनीं आपल्या 'करमणूक' पत्राचा पुढीलप्रमाणें उद्देश सांगितला आहे. "केसरी, सुधारक एखाद्या कठोर पित्याप्रमाणें कठोर शब्दानें सांगणार व समाजाचें अप्रशस्त वर्तन झाल्यास वेळीं वाक्प्रतोदाचे तडाके लगावणार, तीच गोष्ट हें पत्र प्रेमळ मातेप्रमाणें गोड गोड शब्दांनीं व चांगल्या चांगल्या गोष्टींनीं अप्रशस्त वर्तनाबद्दल मायेचें शासन करणार. येवढें मात्र ध्यानांत ठेवावें, कीं हें पत्र आचरट आईप्रमाणें फाजील लाड करणार नाहीं...ज्यास पुढल्या माडीपासून चुलीपर्यंत व दिवाणखान्यांतील टेबलापासून फणीकरंड्याच्या पेटीपर्यंत कोणाच्या हातीं पडलें तरी हवें त्यानें, हवें त्याच्या देखत निःशंकपणें वाचण्यास हरकत नाहीं, असें पत्र पाहिजे असेल तर त्यांनीं अवश्य करमणुकीचें वर्गणीदार व्हावें...शनिवारीं संध्याकाळीं थकून भागून आल्यावर आपल्या कुटुंबांतील लहानमोठ्या माणसांस जमवून खुशाल हंसत खेळत करमणूक करून ज्ञान मिळविण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांचे आम्ही नम्र सेवक आहोंत."

'करमणुकीं'त साधारणपणें पुढील स्वरूपाचा मजकूर असे : कादंबरी; दोन-तीन अंकांत संपणारी एखादी मोठी गोष्ट; पदार्थविज्ञान, रसायन, अर्थ, शरीर इत्यादि शास्त्रांचें ज्ञान करून देणाऱ्या गोष्टी; नाटकें; वर्तमानसार; चटकदार चुटके व नकला; थोर पुरुषांचीं चरित्रें; स्थलवर्णनें वा प्रवासवर्णनें; निरनिराळ्या खेळांविषयीं माहिती, उपयुक्त माहिती; कविता; स्त्रियांना उपयुक्त अशी माहिती.

'करमणुकी'च्या पहिल्या अंकापासून 'पण लक्षांत कोण घेतो' ही कादंबरी सुरू करण्यांत आली. या कादंबरीनें पहिल्या प्रकरणापासूनच वाचकांच्या अंतःकरणाची पकड घेतली व पत्र उत्तरोत्तर लोकप्रिय होत गेलें. हरिभाऊंनीं आपल्या बहुविध वाचनाचा उपयोग 'करमणुकी'चे द्वारा बालांपासून वृद्धांपर्यंत सर्वांना

करून दिला. कवि केशवसुत यांच्या प्रारंभींच्या कांहीं कविता 'करमणूक'-मधून प्रसिद्ध झालेल्या आहेत.

"* हरिभाऊंच्या आयुष्याच्या शेवटच्या तीस वर्षांचे म्हणजे करमणुकीच्या जन्मापासून तों अखेरपर्यंतच्या काळाचे दहा दहा वर्षांचे तीन भाग पाडले तर त्यांत प्रत्येक भागांत त्यांनीं खालीलप्रमाणें ग्रंथरचना केलेली आढळते.

[१८९०–१९००]

**सामाजिक :** १ पण लक्षांत कोण घेतो ! २ सगुणाबाईचीं आपल्या मुलीस व गोविंदरावांचीं आपल्या मुलांस पत्रें; ३ यशवंतराव खरे; ४ मी; ५ जग हें असें आहे; ६ काळ तर मोठा कठीण आला; ७ कसे दिवस गेले;

**ऐतिहासिक :** १ म्हैसूरचा वाघ (अपूर्ण); २ उषःकाल; ३ केवळ स्वराज्यासाठीं.

[१९००–१९१०]

**सामाजिक :** १ भयंकर दिव्य; २ आजच (अपूर्ण)

**ऐतिहासिक :** १ रूपनगरची राजकन्या; २ चंद्रगुप्त; ३ गड आला पण सिंह गेला; ४ सूर्योदय; ५ माध्यान्ह (अपूर्ण); ६ सूर्यग्रहण (अपूर्ण).

[१९१०–१९१९]

**सामाजिक :** १ मायेचा बाजार; २ कर्मयोग (अपूर्ण)

**ऐतिहासिक :** १ कालकूट (अपूर्ण); २ वज्राघात.

"हरिभाऊंनीं पहिल्या दहा वर्षांत चार सामाजिक कादंबऱ्या व दोन ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या, दुसऱ्या दहा वर्षांत दोन सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. त्यांतील एक अपूर्णच आहे. या काळांत चार पूर्ण व दोन अपूर्ण अशा त्यांनीं सहा ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. तिसऱ्या दहा वर्षांत दोन सामाजिक व दोन ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. त्यांपैकीं प्रत्येकांतील एक एक कादंबरी अपूर्णच आहे."

* हरि नारायण आपटे–चरित्र, बा. मा. आंबेकर.

"यावरून असें दिसून येतें कीं, सन १९०० नंतर हरिभाऊंनीं 'भयंकर दिव्य' व 'मायेचा बाजार' या दोनच सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. त्यानंतर त्यांचें लक्ष ऐतिहासिक कादंबऱ्यांकडेच विशेष असलेलें दिसतें. दुसऱ्या दहा वर्षांत प्रायः प्रत्येक वर्षी त्यांनीं एक एक ऐतिहासिक कादंबरी लिहिली आहे. त्यांतील 'सूर्यग्रहण' हें कथानकाच्या अनुरोधानें पाहतां वस्तुतः पूर्णच झालें आहे. फक्त 'माध्यान्ह' हीच काय ती कादंबरी अपूर्ण राहिलेली दिसते. म्हणजे दहा वर्षांच्या काळांत त्यांनीं सात ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या."

"सन १९०० नंतर हरिभाऊंचें सामाजिक कादंबऱ्यांकडील चित्त कमी कां झालें असा साहजिकच प्रश्न उद्भवतो. त्याचें निश्चित उत्तर देणें अर्थातच शक्य नाहीं. या काळांत सुधारणा लोकांच्या कांहींशा अंगवळणीं पडत चालल्या. अर्थात् सामाजिक चळवळीचा तितका जोर कमी झाला. या परिस्थितीचाहि हा परिणाम असेल. पण साधारणतः असें दिसतें कीं, समाजांतील विद्यमान व पुढील दहावीस वर्षांच्या काळांतील विचारपरिवर्तन त्यांनीं आपल्या १९०० पूर्वीच्या कादंबऱ्यांतच चित्रित केलें. यापुढच्याहि काळाची सद्यःस्थिति रेखाटीत बसणें म्हणजे समाजाचें लक्ष त्या काळाकडे वेधून त्यास सद्यःस्थितीकडे दुर्लक्ष करण्यास लावण्याप्रमाणें होणार आहे, असा विचार त्यांच्या मनांत आला असावा. म्हणूनच ते ऐतिहासिक कादंबऱ्यांकडे वळले असावे. ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या योगानें समाजास सद्यः-स्थितीची व पूर्वस्थितीची तुलना करतां येऊन दोहोंमधीलहि चांगल्या गोष्टींचा मिलाफ करतां येतो. आजच्या आणि यापुढें पंचवीस वर्षांनीं होणाऱ्या सद्यःस्थितीचें विवरण केल्यानंतर पूर्वस्थितीचें सिंहावलोकन करणेंच त्यांना इष्ट वाटलें असावें."

१९१३ पासून १९१९ पर्यंत हरिभाऊंचे हातून विशेष लेखन झालेलें दिसत नाहीं. कौटुंबिक आपत्ती, सार्वजनिक व्याप व जलोदरासारखी व्याधि यांमुळें लेखन-व्यवसायांतून त्यांचें लक्ष उडाल्यासारखें झालें होतें.

महाराष्ट्रांतील ग्रंथकारांत हरिभाऊंइतके सर्व प्रकारची मानमान्यता मिळालेले भाग्यवंत ग्रंथकार फारच थोडे आढळतील. ते स्वतः पदवीधर नसतांहि मुंबई विद्यापीठाच्या सेनेटच्या फेलोच्या जागीं त्यांची नेमणूक झाली होती व ते कित्येक वर्षे पदवीपरीक्षांचे परीक्षकहि होते.

हरिभाऊंच्या कादंबऱ्यांचें समालोचन श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे :

*"रेनॉल्डसूनें कादंबरीकारांना व वाचकांना जें वेड लावलें होतें, त्यापासून हरिभाऊ आपटेहि प्रथम मुक्त नव्हते. त्यांच्या पहिल्या पहिल्या कादंबऱ्यांना त्याच कादंबरीकारापासून प्रेरणा मिळालेली दिसते. 'मधली स्थिति' या कादंबरीचे पहिले भाग रेनॉल्डसूच्या एका कादंबरीचे आधारानें लिहिलेले असून बाकीच्या भागांची रचना, त्यांतील बीभत्स भाग वगैरे प्रकार त्याच ग्रंथकाराच्या धर्तीवर आहेत. आपट्यांच्या त्यानंतरच्या कादंबऱ्यांतसुद्धां एखाद्या चित्तवेधक प्रसंगाचें वर्णन चाललें असतां तें बंद ठेवून वाचकांचे मनाचा हिरमोड करण्यांत येतो. हा प्रकार रेनॉल्ड्सचाच आहे. हरिभाऊंना आपल्या कारकीर्दीच्या आरंभींच अशा सामान्य ग्रंथकाराबद्दल जो आदर वाटत होता, त्यामुळें त्यांच्या पुढील कादंबऱ्यांच्या रचनेचेंहि स्वरूप अंशतः ठरल्यासारखें झालें. 'जग हें असें आहे' इत्यादि कांहीं कादंबऱ्यांत त्यांनीं मिसेस हेन्री वुडचें व 'उषःकाल', 'रूपनगरची राजकन्या' इत्यादि ऐतिहासिक कादंबऱ्यांत त्यांनीं स्कॉट, रायडर हॅगर्ड या ग्रंथकारांचें अनुकरण करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु हेन्री वुड ही ग्रंथकर्तीहि सामान्य लेखकांपैकींच आहे; आणि स्कॉट व हॅगर्ड यांचें अनुकरण हरिभाऊंना साधावें तितकें साधलें नाहीं. याचें एक कारण आपल्याकडील पुरातन चालीरीतींच्या ज्ञानाचा अभाव, व दुसरें कारण हरिभाऊंना माधुर्य हा गुण जसा साधतो तसा ओजोगुण साधत नाहीं हें होय. 'उषःकाल' या कादंबरींत श्रीधरस्वामींचें चित्र जितकें आदरणीय झालें पाहिजे अशी वाचकांची अपेक्षा असते व कर्त्याचीहि असावीशी दिसते तितकें तें झालें नाहीं, उलट क्वचित् स्थलीं तें बालिशहि वाटतें. या गोष्टीवरून वरील म्हणण्याची सत्यता निदर्शनास येईल. शिवाय आपट्यांच्या तारुण्यांतील भाषेला बांधेसूदपणा होता, तो दिवसेंदिवस लोपत जाऊन पुढें पुढें तिला एक प्रकारचा विस्कळितपणा, बोजडपणा व एकसारखेपणा आला आहे. त्यांच्या कादंबऱ्या 'करमणूक' पत्रांत प्रसिद्ध होण्यासाठीं हप्त्याहप्त्यांनीं लिहिल्या असल्यामुळें त्यांमध्यें प्रमाणशुद्धपणा जरा कमी आहे; म्हणजे एखाद्या हलक्या पात्राला किंवा प्रसंगाला नसतें महत्त्व व त्या मानानें प्रमुख पात्राला किंवा प्रसंगाला कमी महत्त्व दिलें गेलें आहे.

* 'मराठी कथात्मक वाङ्मय', कोल्हटकरांचा लेखसंग्रह.

" किरकोळ गोष्टींचीहि चर्चा व त्याबद्दल नसत्या शंकाकुशंका असा प्रकार झाल्यामुळें त्यांतील कांहीं भाग कंटाळवाणे झाले आहेत. पात्रांच्या बाह्य स्वरूपाच्या वर्णनाप्रमाणें विचारांचें प्रतिबिंब थोड्या शब्दांनीं वठविल्यास जितकें स्पष्ट दिसतें, तितकें तें अन्यथा दिसत नाहीं. हरिभाऊंच्या कादंबऱ्यांत यासंबंधानें योग्य त्यापेक्षां अधिक विस्तार झाला आहे. याशिवाय पुनरुक्ति व अगदींच सामान्य व किरकोळ सिद्धांतांचें कथन हे दोषहि त्यांत मधून मधून दिसून येतात. कथानकांतील भाग किंवा पात्रांचीं नांवें गुप्त ठेवण्यांतहि हरिभाऊंकडून एक अशी चूक झालेली दिसते कीं ते भाग किंवा तीं नांवें वाचकांना तर्कानें कळल्यानंतर बऱ्याच अवकाशानें त्यांची ग्रंथकाराकडून परिस्फुटता होते. 'उषःकालां'तील शिवाजीचें नांव वाचकांना कळविण्यांत फार विलंब झाला आहे असें वाटतें. हा प्रकार कांहींसा खुद्द ग्रंथकाराचें नांव मराठी वाचकांना कळल्यानंतर फार उशीरानें तें त्याजकडून जाहीर करण्यांत आलें या प्रकारासारखाच आहे. हे दोष वर्ज्य केले तर हरिभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्या चांगल्या झाल्या आहेत असें मराठी भाषेच्या अभिमान्याला कबूल करावें लागेल. यांच्या पहिल्या कादंबऱ्यांत संविधानकाची मांडणी विशेष चातुर्याची नसे. 'मधली स्थिति' या कादंबरीला 'गोंधळ' हें नांव देण्याचा आपला विचार होता असें कर्त्यानें कांहींसें विनयानें व कांहींसें वस्तुस्थितीला धरून प्रस्तावनेंत म्हटलें आहे. पण पुढें पुढें ही स्थिति बदलून 'चंद्रगुप्त', 'उषःकाल', 'रूपनगरची राजकन्या', 'भयंकर दिव्य' इत्यादि कादंबऱ्यांत आपट्यांचें संविधानकचातुर्य चांगलें प्रत्ययास येतें. या कादंबऱ्यांतील भाषा जरी पूर्वीइतकी चटकदार व बांधेसूद नाहीं, तरी 'ओझरतें दर्शन' इत्यादि कांहीं प्रकरणें भाषेच्या दृष्टीनेंहि उत्कृष्ट साधलीं आहेत व मनुष्यस्वभावाचें वर्णन कांहीं अपवाद वर्ज्य केल्यास कर्त्याच्या वाढत्या अनुभवाला पूर्णपणें शोभण्यासारखेंच आहे. आपट्यांच्या प्रथमच्या कादंबऱ्यांपेक्षां नंतरच्या कादंबऱ्यांत दुसरा एक गुण दिसून येतो. तो काव्य हा होय. 'रूपनगरची राजकन्या' या कादंबरींतील अचलेश्वराच्या मंदिराचें वर्णन ज्यांनीं वाचलें असेल, त्यांस हें विधान मान्य होईल अशी खात्री आहे."

" आपटे यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांत अद्‌भुतरस बराच साधला आहे; व अद्‌भुत प्रसंग बहुधा स्वाभाविक रीतीनें घडवून आणल्यामुळें त्यांच्या मनावर संस्कारहि दृढ होतो. त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांत जरी इकडील गृहस्थितीचें

चित्र रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे, तरी त्यांतहि विस्मयकारक प्रसंग बरेच आहेत आणि खरोखरच सांप्रतकाळीं आपल्या समाजांत जुनें व नवें यांच्या सान्निध्यामुळें जे आश्चर्यकारक प्रसंग रोजच्या व्यवहारांत घडून येतात तसे अद्भुत कादंबऱ्यांतसुद्धां वाचावयास मिळणार नाहींत. आपणांमधील गेल्या पिढीचे लोक व या देशांतील फार पुरातन कालचे लोक यांमध्यें धार्मिक, नैतिक, सृष्टिविषयक व व्यावहारिक समजुतींसंबंधानें फारसें अंतर नाहीं. अशांचा व इंग्रजी विद्या शिकलेल्यांचा एकत्र योग म्हणजे दोन हजार वर्षांपूर्वीचें हिंदुस्थान व १९ व्या शतकांतील यूरोप यांच्या योगाइतकाच विस्मयकारक आहे. एकीकडे सामायिक तर दुसरीकडे वैयक्तिक कुटुंबपद्धति, एकीकडे कर्मठपणा तर दुसरीकडे एकेश्वरी पंथ किंवा नास्तिकवाद, एकीकडे स्त्रियांविषयीं व अंत्यजांविषयीं अनादर तर दुसरीकडे विलासी राहणी, एकीकडे बैलगाड्या व सांडणीस्वार तर दुसरीकडे आगगाड्या, विमानें व तारायंत्रें, एकीकडे पंतोजी तर दुसरीकडे प्रोफेसर, एकीकडे तहानलाडू, भूकलाडू तर दुसरीकडे इराण्याचें दुकान, एकीकडे भांग्या मारुतीचा अड्डा तर दुसरीकडे वर्तमानपत्रें, याप्रमाणें हजारों गोष्टींत पदोपदीं विलक्षण अंतर दिसून मन थक्क होतें. इंग्रजी विद्येमुळें जे नवे नवे प्रकार सुरू झाले आहेत त्यांतील परस्परविरोध तरी कमी आहे काय? नाहीं. इंग्रजी विद्येचा संस्कार झालेल्यांमध्यें इतरांसाठीं सर्वस्व अर्पिणारे महात्मेहि आहेत व केवळ स्वार्थासाठीं इतर सर्वांवर तिलांजलि सोडण्याला तयार असे पापात्मेहि आहेत. पाश्चात्य सुधारणेचा गाभा हस्तगत करूं पाहणारे खरे सुधारकहि आहेत व स्वतः दारू पिऊन पशूंच्या कोटींत जाऊन बसणारेहि आहेत. याप्रमाणें इंग्लंड व हिंदुस्थान या दोन कटाहांतील भिन्न जातीय सामुग्री एकत्र झाल्यामुळें नाना प्रकारचे चमत्कार प्रत्येक दिवशीं प्रत्येक घरीं नजरेस पडत आहेत. या खळबळींचा आपट्यांनीं आपल्या सामाजिक कादंबऱ्या चटकदार करण्यांत बराच उपयोग करून घेतला आहे."

"हरिभाऊंना ऐतिहासिक कादंबऱ्यांपेक्षां सामाजिक कादंबऱ्या विशेष साधतात हें वर आलेंच आहे. 'गड आला पण सिंह गेला', 'रूपनगरची राजकन्या', 'उषःकाल' या ऐतिहासिक कादंबऱ्या चांगल्यापैकीं आहेत खऱ्या, पण 'जग हें असें आहे', 'भयंकर दिव्य' इत्यादि सामाजिक कादंबऱ्यांत हरिभाऊंच्या लेखणींत जें स्वातंत्र्य व तेज दृष्टीस पडतें तें त्या कादंबऱ्यांत दिसत नाहीं. त्या कादंबऱ्यांत एक तऱ्हेची कृत्रिमता दिसून येते. या भेदाचें कारण इतकेंच कीं, कर्त्यास मार्मिक

अवलोकनानें सद्यःकालाशीं निकट परिचय करून घेतां आला, तितका वाचनाच्या किंवा कल्पनेच्या साहाय्यानें गतकालाशीं करून घेणें शक्य नव्हतें. असो. याप्रमाणें हरिभाऊंच्या बहुतेक सर्व सामाजिक कादंबऱ्या वाचनीय झाल्या आहेत. तथापि त्यांतल्या त्यांत आपल्या ऐन उमेदींत लिहिलेली ' पण लक्षांत कोण घेतो ?' ही त्यांची कादंबरी विशेष सरस उतरली आहे असेंच वाटतें. तींत त्यांच्या अगदीं पूर्व-वयांतील कादंबऱ्यांचाच चटकदारपणा असून शिवाय उत्तरवयांतील कादंबऱ्यांमध्यें दिसून येणारें स्वभाववर्णनचातुर्यहि आहे. पूर्वोक्त कादंबऱ्यांतील विस्कळित संविधानक हा दोष जरी तिच्यांत असला तरी ती कादंबरी आत्मचरित्रात्मक असल्यामुळें तिच्यामध्यें तो दोष इतका भासत नाहीं व उत्तरोक्त कादंबऱ्यांत दिसून येणारा पाल्हाळिकपणाचा दोष जरी तिच्यांत क्वचित् दिसून येतो, तरी आत्मचरित्र निवेदन करणारी स्त्री असल्यामुळें तिला तो दोष इतका शोभून जातो. या कादंबरींत ब्राह्मण स्त्रियेच्या चरित्रांतील बहुतकरून प्रत्येक महत्त्वाची गोष्ट इतक्या चटकदार व स्वाभाविक रीतीनें सांगितली आहे, कीं वाचकांची पुस्तकाशीं एकतानता होऊन प्रत्येक प्रसंग आपल्या दृष्टीसमोरच चालला आहे कीं काय असा भास होतो. या पुस्तकांतील भाषा इतकी घरगुती व हृदयंगम आहे, कीं तशी स्त्रीलेखकाच्याहि हातून उतरणें कठीण. नायिकेचा बाप व आई, आजा व आजी, मामेसासरे व मामेसासवा, भाऊ व भावजय, दुर्गी व तिचा नवरा, हीं विजोड जोडपीं दाखविल्यामुळें हास्यास्पद व करुणास्पद प्रसंग बरेच आणितां आले आहेत. हरिभाऊंना करुणरस फार चांगला साधतो असें त्यांच्या इतर कादंबऱ्यांप्रमाणेंच याहि कादंबरीवरून उघड होतें. यमुनेची आई ही प्रत्येक ब्राह्मण कुटुंबाच्या परि-चयाची व्यक्ति आहे; व शंकरमामंजी हें पात्र अद्वितीय झालें आहे."

" पुस्तकाची योग्यता साधारणपणें तीन कसोट्या लावून काढितां येते. एक कसोटी पाठांतराची; पुस्तक एकदां वाचल्यावर तें पुनः वाचण्याची इच्छा होते, कीं काय यावर ही अवलंबून असते. दुसरी कसोटी देशांतराची किंवा भाषांतराची. पुस्तकाचें भाषांतर होऊन तें स्वदेशांतल्याप्रमाणेंच इतर देशांतहि लोकप्रिय होतें किंवा नाहीं याचा विचार ही कसोटी लावतांना करावा लागतो. तिसरी कसोटी कालांतराची. काल हा मोठा मार्मिक परीक्षक आहे. याच्या चाळणींतून हिरकण्या गळून फक्त कोहिनूरसारखे हिरे मात्र राहतात. या कालरूपी सूत्रधाराचे शतकरूपी अनेक पडदे पडूनहि ज्यांची प्रतिभा पूर्वीच्या उज्ज्वल स्वरूपांत दिसते त्यांचे ग्रंथ

विश्ववंदनीय होत. कालिदास, होमर, शेक्सपियर, सरव्हँटीज, मोलियर, गेटी, बाल्झॅक हे अशा विभूतींपैकीं होत. वर दिलेल्या तिन्ही परीक्षा उत्तीर्ण झालेले हे पदवीधर होत. उत्तरोक्त दोन कसोट्यांतून 'पण लक्षांत कोण घेतो' ही कादंबरी पार पडेल कीं काय तें आज सांगतां येत नाहीं. पण पाठांतराची पहिली कसोटी लाविली असतां ती हिणकस टरणार नाहीं, इतकेंच नव्हे तर सद्यःस्थितीचें रोजच्या भाषेनें वठविलेलें उत्तम चित्र म्हणून ती पुष्कळ वर्षें टिकाव धरून राहील अशी खात्री वाटते."

हरिभाऊंच्या सहवासांत राहाण्याची व त्यांच्या तोंडून त्यांच्या लेखनविषयक ध्येयधोरणाची ओळख करून घेण्याची संधि ज्यांना लाभली अशांपैकीं एक लेखक वाग्भट नारायण देशपांडे यांनीं त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांसंबंधीं व त्यांमागील विशिष्ट हेतूसंबंधीं आपल्या पुस्तकांत कांहीं आठवणी देऊन विस्तृत विवेचन केलें आहे. हरिभाऊंची त्यांच्या कादंबऱ्यांमागील वैचारिक भूमिका समजण्यास त्याचा चांगला उपयोग होण्यासारखा आहे. देशपांडे हरिभाऊंच्या कादंबऱ्यांचे पुढीलप्रमाणें चार समूह पाडतात :

**समूह पहिला :** मधली स्थिति. **समूह दुसरा :** गणपतराव; पण लक्षांत कोण घेतो; यशवंतराव खरे; मी; जग हें असें आहे. **समूह तिसरा :** भयंकर दिव्य; मायेचा बाजार. **समूह चौथा :** आजच; कर्मयोग.

देशपांडे यांनीं पाडलेल्या या समूहांसंबंधीं त्यांनीं आपले विचार पुढीलप्रमाणें मांडले आहेत :

† "पाश्चात्य विद्येशीं व संस्कृतीशीं आमचा संबंध आल्यापासून, आणि त्याचे आमच्या समाजावर झालेले चांगले वाईट परिणाम दृग्गोचर होऊं लागल्यापासून आज काळापर्यंत आमच्या समाजाचीं जीं स्थित्यंतरें झालीं, त्यांचेहि आपणांस सामान्यतः चार विभाग करतां येतील. पाश्चात्य विद्येनें दिपून जाऊन, पाश्चात्यांच्या गुणांऐवजीं त्यांच्या दुर्गुणांचें अंध अनुकरण करण्याची लाट एकोणीसाव्या शतकाच्या चतुर्थपादाच्या आरंभींच्या वर्षांत आली होती, तें समाजाचें पहिलें स्थित्यंतर; त्यानंतर पाश्चात्य विद्येशीं व संस्कृतीशीं आमचा अधिक परिचय झाल्यामुळें प्रथम झालेली दिशाभूल नाहींशी होऊन स्वतःच्या स्थितीची जाणीव उत्पन्न झाली

† हरि नारायण आपटे : आठवणी व कादंबऱ्या.

व स्वोन्नतीसाठीं व्यक्तिशः विचार व प्रयत्न सुरू झाले हें दुसरें स्थित्यंतर; पाश्चात्य विद्येशीं आमचा संबंध त्याहूनहि अधिक वाढत गेल्यानें, व एकंदर सर्वसाधारण परिस्थिति बदलल्यानें, समाजाच्या आचारविचारांत, इच्छेनें आणि अनिच्छेनें फरक पडला, व जुन्यानव्याची भेसळ सुरू झाली हें तिसरें स्थित्यंतर; आणि कालाच्या प्रगतीबरोबर पाश्चात्य संस्कृतीशीं आमची लगट अधिकाधिक होत चालली, त्यामुळें दृष्टि अधिक व्यापक झाली; समाजसुधारणेच्या व राष्ट्रोन्नतीच्या कल्पना आरंभीं ज्या आकुंचित, अनुदार व अंधुक होत्या, त्या बदलून त्यांचे ठिकाणीं व्यापकता, औदार्य व निश्चितपणा आला, हें चौथें स्थित्यंतर—म्हणजे हल्लींचा काळ. + गेल्या ४०।४५ वर्षांचा आपल्या समाजाचा इतिहास पाहिला तर स्थूल-मानानें त्याचे असे चार भाग पाडण्यास कांहीं हरकत नाहीं. हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांचे वर जे चार समूह अगर विभाग केले आहेत, ते याच तत्त्वावर केले आहेत. कारण या दोहोंची परस्पर तुलना केली असतां आपणांस असें आढळून येईल कीं, समाजाच्या पहिल्या स्थित्यंतराचा इतिहास, हरिभाऊंनीं आपल्या पहिल्या समूहांतल्या कादंबरींत वर्णन केला असून त्या स्थित्यंतरांतून दुसऱ्या स्थित्यंतराची उत्क्रांति कशी झाली हें दाखविलें आहे. त्याचप्रमाणें या दुसऱ्या स्थित्यंतराचा—हेंच स्थित्यंतर आपल्या देशाच्या इतिहासांत विशेष महत्त्वाचें आहे—सांगोपांग इतिहास त्यांच्या दुसऱ्या समूहांतील कादंबऱ्यांत असून त्यांत तिसऱ्या व चौथ्या स्थित्यंतरांचीं पूर्वचिन्हें दर्शविलीं आहेत. या संधिकालांत सामाजिक चालीरीतींमध्यें ज्या सुधारणा सुचविण्यांत आल्या, व ज्या या कालांत कांहीं व्यक्तींनीं महत्प्रयासानें थोड्याशा व्यक्तिशः अमलांतहि आणल्या, त्या सुधारणा समाजाच्या तिसऱ्या स्थित्यंतरांत अधिक विस्तृत प्रमाणानें समाजांत थोड्याबहुत मान्यता पावल्या; निदान त्यांच्याबद्दल आरंभीं जो दुराग्रह होता, तो तरी तितका राहिला नाहीं. तथापि नवीन मतांचा अंगीकार करणारांना समाजाकडून हेतुपुरस्सर, आणि रूढीमुळें व पूर्वग्रहांमुळें आपोआप जो त्रास झाला, त्याचें वर्णन हरिभाऊंच्या तिसऱ्या संघांतील कादंबऱ्यांत आहे. त्यानंतर आजची स्थिति अशी झाली आहे कीं, कांहीं वर्षांपूर्वी ज्यांबद्दल मोठीं रणें माजत असत असे बहुतेक सामाजिक प्रश्न आज परिस्थितीमुळें, बरेच अमलांत आल्यानें त्याकडे समाजाचें सहिष्णुतापूर्वक दुर्लक्ष झालें असून राष्ट्रसुधारणेच्या कार्यक्रमांत सामाजिक सुधारणेशिवाय इतर अनेक गोष्टींचा समावेश झाला

+ विसाव्या शतकाची पहिली पंचविशी.

आहे; आणि राष्ट्रोन्नतीसाठीं चोहों बाजूंनीं नेटानें चाललेल्या प्रयत्नांमुळें, राष्ट्र उद्योन्मुख झालें असून, प्रगतीच्या शिडीच्या पहिल्या पायरीवर आज आपलें पाऊल पडलें आहे. या स्थितीचें चित्र हरिभाऊंच्या अगदीं अलीकडल्या—म्हणजे वर वर्गीकरण केलेल्यापैकीं चौथ्या समूहांतील—कादंबऱ्यांत पाहावयास सांपडतें."

"तथापि हरिभाऊंचा खरा मोठेपणा व त्यांच्या कादंबऱ्यांचें महत्त्व, केवळ त्यांमध्यें समाजाच्या प्रत्येक स्थित्यंतराचें खरेंखुरें चित्र काढलें आहे या एकाच गोष्टीवर अवलंबून नाहीं; कारण डोळ्यांसमोर घडणारी गोष्ट नुसती आहे तशी चित्रित केल्यानें, वस्तुस्थिति उत्तम रीतीनें रेखाटणारा कादंबरीकार एवढेंच त्यांस महत्त्व आलें असतें. पण त्यांच्या कादंबऱ्यांचा जो विशेष आहे, तो यापेक्षां वेगळाच आहे. प्रत्येक स्थित्यंतरांतील वस्तुस्थितीचें खरें चित्र तर हरिभाऊंनीं काढलेंच आहे; पण त्यांत जें विशेष आहे तें हें कीं, त्या स्थित्यंतराची पुढें होणारी उत्क्रांति त्यांनीं आधींच भविष्यदृष्टीनें पाहून, त्याची पूर्वतयारी त्यांनीं करून ठेविली; म्हणजे त्यांनीं एका प्रकारें द्रष्ट्याचें काम केलें असें म्हणण्यांत फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं. प्रस्तुत कालाचें चित्र समाजापुढें मांडून त्यांतील गुणदोषांकडे जसें लोकांचें लक्ष वेधिलें, त्याप्रमाणें, त्या स्थितींतून उत्क्रांत होण्यास काय केलें पाहिजे हें सुचवून, पुढें आपण कोणत्या स्थितींत जाऊं व आपलें तारूं कोणच्या ध्येयाकडे आपण हांकारलें पाहिजे हेंहि त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांचेद्वारें समाजास दाखविलें; आणि म्हणूनच त्यांची प्रत्येक कादंबरी जितकी सत्यदर्शी तितकीच ध्येयात्मक आहे."

हरिभाऊंनीं छोट्या मोठ्या अशा बऱ्याच गोष्टी लिहिल्या. त्यांतील 'कसे दिवस गेले', 'काळ तर कठीण आला', 'हरवलेली किल्ली', 'पुरी हौस फिटली', 'पहिलेंच भांडण', 'हात लावला कीं सोनें', 'डिस्पेप्शिआ', 'खाशी तोड', 'गेलेला आनंद' या गोष्टी उत्कृष्ट आहेत. बोधप्रदता, सुबोध, साधी घरगुती भाषा, आणि वस्तुस्थितिदर्शक चटकदार स्वभावचित्रण हीं हरिभाऊंच्या लेखणींतील वैशिष्ट्यें यांत उत्तम रीतीनें प्रत्ययाला येतात.

हरिभाऊंचें वाचन विविध व विपुल असे. इतिहास, अर्थशास्त्र, राजशासन-पद्धति, तत्त्वज्ञान, साहित्यशास्त्र, काव्य, नाटक, कादंबरी यांवरील ग्रंथांचा त्यांचा सूक्ष्म अभ्यास असे. त्यांना फ्रेंच व बंगाली या भाषा चांगल्या अवगत होत्या. या भाषांतील वाङ्मयाचाहि त्यांचा व्यासंग कौतुक करण्यासारखा होता. इंग्रजी

लेखकांत मिल, मोल, शेक्सपिअर व डिकन्स हे त्यांचे आवडते लेखक होते. त्यांच्या विचारांवर व लेखनावर या लेखकांचा बराच परिणाम झालेला होता.

कादंबऱ्यांखेरीज ' करमणुकी ' च्या निमित्तानें हरिभाऊंकडून विविध विषयांवर स्फुट लेखन झालें आहे. निबंध, गोष्टी, चुटके, चरित्रें, समालोचनात्मक व चर्चात्मक लेख असे अनेक प्रकार त्यांत आहेत. त्यांनीं ' संत सखू ' व ' सती पिंगला ' अशीं दोन नाटकें लिहिलीं असून व्हिक्टर ह्यूगो, कॉंग्रिव्ह, शेक्सपियर व मोलिएर यांच्या नाटकांचीं व प्रहसनांचीं भाषांतरें केलीं आहेत. तीं ' तीन नाटकें व तीन प्रहसनें ' या नांवानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यांत आलीं. ' संत सखू ' व ' सती पिंगला ' या नाटकांचे प्रयोग ' नाट्यकलाप्रवर्तक संगीत नाटक मंडळी ' पुष्कळ वर्षें करीत असे. त्यांपैकीं ' संत सखू ' हें नाटक विशेष लोकप्रिय झालेलें होतें.

हरिभाऊंनीं केलेल्या भाषांतरांपैकीं रवींद्रनाथ टागोर यांची ' गीतांजली ', ' भासकवीच्या नाट्यकथा ', ' चाणाक्षपणाचा कळस ' हीं पुस्तकें उल्लेखनीय आहेत.

' मराठीचा अभ्यास ', ' विदग्ध वाङ्मय ' हे त्यांचे दोन प्रबंध त्यांच्या वाङ्मयविषयक ध्येयाची, विचारांची व खोल अभ्यासाची साक्ष पटवितात.

अर्वाचीन मराठी वाङ्मयांत ज्यांनीं आपल्या विशिष्ट कर्तबगारीनें स्वतःचा असा कालखण्ड निर्माण केला, त्यांपैकीं हरिभाऊ हे एक होत. मराठी कादंबरीचा नवयुगनिर्माता म्हणून ते वाङ्मयेतिहासांत नेहमींच उल्लेखिले जातील.

**वा ङ्म य :**

सा मा जि क का दं ब ऱ्या

(१) मधली स्थिति; आ. २ री १९०२; आ. ५ वी, १९२९; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(२) गणपतराव (अपूर्ण); १९१९, १९३०, आर्यभूषण छापखाना, पुणें.
(३) पण लक्षांत कोण घेतो? १८९३; आ. ५ वी, १९२९; आर्यभूषण, पुणें.
(४) यशवंतराव खरे; १९१६; आ. ३ री, १९२८; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(५) मी; १९१६; आ. ३ री, १९२८; आर्यभूषण छापखाना, पुणें.

(६) जग हें असें आहे; १९०१, ज्ञानप्रकाश छापखाना, पुणें; आ. ४ थी, १९२९; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(७) भयंकर दिव्य; आ. ४ थी, १९३०; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(८) आजच (अपूर्ण); १९२४; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(९) मायेचा बाजार; आ. ३ री, १९२९; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(१०) कर्मयोग (अपूर्ण); १९२३, १९३०, आर्यभूषण छापखाना, पुणें.

ऐतिहासिक कादंबऱ्या

(१) म्हैसूरचा वाघ (अपूर्ण) (कर्नल मेडोज टेलरकृत 'टिपू सुल्तान' या कादंबरीच्या आधारें) १९२५; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(२) उषःकाल; पांचवी आवृत्ति, १९२९; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(३) केवळ स्वराज्यासाठीं; १९१८; आ. ३ री, १९२७; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(४) रूपनगरची राजकन्या; १९०९, चित्रशाळा; आ. ३ री, १९२४, आर्यभूषण छापखाना, पुणें.
(५) चंद्रगुप्त; १९०५, बाबाजी सखाराम आणि कंपनी, मुंबई.
(६) गड आला पण सिंह गेला; प्रथम आवृत्ति, १९०४; १४ वी आवृत्ति, १९३८, आर्यभूषण, पुणें.
(७) सूर्योदय; प्रथम आवृत्ति, १९१७, चित्रशाळा, पुणें; आ.३ री, १९२८, मुंबईवैभव, मुंबई.
(८) माध्यान्ह ( अपूर्ण ); १९२७, मुंबईवैभव छापखाना, मुंबई.
(९) सूर्यग्रहण (अपूर्ण ); १९१९, आर्यभूषण छापखाना, पुणें.
(१०) कालकूट (अपूर्ण ); १९२६, १९३१; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(११) वज्राघात अथवा विजयनगरचा विनाशकाल; १९१५, आ. ३ री, १९३०; आर्यभूषण छापखाना, पुणें.

नाटकें

(१) तीन नाटकें व तीन प्रहसनें [व्हिक्टर ह्यूगो, काँग्रिव्ह, मोलिएर, शेक्सपियर यांच्या नाटकांचीं रूपांतरें] १९१०; आर्यभूषण छापखाना, पुणें.

(२) संगीत संत सखूबाई; १९११, चित्रशाळा, पुणें; १९२१, आर्यभूषण छापखाना, पुणें.
(३) संगीत सती पिंगला; १९२१; आर्यभूषण छापखाना, पुणें.

गोष्टी

(१) चाणाक्षपणाचा कळस; [एका फ्रेंच रहस्यमय कथेच्या आधारें]; १९११, १९२६; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(२) भासकवीच्या नाटककथा [लँब्स टेल्सच्या धर्तीवर संवादरूप व गोष्टी-रूप]; १९१७; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(३) स्फुट गोष्टी, भाग १ ते ४; प्र. आ. १९१५; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(४) घटकाभर करमणूक.
(५) कसे दिवस गेले !!! [प्लेगाच्या कहरांतील एक गोष्ट]; १८९९,१९२८, आर्यभूषण छापखाना, पुणें.

निबंध, व्याख्यानें, पत्रें

(१) मराठी वाङ्मयाचा अभ्यास; १९०३, आ. ३ री, १९२७; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(२) करमणुकींतील करमणूक.
(३) करमणुकीची निबंधमाला; ['करमणुकीं'तील संकीर्ण निबंध]; १९३५, आर्यभूषण छापखाना, पुणें.
(४) मुलांस थोडा उपदेश; १९११, आ. ३ री, १९२९; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(५) विदग्ध वाङ्मय; [अभिजात वाङ्मयाची व्याख्या]; १९११, आ. ३ री, १९३५; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(६) करमणुकींतील स्वभावचित्रें; १९४१, आर्यभूषण छापखाना, पुणें.
(७) 'Marathi' : Its Sources and Development.
(८) मुलांस चार उपदेश, १९३३; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(९) हरिभाऊंचीं पत्रें; [हरिभाऊ यांनीं काशीबाई व गोविंद वासुदेव कानिटकर यांस लिहिलेलीं]; १९२९; ऐक्यसंपादन मंडळ, सातारा.

### अनुवाद

१ गीतांजली; [रवीन्द्रनाथ टागोर यांच्या 'गीतांजली'चा गद्य अनुवाद; चरित्र, काव्यविवेचन यांसह]; १९१७; मॅकमिलन आणि कंपनी, मुंबई.

## चरित्र, चर्चा, अभ्यास :

### ग्रंथ, प्रबंध

(१) कै. हरि नारायण आपटे—कांहीं आठवणी आणि मनोरंजक प्रसंग; बापूजी मार्तंड आंबेकर; १९३१; विजय छापखाना, पुणें.
(२) हरि नारायण आपटे यांचें संक्षिप्त चरित्र; बा. मा. आंबेकर; १९२२; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(३) हरिभाऊ आपटे; व्यक्ति आणि कार्य; नी. म. केळकर; १९३३; गणेश महादेव आणि कंपनी, पुणें.
(४) कै. हरिभाऊ आपटे यांच्या आठवणी व सामाजिक कादंबऱ्या; वाग्भट नारायण देशपांडे; १९२४; विजय छापखाना, पुणें.
(५) हरि नारायण आपटे; चरित्र व वाङ्मयविवेचन; वेणुबाई पानसे; १९३१; समर्थ–भारत छापखाना, पुणें.
(६) हरि नारायण आपटे यांचें त्रोटक चरित्र; काशीबाई कानिटकर; विविध-ज्ञानविस्तार, मार्च १९२१.

### स्फुट लेख

(१) हरिभाऊंशीं दोन घटका; ए. पां. रेंदाळकर; मासिक मनोरंजन, एप्रिल १९१९.
(२) हरिभाऊंच्या आठवणी, प्रो. घारपुरे; सचित्र करमणूक—वसंत अंक, १९२८.
(३) करमणुककार हरिभाऊ; ज. र. आजगांवकर; विविधवृत्त खास अंक, १९२६.
(४) हरि नारायण आपटे; मृत्युलेख; केसरी ४ मार्च १९१९.
(५) " " चित्रमय जगत्, मार्च १९१९.
(६) " " नवयुग मासिक, फेब्रुवारी १९१९.
(७) आपटे स्मृतिदिनसमयीं वाचलेले दोन निबंध; वा. ना. देशपांडे, द. ग. येरवडेकर; १९२३; सहकारी ग्रंथशाळा, पुणें.

(८) हरिभाऊंच्या वाङ्मयप्रासादाचें ओझरतें दर्शन; व. ना. नाईक; मासिक मनोरंजन, एप्रिल १९१९.
(९) हरिभाऊंचा संदेश; बा. मा. आंबेकर; मासिक मनोरंजन, मार्च १९२६.
(१०) हरिभाऊंचें कादंबरीमय चरित्र; वा. ना. देशपांडे; रत्नाकर, मार्च १९२९.
(११) हरिभाऊंचें समाजकार्य; बा. मा. आंबेकर; रत्नाकर, मार्च १९२६.
(१२) हरिभाऊंची स्त्रीसृष्टि; वाग्भट देशपांडे; सचित्र करमणूक—वसंत अंक, १९२८.
(१३) हरिभाऊंची बालसृष्टि; शं. बा. आंबेकर; विविधवृत्त.
(१४) हरिभाऊ व राजकारण; वाग्भट देशपांडे; दैनिक लोकमान्य—'महाराष्ट्र अंक', १९२५.
(१५) हरिभाऊंच्या कादंबऱ्या व नाटकें; गं. कृ. लेले; चित्रमयजगत्, मे, १९२१.
(१६) हरिभाऊंचें 'मी'—; 'शारदाभक्त'; मासिक मनोरंजन, ऑक्टो. १९२६.
(१७) 'मी' चा निष्कर्ष अथवा समाजसेवेचीं कांहीं तत्त्वें; प्रो. रा. प. सबनीस; मासिक मनोरंजन, मार्च, १९२६.
(१८) 'मी'; (परीक्षण); रा. वि. ओतुरकर; नवयुग मासिक, जानेवारी, १९१७.
(१९) हरिभाऊंचा 'मी' [कादंबरीचा सविस्तर रसास्वाद]; गो. वि. तुळपुळे, १९३५; आनंद छापखाना, पुणें.
(२०) हरिभाऊ आपटेकृत 'मी'; प्रि. वै. का. राजवाडे; लेखांक १–२, महाराष्ट्रसाहित्यपत्रिका, जानेवारी, एप्रिल, १९२६.
(२१) आपटेकृत 'मी' : कांहीं आक्षेपांचा विचार; वि. बा. आंबेकर, 'परामर्श'.
(२२) आपटे; ग. त्र्यं. माडखोलकर; सह्याद्रि, मार्च १९३९.
(२३) पण लक्षांत कोण घेतो; (परीक्षण); श्री. कृ. कोल्हटकर; विविधज्ञानविस्तार, एप्रिल, १९०२.
(२४) जग हें असें आहे; (परीक्षण); बा. ना. देव; विविधज्ञानविस्तार, एप्रिल, १९०२.
(२५) चंद्रगुप्त; (परीक्षण); पाटणकर; विविधज्ञानविस्तार, अंक ४, ५; १९०६.

(२६) रूपनगरची राजकन्या; बा. ग. मुर्डेश्वर; रत्नाकर, ऑगस्ट, १९२९.
(२७) ह. ना. आपटेकृत ऐतिहासिक कादंबऱ्या; न. र. फाटक; विविधज्ञानविस्तार, मार्च, १९२५.
(२८) हरिभाऊंचीं पत्रें; (परीक्षण); श्री. रा. पारसनीस; मासिक मनोरंजन, मार्च, १९३०.
(२९) गीताञ्जलि; (परीक्षण); ग. ज. आगाशे; विविधज्ञानविस्तार, डिसेंबर, १९१८.
(३०) संत सखूबाई नाटक; (परीक्षण); 'सदाशिव;' रंगभूमि मासिक, वर्ष ५, अंक ४.
(३१) भास कवीच्या नाटककथा; (परीक्षण); विविधज्ञानविस्तार, जानेवारी, १९१८.
(३२) हरि नारायण आपटे यांच्या कांहीं कादंबऱ्यांचें निरीक्षण; नवा केरळ-कोकीळ; नोव्हें.–डिसेंबर १९१२, फेब्रुवारी १९१३, मार्च १९१३, एप्रिल १९१३.
(३३) उषःकाल आणि वज्राघात; चर्चात्मक; डॉ. वि. भि. कोल्ते; ज्योत्स्ना, जानेवारी १९३७.
(३४) इतिहास व ऐतिहासिक कादंबरी; वि. बा. आंबेकर; 'परामर्श'.
(३५) आपटे यांच्या कादंबरी लेखनाची मीमांसा; ,, ,,
(३६) लघुकथाकार हरिभाऊ आपटे; ,, ,,

**आंबेकर, बापूजी मार्तंड** [ १८७५–१९३४ ] वृत्तपत्रलेखक, मार्मिक टीकाकार. यांचा जन्म पुणें येथें झाला. इंग्रजी पांचव्या इयत्तेपर्यंत वाईस व पुढील मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण पुण्यास न्यू इंग्लिश स्कूलमध्यें झालें. उच्च शिक्षण बडोदें येथील कॉलेजांत यांनीं दोन वर्षें घेतलें. घरची गरिबी असल्यामुळें स्वतःचा खर्च नोकरी करून मिळवावा लागे. बडोद्यास 'सयाजी-विजय' पत्रांत संपादकीय लेखन करीत व त्याबद्दल जें कांहीं अल्पस्वल्प वेतन मिळे त्यावर कशी तरी गुजराण होई. इंटरच्या परीक्षेच्या वेळीं ते आजारी पडले व पुढें नोकरी करून शिक्षण पार पडणें शक्य दिसेना. तेव्हां पुन्हा वाईस आले. तेथें कांहीं स्थानिक मंडळीच्या

सहकारित्वानें त्यांनीं एक इंग्रजी शाळा स्थापन केली. शाळेंत काम करीत असतांना त्यांनीं वाचन व लेखन चालू ठेवलें. त्या वेळेस तेथें निघत असलेल्या ' मकरंद माले ' साठीं त्यांनीं टोपण नांवानें अनेक कादंबऱ्या लिहिल्या. या मालेच्या विद्यमानें प्रसिद्ध होणाऱ्या ' भारतवर्षीय नररत्नमाला ' या चरित्रमालेंतील यांनीं बरींचशीं चरित्रें लिहिलीं. १९०२ ते १९०६ पर्यंत ते वाईस होते. एवढ्या काळांत त्यांचे हातून विपुल लेखन घडलें.

१९०७ सालीं आंबेकर पुण्यास आले. त्या वेळेस ' ज्ञानप्रकाश ' पत्राचे संपादक असलेले नटेश आप्पाजी द्रवीड यांच्याशीं त्यांचा परिचय घडून आला. द्रवीडांना त्यांच्यासारखा सिद्धहस्त, खुसखुशीत पण खोंचदार लिहिणारा, चौकस व चोखंदळ वृत्तीचा लेखक साहाय्यक म्हणून हवा होता. आंबेकरांना त्यांनीं ताबडतोब आपल्याकडे घेतलें. त्या वेळेपासून आयुष्याच्या अखेरपर्यंत आंबेकरांनीं ज्ञानप्रकाशा-करितां आपली लेखणी झिजविली. ज्ञानप्रकाशांतील मजकुरांत विविधता आणून तो अधिकाधिक लोकप्रिय होत जावा यासाठीं त्यांनीं कसून प्रयत्न केले.

'ज्ञानप्रकाशा'शीं संबंध आल्यामुळें साहजिकच त्यांचा नामदार गोखले यांच्याशीं परिचय होऊन त्याचें स्नेहांत रूपांतर झालें. हरि नारायण आपटे यांच्याशींहि समान अभिरुचीमुळें सहवास घडून येऊन परस्पर परस्परांचे परममित्र बनले. या मैत्रीमुळेंच आंबेकरांकडून हरिभाऊंचें संक्षिप्त का होईना, विश्वासार्ह असें 'चरित्र' व सहवासांतील 'आठवणी' अशीं दोन पुस्तकें लिहिलीं गेलीं.

आंबेकरांचें टीकात्मक लेखन जसें मार्मिक तसेंच कित्येकदां मर्मभेदकहि असे. स्वपक्षावरील हल्ला परतवून लावण्यासाठीं ते जेव्हां हातांत लेखणी घेत तेव्हां त्यांची लेखणी शाईत बुडविली जात नसून, तेजाबांतच जणुं बुडविली जात आहे असें भासे. त्यांच्या या प्रकारच्या लेखनाचा नमुना त्यांनीं नरसिंह चिंतामण केळकर यांच्या 'टिळक चरित्रा' वर 'टिळक जीवनरहस्य' या नांवानें लिहिलेल्या लेखमालेंत पाहावयास मिळतो. मराठींत इतकें विखारी लेखन क्वचितच पाहावयास मिळतें.

**वाङ्मय :**

(१) हरि नारायण आपटे यांचें संक्षिप्त चरित्र; १९२२; आर्यभूषण छाप-खाना, पुणें.

(२) हरि नारायण आपटे : कांहीं आठवणी आणि मनोरंजक प्रसंग; १९३१; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(३) पंचतंत्र; आ. २ री, १९२८; चित्रशाळा, पुणें.
(४) हितोपदेश; आ. २ री, १९३१, चित्रशाळा, पुणें.

**आळतेकर, सदाशिव खंडो** [१८७२–१९३८] समर्थ वाङ्मयाचे अभ्यासक व चरित्रकार. यांचा जन्म कोल्हापूर संस्थानांतील आळतें या गांवीं झाला. शिक्षण कोल्हापुरास राजाराम हायस्कूल, राजाराम कॉलेज व पुण्यास डेक्कन कॉलेज यांमध्यें झालें. १९२१ सालपर्यंत, कांहीं वर्षें कोल्हापुरास व कांहीं वर्षें कऱ्हाडास त्यांनीं वकिली केली. पुढें असहकारितेच्या चळवळींत त्यांनीं वकिलीचा व्यवसाय सोडला व राजकीय चळवळींत ते प्रामुख्यानें भाग घेऊं लागले. प्रो. विष्णु गोविंद विजापुरकर यांच्या राष्ट्रीय शिक्षणविषयक कार्यांतहि यांचें अंग असे. समर्थ वाङ्मयाची गोडी व समर्थसंप्रदायाचा अभिमान त्यांच्याच सहवासामुळें त्यांच्यांत उत्पन्न झाला असावा. त्यांनीं लिहिलेलें समर्थ रामदास स्वामींचें विस्तृत चरित्र हें त्यांच्या या अभिमानाचेंच फळ होय. सर्व उपलब्ध ऐतिहासिक साधनांचा उपयोग करून, सांप्रदायिक अंध दृष्टि न ठेवतां समर्थांचें कसोशीनें व अभ्यासपूर्वक लिहिलेलें असें हें विस्तृत चरित्र आहे. "सांप्रत काळीं बहुजनसमाजानें समर्थचरित्र वाचून त्यापासून बोध घ्यावा—समर्थांच्या ग्रंथांतील, समर्थांच्या उपदेशांतील, समर्थांच्या संप्रदायांतील व समर्थांच्या चरित्रांतील रहस्य समजून घ्यावें व त्याप्रमाणें सावधपणानें व अत्यंत साक्षेपानें कृति करून राष्ट्राची सर्वांगीण उन्नति करावी," असा या चरित्रलेखनाचा हेतु असल्याचें ग्रंथकर्ता म्हणतो.

**वाङ्मय :**

(१) श्री समर्थचरित्र; १९३३; समर्थ-भारत छापखाना, पुणें.
(२) सुलभ दासबोध, अथवा समर्थांच्याच भाषेंत दासबोधाचें सार; १९२३.
(३) समर्थ–रत्नसंग्रह; १९२५; कराड.
(४) समर्थांची करुणापर कविता; १९२६; कराड.
(५) समर्थ सुभाषित; १९२६; कराड.
(६) समर्थांचें आत्मचरित्र; १९२८; समर्थ-भारत छापखाना, पुणें.

**इस्लामपूरकर, वामन गोविंद** [मृ० ३ डिसेंबर १९११] संस्कृत ग्रंथांचा कुशल भाषांतरकार. हे एक अत्यंत दीर्घोद्योगी व व्यासंगी शास्त्री होते. यांनीं अनेक संस्कृत ग्रंथांचीं मराठींत उत्कृष्ट भाषांतरें केलीं आहेत. 'कथासरित्सागर' या संस्कृत ग्रंथावरून 'बृहत्कथासागर' नांवाचा यांनीं मराठींत ग्रंथ उतरला. हा नऊ खण्डांत प्रसिद्ध व्हावयाचा होता. पण त्यांपैकीं पांचच खण्ड प्रसिद्ध झाले. या ग्रंथां-खेरीज 'शूद्रकमलाकर अथवा शूद्रधर्मतत्त्वप्रकाश', 'मेघदूत काव्यार्थ-दीपिका', 'आर्यपंचांग', 'श्रीहर्ष', 'महासाध्वी मिराबाई', 'बाणभट्ट आणि मयूर' वगैरे त्यांचे ग्रंथ त्यांचा व्यासंग, त्यांची चिकित्सक वृत्ति व सूक्ष्म संपादनशैली दर्शवितात. संस्कृत काव्यांचें मराठींत भाषान्तर करण्याच्या हेतूनें यांनीं 'काव्यार्थदीपिका' या नांवाचें मासिक सुरू केलें होतें. संस्कृत काव्य-नाटकांचे आधारें यांनीं पोतदारांच्या छोट्या ग्रंथमालेसाठीं अनेक कथा लिहिल्या. यांची भाषाशैली प्रौढ, सुरस व चित्ताकर्षक आहे.

**वाङ्मय :**

(१) शूद्रकमलाकार अथवा शूद्रधर्मतत्त्वप्रकाश याचें महाराष्ट्र भाषेंत भाषांतर, [कमलाकर भट्टकृत], शके १८०२; आ. ४ थी, १९२८; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(२) आदिराज-चरित्र; [संस्कृताचे आधारें]; शके १८१६; वीरक्षेत्र छाप-खाना, बडोदें.

(३) आर्यपंचांग : इतर साधारण माहिती व प्रवासीमित्र; [शके १८१७ चें]; १८९५; एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई.

(४) काव्यकल्पलता—वृत्तिसहित मूळ ग्रंथाचें मराठी भाषांतर; १८९१; एज्यु-केशन सोसायटीचा छापखाना, मुंबई.

(मुखपृष्ठावरील नांव—कविताशास्त्र अथवा काव्यकल्पलतेचें मराठी भाषांतर)

(५) करुणराघव [भवभूतिकृत उत्तररामचरिताच्या आधारें]; पै. कादंबरी; पोतदारांची नीतिपर व मनोरंजक पुस्तकमाला, नं. १; १८८९; कर्नाटक प्रेस, मुंबई.

(६) विदग्ध पुरूरवा; [संस्कृताच्या आधारें]; पौ. कादंबरी; पोतदारांची नीतिपर व मनोरंजक पुस्तकमाला, नं. ७; १८८९; कर्नाटक प्रेस, मुंबई.

(७) अविचाराचा परिणाम अथवा मुञ्जराजाचा शोचनीय मृत्यु; ऐ. कादंबरी; [संस्कृत व प्राकृत ग्रंथाधारें]; १९०८; आर्यभूषण प्रेस, पुणें.

(८) आर्य चाणक्य; ऐ. कादंबरी; १८९०; एज्युकेशन सोसायटीचा छापखाना; पोतदारांची नीतिपर व मनोरंजक पुस्तकमाला, नं. ६; मुंबई.

(९) चारुदत्त आणि वसंतसेना; [संस्कृत मृच्छकटिक नाटकाचे आधारें]; ऐ. कादंबरी; पोतदारांची नीतिपर व मनोरंजक पुस्तकमाला, नं. ४; १८८९; एज्युकेशन सोसायटीचा छापखाना; मुंबई.

(१०) राजा अग्निमित्र; (संस्कृताच्या आधारें); पोतदारांची नीतिपर व मनोरंजक पुस्तकमाला, नं. ८; १८८९; तत्त्वविवेचक प्रेस, मुंबई.

(११) ललित वत्सराज (पूर्वार्ध); (संस्कृताच्या आधारें); अद्भुत कादंबरी; पोतदारांची नीतिपर व मनोरंजक पुस्तकमाला, नं. २; १८८९; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

(१२) ललित वत्सराज (उत्तरार्ध); १८८९; जॉइंट स्टॉक प्रेस, मुंबई.

(१३) प्रणयि माधव; अद्भुत कादंबरी; १८८९; जॉइंट स्टॉक प्रेस, मुंबई; पोतदारांची नीतिपर व मनोरंजक पुस्तकमाला, नं. ५.

(१४) बृहत्कथासागर—भाग १ ला; १८८८, १८९९; एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई.

(१५) ,, —भाग २ रा; १८९०; तत्त्वविवेचक प्रेस, मुंबई.

(१६) ,, —भाग ३ रा; १८९१; देव्हारे छापखाना, मुंबई.

(१७) ,, —भाग ४ था; १८९१; ,, ,,

(१८) ,, —भाग ५ वा; १८९५; ज्युबिली छापखाना, मुंबई.

(१९) कर्णसुंदरी, अद्भुत कथा, शके १८१३; तत्त्वविवेचक प्रेस, मुंबई.

(२०) भाग्यशाली बायको अथवा कर्पूरमंजरी, १८९०; तत्त्वविवेचक प्रेस, मुंबई.

(२१) सुंदरी आणि वसंतसेन—भाग १ ला; अद्भुत कथा; [मोहनसेनकृत हिंदी ग्रंथाच्या आधारें]; १८८९; मुंबई.

(२२) „ —भा. २ रा; आ. २ री, १९०४; तत्त्वविवेचक प्रेस, मुंबई.

(२३) „ —भा. ३ रा; १८८९; कर्नाटक प्रेस, मुंबई.

(२४) महाकवि श्रीकालिदासकृत मेघदूत काव्य [काव्यार्थदीपिका नामक महाराष्ट्र टीकेसह]; १८७८; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(२५) महासाध्वी मिराबाई; [विविधज्ञानविस्तार मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध]

(२६) बाणभट्ट आणि मयूर [१९१३; „ „ ]

**उजगरे, भास्कर कृष्ण** [१८८७–१९३५] यांचा जन्म भांबुर्डें येथें झाला. हे धर्मानें ख्रिस्ती होते. यांचें शिक्षण अहमदनगर येथील मिशन स्कूलमध्यें झालें. अहमदनगरास कवि नारायण वामन टिळक व प्रसिद्ध संशोधक व चिकित्सक शिवराम एकनाथ भारदे ऊर्फ भारद्वाज यांचा सहवास त्यांस घडून त्यांस लेखन-वाचनाची गोडी लागली. ते कविता रचूं लागले. त्यांनीं भक्तिरसपूर्ण अशीं अनेक प्रार्थनागीतें रचिलीं. त्यांपैकीं कांहीं ख्रिस्त्यांच्या मराठी प्रार्थना-पुस्तकांत ग्रथित केलीं आहेत. टिळकांच्या कवितेचे हे भक्त असल्यामुळें मोठ्या परिश्रमानें त्यांची कविता मिळवून त्यांनीं तिचें संपादन केलें. ती तीन खण्डांत प्रसिद्ध करण्याची त्यांची योजना होती. या योजनेप्रमाणें त्यांनीं दोन खण्ड संपादून प्रसिद्ध केले. तिसरा खण्ड तयार केला होता, परंतु त्यांच्या मृत्यूमुळें त्याचें प्रकाशन झालें नाहीं असें दिसतें. मराठी ख्रिस्ती मंडळीच्या 'ज्ञानोदय' या जुन्या व प्रसिद्ध साप्ता-हिकांत यांचे बरेच स्फुट लेख प्रसिद्ध झालेले आहेत. यांना मराठी भाषा व वाङ्मय यांबद्दल फार जिव्हाळा होता. आपण 'ख्रिस्ती मराठा' आहोंत आणि आपली मायबोली मराठी आहे; तिचा अभिमान बाळगून आपण तिच्या उन्नतीसाठीं झटलें पाहिजे असें त्यांना उत्कटतेनें वाटे. मराठी वाङ्मयांत गेल्या सव्वारों–दीडरों वर्षांत ख्रिस्ती लेखकांनीं जी चांगल्या प्रकारची भर घातली तिजबद्दल त्यांस साहजिकच अभिमान वाटे. 'मराठी-ख्रिस्ती वाङ्मयाचा इतिहास' या त्यांनीं संपादित करून प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांत तो व्यक्त झालेला आहे.

**उदास, यशवंतराव आनंदराव** [ १८४२–१८७७ ] स्थलवर्णनकार. पुणें जिल्ह्यांतील ओतूर या गांवीं यांचा जन्म झाला. यांचें शिक्षण पुणें व मुंबई येथें झालें. १८६६ सालीं बी. ए. ची परीक्षा पास झाल्यावर मध्यप्रांत–वऱ्हाड शाळाखात्यांत यांनीं नोकरी धरली. कांहीं वर्षें सरकारचे मराठी भाषांतरकार म्हणून हे काम पहात असत. १८७२ सालीं शिरगणतीचे खात्यांत यांस सुपरिंटेंडंट नेमलें होतें. यांनीं 'धौम-महाबळेश्वर वर्णन' या नांवाचें एकच पुस्तक लिहिलें आहे. 'लेथब्रिजच्या इतिहासाचें मराठी भाषांतर यांनीं केलें आहे,' असें म. म. दत्तो वामन पोतदार आपल्या 'म. ग. इं. अवतार' या पुस्तकांत म्हणतात. उदास व त्यांचें धौममहाबळेश्वरवर्णन या संबंधीं ते लिहितात, "हे चांगले शोधक होते. वृत्ति नम्र होती. धौममहाबळेश्वरवर्णन या १५० पानांच्या पुस्तकांत स्थलवर्णन, क्षेत्रमाहात्म्य, इतिहासप्रकरण आणि निबंधसार असे चार भाग कल्पिले आहेत. त्यांतील वर्णन व विवेचन दोन्ही चांगलीं उतरलीं आहेत. तथापि पुस्तकाला वर्णन हें नांव दिल्यानंतर त्यांत ऐतिहासिक विवेचनाला निम्मा अधिक भाग योजणें हें प्रशस्त नाहीं. प्रतापगड म्हणजे मराठ्यांच्या वीर्यभूमीचें तेजस्वी केंद्र ! तेथें प्रौढप्रताप श्रीशिवाजीमहाराजांची व कडव्या अफझलखानाची ती काळभेट झाली व महाराजांनीं खान नामोहरम केला. या प्रसंगांतील वादग्रस्त मुद्द्यांचें विवेचन उदास यांनीं या ग्रंथांत विस्तारानें करून महाराजांची बाजू पुढें मांडण्याचा प्रयत्न केला आहे. तो चांगला साधला असला तरी त्याचा एवढा विस्तार करण्यानें या ग्रंथाच्या वर्णनात्मक स्वरूपांत ऐतिहासिक रंगाची छटा फाजील गडद उठली गेली आहे. परंतु उदात्त ऐतिहासिक प्रसंगाच्या स्मरणानें 'जो कोणी विचारदृष्टीनें महाबळेश्वर पाहील त्याच्या सुशिक्षित, संस्कृत व सूक्ष्मदर्शी मनावर फार हितावह परिणाम होईल व असे परिणाम त्यांनीं करून घ्यावे हाच या विषयाचा उद्देश होय,' असें यांनींच याचें समर्थन केलें आहे."

उदास हे अकालीं—वयाचे ३५ व्या वर्षी—क्षयानें वारले.

**वाङ्मय :**

धौममहाबळेश्वरवर्णन; १८७९, १८९१; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

धौममहाबळेश्वरवर्णन; (परीक्षण); नेटिव्ह ओपीनियन, १४, २१; सप्टेंबर, १८७९.

**उपाध्ये, जयकृष्ण केशव** [१८८३–१९३७] कवि. जन्म नागपूर येथें. वयाच्या तेविसाव्या वर्षी वर्धा येथील हनुमानगडावर तीन वर्षें रामनामाचें यांनीं पुरश्चरण केलें. जुन्या मराठी ग्रंथांचें वाचनहि त्यांनीं येथें बहुत केलें. तदनंतर तीर्थयात्रा करीत हे हिंदुस्थानभर हिंडले. पण मनाला अपेक्षित समाधान न मिळाल्यामुळें आपल्या जन्मभूमीस परत येऊन त्यांनीं गृहस्थाश्रम स्वीकारला. या आश्रमाचेंहि सुख त्यांना फार काळ लाभलें नाहीं. अवघीं दहा वर्षें ते या आश्रमांत राहिले. त्या अवधींत त्यांची पत्नी व मुलें निवर्तलीं. सर्व कौटुंबिक पाश तुटले व ते निःसंग बनून हिंडूं लागले. त्यांची वृत्ति कांहींशी माधुकरी बनली होती. 'बहिस्त्यागी अंतःसंगी' अशा कोटींतील ते होते आणि त्यामुळेंच ते 'बुवा' या या नांवानें मित्रमंडळीकडून संबोधिले जात.

बुवा लहानपणापासूनच कविता रचूं लागले होते. आणि पुढें जुन्या कवितेशीं चांगलाच परिचय घडल्यामुळें त्यांच्या भाषेला एक प्रकारचा डौल आला होता. अत्यंत रसानुकूल, भावव्यंजक व समर्पक अशी त्यांची शब्दरचना असे.

बुवांची कविता संख्येनें अल्प आहे, पण गुणांनीं बहुमोलाची आहे. "त्यांनीं आपल्या कवितेमध्यें विडंबनाचा प्रकार बराच खेळविला आहे. पण हीं विडंबनें त्यांनीं चटोरपणाची हौस भागविण्यासाठीं लिहिलेलीं नसून दांभिकपणाला शासन लावण्याकरितां रचिलेलीं आहेत. बुवांनीं जगाच्या विविध अनुभवांत यथेच्छ बुड्या मारल्या असल्या तरी त्यांच्या स्वभावांत निष्कपट भाविकपणा धुऊन टाकलेला नव्हता. आत्मौपम्यानें जगसुद्धां प्रामाणिक आहे, असा त्यांचा समज होत असे. ज्याच्या प्रामाणिकपणाचा विश्वास बाळगला तोच कावेबाज ढोंगी आहे असें त्यांना उमगलें म्हणजे त्याचा त्वेष येत असे व अशा त्वेषाच्या भरांत त्यांनीं कित्येक विडंबनें लिहिलीं आहेत. त्यांचीं विडंबनें कवित्वाच्या नात्यानें निरंतर ओळखलीं जातील. त्यांमध्यें नुसतीच कल्पनाविकृति नसून अस्सल कवित्व आहे." †

उपाध्ये यांची स्फुट कविता 'पोपटपंची' या नांवानें संग्रहित करण्यांत आली

† न. र. फाटक, ज्योत्स्ना, नोव्हेंबर, १९३७.

आहे. या स्फुट कवितेव्यतिरिक्त लोकमान्य टिळकांचें ओंवीबद्ध चरित्र लिहिण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. पण तो अपूर्णच राहिला. उमरखय्यामच्या रुबायांचें फिट्झ्जेराल्ड्च्या अनुवादावरून त्यांनीं एक भाषांतर प्रसिद्ध केलें आहे.

नागपुरास कांहीं वर्षे निघत असलेल्या 'वागीश्वरी' मासिकाच्या संपादकमंडळांत ते होते.

**वाङ्मय :**

(१) लोकमान्य चरितामृत, प्रथम खण्ड, १९२४.
(२) पोपटपंची, १९२९.
(३) उमरखय्याम "रुबाया" व "घटचर्चा", १९३२.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

(१) कविवर्य जयकृष्ण केशव उपाध्ये, श्री. ना. बनहट्टी.
(२) ज. के. उपाध्ये यांचीं भावगीतें, शं. बा. शास्त्री.
(३) कै. बोवा, जयराज वासुदेव विंचुर्णे.
(४) कवि ज. के. उपाध्ये यांचा व्यक्तिपरिचय, दे. गो. लांडगे.
(५) बोवांचे कांहीं स्वभावविशेष, र. द. सरंजामे.
वरील सर्व लेख 'विहंगम मासिक', सप्टेंबर १९३७ मध्यें प्रसिद्ध झाले आहेत.
(६) पोपटपंची; परीक्षण, या. मु. पाठक; वागीश्वरी, वर्ष १ लें, विलास ३.
(७) पोपटपंची; परीक्षण, वा. ह. घारपुरे; ज्ञानप्रकाश, ३० ऑगस्ट १९२९.
(८) जयकृष्ण केशव उपाध्ये, जीवनवृत्तान्त; न. र. फाटक, ज्योत्स्ना, नोव्हेंबर १९३७.

**ओक, जनार्दन विनायक** [१८७९–१९१७] शिक्षक, संपादक, कोशकार. जन्म पुणें येथें. सर्व शिक्षण पुणें येथेंच झालें. मॅट्रिकच्या परीक्षेंत जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति मिळविली होती. डेक्कन कॉलेजांतून १९०१ सालीं एम. ए. ची परीक्षा दिली. एल्एल्. बी. चे अभ्यासासाठीं मुंबईस राहिले, पण हवा न मानवल्यामुळें परीक्षेचा विचार सोडून ते पुण्यास आले. फर्ग्युसन कॉलेजांत

त्यांनीं तीन वर्षें अध्यापनकार्य केलें. पुढें मध्यप्रांत-वऱ्हाड शिक्षणखात्यांत त्यांस नोकरी मिळाल्यामुळें ते तिकडे गेले. नागपूर येथील सिटी हायस्कूलचे मुख्याध्यापक म्हणून त्यांची नेमणूक झाली होती. त्यांस या ठिकाणीं दरमहा चारशें रुपये पगार मिळत असे. परंतु लो. टिळकांनीं एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें 'बाल्ये राजगुरुर्यता यौवने भृतिदो नृपः। तथा पेन्शनदाता च न हिंदुः प्रभुरात्मनः' या राजनीतीच्या तत्त्वांत चिरडून जाऊन जन्मल्यापासून मरेपर्यंत सर्व लोक एकसारखे दास्यत्वांत मुरले जावे, आणि एक पिढी अशी मुरली म्हणजे तिचे आनुवंशिक संस्कार दुसऱ्या पिढीस मिळून अशा रीतीनें राष्ट्रभक्तिशून्य पुरुषांची सरकारी नोकरीकरितां परंपरा तयार व्हावी, या हेतूनें निघालेलीं रिस्ले सर्क्युलरसारखीं सर्क्युलरें हायस्कूलचा मुख्याधिकारी म्हणून तरुण विद्यार्थ्यांवर बजावण्याचें पाप आपल्या हातून होऊं नये, या हेतूनें त्यांनीं या जागेचा दहा-बारा महिन्यांच्या आंतच राजिनामा दिला. नोकरीचा राजिनामा दिल्यावर प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर यांनीं स्थापन केलेल्या 'समर्थ विद्यालय' या राष्ट्रीय शिक्षणसंस्थेंत जुळल्यास काम करावें अशा हेतूनें १९०८ च्या एप्रिलांत ते तळेगांव येथें आले. तेथें येऊन त्यांनीं समर्थ विद्यालयाची समक्ष पाहणी केली व चालकमण्डळीशीं विचारविनिमय केला. त्यांच्या स्वातंत्र्याभिमानी वृत्तीस ही संस्था बरी वाटली व ते लगेच तिचे आजन्म सेवक झाले. या संस्थेचा आजन्म सेवक होण्यांत त्यांनीं विलक्षण स्वार्थत्याग दाखविला. कोठें दरमहाचा चारशें रुपये पगार व कोठें चाळीस रुपयांचें आजन्म सेवकाचें वेतन!

ओक समर्थ विद्यालयांत आल्यापासून विजापूरकरांनीं चिटणिशीचें काम त्यांच्याकडे सोंपवून आपणांस प्रचाराच्या कामास सर्वस्वीं वाहून घेतलें. विद्यालयाचें चालकत्व प्रामुख्यानें त्यांचे हातांत येतांच त्यांनीं विद्यालयाला सर्व बाजूंनीं व्यवस्थित स्वरूप आणण्याचे आटोकाट प्रयत्न केले. दुर्दैवानें १९१० सालीं समिती कायद्याची जी गदा विद्यालयावर कोसळली ती जर कोसळली नसती तर त्यांनीं समर्थ विद्यालयाला एक प्रमुख आदर्श विद्यालय बनविलें असतें.

समर्थ विद्यालय बंद पडल्यावर 'लोकशिक्षण' नांवाचें मासिक व 'लोकशिक्षणमाला' नांवाची एक पुस्तकमाला त्यांनीं १९१२ सालीं सुरू केली. 'लोकशिक्षण' मासिक १९१७ पर्यंत चालू होतें. यांत त्याच्या नांवाला शोभतील असे विविध विषयांवरील माहितीनें भरलेले, तसेंच चर्चात्मक लेख येत. ज्ञानकोशकार डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर, प्रो. वामन मल्हार जोशी, 'महाराष्ट्रीय', ना. गो.

चापेकर, म. म. दत्तो वामन पोतदार, वगैरे विद्वान् या मासिकाच्या लेखकवर्गांत प्रामुख्यानें आढळतात. 'लोकशिक्षणमाले'तून प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांत 'गीर्वाण लघुकोश', 'बीजगणित', 'सुलभ संस्कृत प्रवेश', 'काव्हूर उर्फ इटलीचा रामदास' वगैरे ग्रंथ मोडतात. त्यांपैकीं पहिले दोन स्वतः ओक यांनीं तयार केले होते. त्यांपैकीं 'गीर्वाण लघुकोश' हा त्यांचें एकप्रकारचें चिरंतन स्मरण करून देणारा ग्रंथ आहे असें म्हटलें तर ती अतिशयोक्ति खास होणार नाहीं. संस्कृत भाषेचा मराठींतून अभ्यास करूं इच्छिणाऱ्यांस उपयुक्त होणारा याच्या इतका सुंदर कोश नाहीं. 'बृहत्कोश' तयार करण्याचीहि ओक यांनीं उमेद बाळगली होती. पण अकाल मृत्यूमुळें सर्व बेत जेथल्या तेथेंच राहिले.

**वाङ्मय :**

(१) गीर्वाण लघुकोश [संस्कृत–मराठी]; शके १८३७, आर्यभूषण छापखाना, पुणें.
(२) बीजगणित, आ. २ री, १९१५; आ. ६ वी, १९२५, पुणें.

**ओक, वामन दाजी** [१८४५–१८९७] काव्याभ्यासक, काव्यसंशोधक व निबंधलेखक. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांतील चिपळूण तालुक्यांतील हेदवी नांवाचे गांवीं झाला. यांचें प्राथमिक शिक्षण गांवींच एका तात्या पंतोजीचे हाताखालीं व मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण रत्नागिरी हायस्कुलांत झालें. या वेळेस या हायस्कुलांत डॉ. भांडारकर हे अध्यापक होते. त्यांचे हाताखालींच त्यांचें संस्कृतचें अध्ययन झालें. १८७० सालीं त्यांनीं मॅट्रिकची परीक्षा दिली व संस्कृतची पहिली जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति मिळविली. पुढें एल्फिन्स्टन व वुइल्सन या कॉलेजांत ते अभ्यास करीत होते. परंतु मध्येंच कांहीं अडचण उपस्थित झाल्यामुळें शिक्षण सोडून त्यांस नोकरी पत्करावी लागली. १८७५ त नागपूरच्या सिटी स्कुलांत ते उपगुरु म्हणून काम करूं लागले. निबंधमालाकार विष्णु कृष्ण चिपळूणकर हे या वेळीं मोरोपंतांवर निबंध (मार्च १८७७) लिहीत होते. या विषयावर मालाकार व वामनराव यांचा ईर्षेचा सामना झाला. वामनरावांना स्वतंत्र मासिकाच्या अभावीं आपला निबंध निबंधमालेंतच प्रसिद्धीकरितां पाठवावा लागला, व मालाकारांनीं त्याला स्थळहि दिलें. त्यांच्या लेखांचें आरंभींचें स्वरूप सौम्य असून पुढें तें फार कडक होत गेलें

आहे व शेवटीं तर मालेच्या जनकास, 'मन मानेल तसा अभिप्राय झोंकून देणें अत्यंत साहसात्मक, गर्हणीय व अनुचित होय,' असा शेरा देऊन चुका कबूल करावयास लाविलें आहे. मालाकारांवर जय मिळविल्यामुळें वामनरावांचें नांव महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं झालें. वामनराव १८८३ पर्यंत सिटी स्कूलमध्यें होते. पुढें १८८४ सालीं त्यांनीं ती जागा सोडली व ते नागपूरच्या मेन नॉर्मलस्कूलचे सुपरिंटेंडेंट झाले; नंतर संबळपूरच्या हायस्कुलावरील मुख्य अध्यापक झाले. येथें त्यांनीं पांच वर्षे काम केलें. याच वेळेस निर्णयसागर छापखान्यानें 'काव्यमाला' व 'काव्यसंग्रह' हीं दोन मासिकें प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली होती. या मासिकांचें संपादकत्व जनार्दन बाळाजी मोडक यांजकडे होतें. ते १८९० सालीं वारले. त्यांच्या पश्चात् या मासिकांच्या संपादनाचें काम वामनरावांकडे सोपविण्यांत आलें. हें काम त्यांनीं इतकें उत्कृष्ट बजाविलें आहे कीं, त्याबद्दल महाराष्ट्र त्यांचा नेहमीं कृतज्ञ राहील.

'काव्यसंग्रहा'खेरीज इतिहासविषयक संशोधन व लेखनहि त्यांनीं विपुल केलें. या संशोधनाचे कामीं त्यांनीं अपार श्रम केले. 'काव्येतिहाससंग्रहां'तून प्रसिद्ध झालेले 'नागपूरकर भोंसल्यांची बखर' व 'नागपूरकर भोंसल्यांचे कागदपत्र' हे दोन ग्रंथ या परिश्रमाचीं फळें होत.

ओकांच्या लेखनकर्तृत्वाबद्दल 'बालबोध'कर्ते ओक लिहितात, "वामनरावांपुढें मराठी भाषा अगदीं हात जोडून उभी होती, आणि मनांतला कोणताहि अर्थ अगदीं चित्र बरोबर रीतीनें व्यक्त करण्यास—बिनचूक ओळख पटेल असें त्याचें शब्दरूपानें काढण्यास—त्यांस मुळींच प्रयास पडत नसत. असें असून भाषा शुद्ध, सरळ, गोड, रसाळ आणि मोठी भारदस्त अशी असे. त्यांतहि पुस्तकपरीक्षणाविषयीं त्यांचा हातखंडा असे. पुस्तकांतील गुण आणि दोष हे दोन्ही समूह त्यांच्यासमोर जसे एकमेकांवर उड्या घेत असत. आणि ते त्यांवर चर्चा मोठ्या उदार बुद्धीनें आणि निःपक्षपातानें करीत असत. ह्यामुळें त्यांच्या हातचें पुस्तकपरीक्षण ग्रंथकारांस बोधप्रद आणि अन्य जनांस मनोरंजक होत असे. हे इतके उत्तम ग्रंथकाराचे गुण वामनरावांच्या ठायीं असून, शिवाय, कविहृद्गत—नुसतें स्वतः समजण्याचीच नव्हे—तर तें आपल्या मधुर भाषेनें, वाचकांच्या अंतःकरणांत बिंबविण्याची शक्ति ह्यांचे अंगीं होती. ती अप्रतिम होती. ही त्यांची शक्ति ते 'काव्यसंग्रह' चालवूं लागल्यापासून विशेष प्रकट झाली." *

* बालबोध, जुलै १८९७.

१८९१ सालीं त्यांची बदली रामपूरच्या हायस्कूलच्या हेडमास्तरच्या जागीं झाली. या जागेवर ते अखेरपर्यंत होते. उद्योगातिरेकामुळें त्यांची प्रकृति क्षीण झाली होती. त्यांची पत्नी अकालीं निवर्तल्यामुळें प्रपंचाचा सर्व भार त्यांचेवरच पडला होता आणि त्यांत शिक्षकाचा धंदा असल्यामुळें विसांवा असा त्यांस मिळाला नाहीं. त्यामुळें त्यांस फार लवकर मृत्यु आला.

वामनराव जसे काव्याभ्यासक तसेच इतिहाससंशोधक कवीहि होते.

**वा ङ्म य :**

(१) लॉर्ड बेकन ह्यांचें चरित्र; १८८४; निर्णयसागर छापखाना, मुंबई.
(२) बाबा नानक ह्यांचें चरित्र; १८८९; इंडियन प्रेस, मुंबई.
(३) कादंबरीकथासार; १८८९.
(४) मुद्राराक्षसकथासार; १८८९.
(५) वासवदत्ताकथासार; १८८९.
(६) गणपतिनिधनविलाप; [सार्वजनिक काका गणेश वासुदेव जोशी यांवर विलापिका]; पद्य; १८८०, निर्णयसागर; १८८३, सुबोध प्रकाश, मुंबई.
(७) श्रीमन्माधवनृपनिधनवर्णनात्मक पद्यरत्नमाला अथवा थोरले माधवराव पेशवे यांचा मृत्यु; १८८३; इंडियन प्रेस, मुंबई.

संपादन :

(१) काशीराव राजेश्वर गुप्ते विरचित नागपूरकर भोंसल्यांची बखर; शके १८०७; काशीनाथ नारायण साने यांच्या 'काव्येतिहास-संग्रह' मासिकांतून प्रसिद्ध.
(२) नागपूरकर भोसल्यांच्या संबंधाचे कागदपत्र; (अर्थनिर्णायक टीपांसह); शके १८११; काव्येतिहास-संग्रह मासिकांतून प्रसिद्ध.
(३) अनेक कविकृत पदें, कटाव, लावण्या वगैरे–पदसंग्रह, भाग १; १८९४; भाग २; १८९६; निर्णयसागर छापखाना, मुंबई.
(४) अनेक कविकृत लघुकाव्यमाला–भाग पहिला, १८९५; भाग दुसरा, १८९६; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(५) काव्यमाधुर्य, [अर्वाचीन मराठी कवितांतल्या उत्तम वेंच्यांचा संग्रह], भाग पहिला, १८८४; इंडियन प्रेस, मुंबई; भाग दुसरा, १९०२; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

(६) महाराष्ट्र कवि अनंतकृत कवितासंग्रह; १८९६, निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(७) महाराष्ट्र कवि अमृतरायकृत कवितासंग्रह; (जनार्दन बाळाजी मोडक यांचेसह); १८९२, निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(८) महाराष्ट्र कवि आनंदतनयकृत कवितासंग्रह; (जनार्दन बाळाजी मोडक यांचेसह; १८९१; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(९) वैदर्भदेशस्थ प्रसिद्ध साधुवर्य देवनाथमहाराजकृत कवितासंग्रह; आ. २ री, १९०१; आ. ३ री, १९२९; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(१०) महाराष्ट्र कविवर्य मुक्तेश्वरकृत महाभारत :—

१. आदिपर्व; [अर्थनिर्णायक टीपांसह]; १८९३; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

२. सभापर्व; [अर्थनिर्णायक टीपांसह]; १८९४; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

३. वनपर्व; [अर्थनिर्णायक टीपांसह]; १८९८; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(११) महाराष्ट्र कविवर्य मोरोपंतकृत महाभारत :—

(१) आदिपर्व, १९००; (२) सभापर्व, १८९१; (३) वनपर्व, १८९२; (४) विराटपर्व, १८९६; (५) उद्योगपर्व, १८९६; (६) भीष्मपर्व, १८९८; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(१२) वामन पंडितकृत यथार्थदीपिका—भाग पहिला, अध्याय १–४; १८९६; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(१३) महाराष्ट्र कवि विठ्ठलकृत कवितासंग्रह; [सटीप]; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(१४) साधुवर्य सोहिरोबानाथ आंबियेकृत पारमार्थिक कवितासंग्रह—१ सिद्धान्त संहिता—पूर्वार्ध; [पहिले नऊ अध्याय]; १८९६; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

**ओक, विनायक कोंडदेव** [१८४०–१९१४] चरित्रकार, निबंधकार, बालवाङ्मयाचा निर्माता. यांचें घराणें रत्नागिरी जिल्ह्यांतील गुहागर या गांवचें. यांचा जन्म हेदवी या गांवीं झाला. ल्हानपणींच आई व वडील वारल्यामुळें त्यांची शिक्षणाचे बाबतींत आबाळच झाली. त्यांना थोडेंसें मराठी व इंग्रजी तीन इयत्तांपर्यंत कांय तें शालेय शिक्षण मिळालें. पण पुढें स्वकष्टानें त्यांनीं इंग्रजीचें ज्ञान वाढवून आपला सरकारी शिक्षणखात्यांत प्रवेश करून घेतला. हे आठ रुपये पगाराच्या मास्तरकी-पासून वाढत वाढत शंभर रुपये पगाराच्या अ. डे. एज्युकेशनल इन्स्पेक्टरचे जागे-पर्यंत चढले. यांनीं आपल्या वयाच्या २४-२५ व्या वर्षी लेखनाला सुरुवात केली. कांहीं इंग्रजी निबंधांच्या आधारें लिहिलेलें 'लघुनिबंधमाला' हें यांचें पहिलें पुस्तक होय. या निबंधसंग्रहाला 'दक्षिणा प्राइझ कमिटी' नें बक्षीस देऊन त्याची फार प्रशंसा केली. त्या वेळचे एक विद्वान् व मुंबईतील इंदुप्रकाश छापखान्याचे मालक विष्णु-शास्त्री पंडित यांनीं तें १८६६ सालीं प्रसिद्ध केलें. या पुस्तकावर ओक यांचें नांव छापलेलें नाहीं. या पुस्तकाला मिळालेल्या उत्तेजनामुळें प्रोत्साहित होऊन यांनीं आपला लेखनव्यासंग चालू ठेविला व आयुष्याच्या अखेरपर्यंत तो अखंडित-पणें चालविला. 'दिसामाजिं कांहींतरी तें लिहावें' अशी त्यांची वृत्ति बनली होती. चरित्रें, इतिहास, कथा, कविता, निबंध असें यांचें विविध स्वरूपाचें आणि विपुल असें लेखन आहे. मुलांकरितां 'बालबोध' नांवाचें मासिक यांनीं मुंबईच्या निर्णय-सागर छापखान्याकडून प्रसिद्ध करवून स्वतः त्याचें चौतीस वर्षे संपादन केलें. १८८१ च्या एप्रिल महिन्यांत याचा पहिला अंक प्रसिद्ध झाला. या मासिकाच्या उद्देशासंबंधीं त्यांनीं 'पहिली भेट' या मथळ्याखालीं पुढीलप्रमाणें लिहिलें आहे. "मुलांनो, ही तुमची आमची पहिली भेट आहे. आम्ही दर महिन्याच्या पहिल्या तारखेस तुम्हांला भेटायला येऊं आणि तुमच्या उपयोगी पडतील व तुम्हांला आनंद होईल, अशा थोड्याशा गोष्टी तुम्हांला सांगूं. तर आमचा हेतु सिद्धीस नेण्यास म्हणजे आमची भेट घेण्यास आणि आम्ही सांगूं त्या गोष्टी ऐकण्यास तुम्ही तयार असावें, हें तुम्हांपाशीं मागणें आहे."

"शाळेंत कळत नाहींत, पण तुम्हांला कळल्या तर पाहिजेत, अशा लक्षावधि गोष्टी आहेत. त्यांतल्या थोड्या थोड्या आम्हीं दर खेपेस तुम्हांस अगदीं सोप्या व मनोरंजक भाषेंत सांगून तुमच्या अंगचे सद्गुण वाढावे, आणि दिवसेंदिवस तुम्हीं शहाणें आणि सुखी व्हावें, ह्यासाठीं हा आमचा प्रयत्न आहे. हा परमेश्वर सफल करो."

'बालबोध' मासिकाच्या प्रत्येक अंकांत एखाद्या थोर व्यक्तीचें चरित्र, एक-दोन ज्ञानपर निबंध, एखादी नीतिपर कविता, कांहीं चुटके व शेवटीं 'लोक काय बोलतात' या मथळ्याखालीं चुणचुणीत व चमत्कारिक अशा दोन-तीन पृष्ठें बातम्या, असा एकंदर मजकूर असावयाचा. मुलेंच काय पण मोठीं माणसेंहि 'बालबोध' उत्सुकतेनें वाचीत. याची वर्गणीहि अत्यल्प—बारा आणे—असल्यामुळें याचा ग्राहकवर्गहि फार मोठा होता. खेडोपाडींहि तें वाचलें जाई. स्वतः ओकांनीं आपल्या ३४ वर्षांच्या संपादकीय कारकीर्दीत 'बालबोधां'त ४०२ चरित्रें, ४०२ कविता, ४०२ निबंध, ३७१ शास्त्रीय विषयांवरील निबंध, आणि इतर विषय ८५०, एवढें लिहिलें आहे.

ओकांची लेखणी बहुप्रसव होती. त्यांच्या भाषेचें रूपहि अव्याज मनोहर असें होतें. मराठी भाषेचें अस्सल मुंबापुरी वळण पाहावयाचें झाल्यास त्यांची भाषा पहावी. 'वाक्यें फार लांब नसायचीं; संस्कृत शब्द अगदीं थोडे, व्यवहारांतले तेवढेच. भाषा अगदीं सरळ, साधी, सोपी.' त्यांच्या या भाषापद्धतीला स्वतंत्र विचारशक्तीची जोड मिळाली असती तर त्यांच्या वाङ्मयाला मोल नव्हतें. त्यांनीं जें कांहीं लिहिलें आहे तें बहुतेक अनुवादात्मक किंवा इंग्रजी ग्रंथांच्या आधारें. ते ग्रंथहि सामान्य दर्जाचे. त्यांनीं जीं चरित्रें लिहिलीं तींहि अशींच. स्वकीयांचीं अशीं दोन—जावजी दादाजी चौधरी, सर दिनकरराव राजवाडे—व बाकीचीं परकीयांचीं. चरित्रलेखनाला आवश्यक असलेल्या गुणांचा व कसबाचा त्यांच्यांत अभावच होता. चरित्राच्या बाबतींत त्यांचें एक ढोबळ धोरण होतें, तें असें कीं, 'नायकाचे गुण तेवढे दाखवावे, दोषांविषयीं बोलूं नये.'

ओकांची निबंधकार या दृष्टीनें योग्यता मात्र फार मोठी आहे. त्यांनीं अनेक विषयांवर लिहिलें. आकर्षक, आटोपशीर व सुबोध असें त्यांचें निबंधलेखन असे.

**वाङ्मय :**

(१) पीटर धि ग्रेट ह्यांचें चरित्र; १८७४; सरकारी विद्याखातें; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

(२) शिकंदर बादशहाचें चरित्र; १८७५; सरकारी विद्याखातें; एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई.

(३) आल्फ्रेड धि ग्रेट ह्याचें चरित्र; १८८२; निर्णयसागर, मुंबई.
(४) सर टॉमस मन्रो याचें चरित्र; [ग्लिगसाहेबाच्या इंग्रजी ग्रंथाचा संक्षेप]; १८८६; डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी, निर्णयसागर, मुंबई.
(५) ग्लॅडस्टनचें चरित्र; १८९९, १९११; निर्णयसागर, मुंबई.
(६) नामदार रावराजे सर दिनकरराव राजवाडे ह्यांचें चरित्र; १८९७; निर्णयसागर, मुंबई.
(७) अमीर अब्दुल रहिमान चरित्र; १९०२; दामोदर सावळाराम आणि मंडळी, बडोदें.
(८) ड्यूक ऑफ वेलिंग्टनचें चरित्र; १८७६; सरकारी विद्याखातें, एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई.
(९) जावजी दादाजी चौधरी ह्यांचें चरित्र; १८९२; निर्णयसागर, मुंबई.
(१०) सॅम्युअल जॉन्सन ह्याचें चरित्र; १८८३; निर्णयसागर, मुंबई.
(११) वॉरन हेस्टिंग्ज ह्याची गोष्ट; १८७९; निर्णयसागर, मुंबई.
(१२) एब्राहाम लिंकन ह्याचें संक्षिप्त चरित्र; १८९०; निर्णयसागर, मुंबई.
(१३) हिंदुस्थानचा संक्षिप्त इतिहास; आ. २ री, १८७०; आ. ४ थी, १८७५; सरकारी विद्याख्यातें, मुंबई.
(१४) हिंदुस्थानकथारस; १८७१; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.
(१५) इतिहास-तरंगिणी; (जगांतील प्रसिद्ध राष्ट्रांचा इतिहास); १८७८; सरकारी शाळाखातें; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.
(१६) शिपायांच्या बंडाचा इतिहास; १८७४; एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई.
(१७) रोम (राष्ट्रकथामाला, ९) १८९६; तत्त्वविवेचक प्रेस, मुंबई.
(१८) फ्रान्स देशांतील राज्यक्रांतीचा इतिहास; १८७६; सरकारी विद्याखातें; एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई.
(१९) महाराष्ट्र ग्रंथसंग्रह; (ग्रंथ कसे व्हावेत? व ग्रंथालयाचें महत्त्व); १८९७.
(२०) महाराष्ट्र वाङ्मय; (प्राचीन मराठी वाङ्मयाचें सिंहावलोकन; मुख्यत्वें विविध कवींच्या उत्कृष्ट वेंच्यांचा संग्रह); १९०६; निर्णयसागर, मुंबई.

(२१) सांप्रतच्या लेखकांचें कर्तव्य; १९०९; निर्णयसागर, मुंबई.
(२२) अनुकरण; १८९०; निर्णयसागर, मुंबई.
(२३) शिक्षकांस थोडासा बोध; १८९०; निर्णयसागर, मुंबई.
(२४) स्वदेशाभिमान; १८८९ निर्णयसागर, मुंबई.
(२५) प्रपंचरहस्य; [प्रपंचासंबंधीं कांहीं निवडक विचार]; आ. २ री, १९०२; निर्णयसागर, मुंबई.
(२६) फुलांची परडी; [उत्तम उत्तम चुटक्यांचा संग्रह]; आ. २ री; १८९१; निर्णयसागर, मुंबई.
(२७) गद्य रत्नावली; [संकीर्ण निबंध; इंग्रजी ग्रंथाचे आधारें]; १८७३; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.
(२८) महन्मणिमाला; [कॉर्नवालिस, सर जॉन माल्कम, मेटकाफ, लॉरेन्स इत्यादींचीं चरित्रें]; १८८०; सरकारी विद्याखातें, निर्णयसागर छापखाना, मुंबई.
(२९) पुष्पवाटिका; [अर्वाचीन पद्य]; १८७१, १८७४; एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई.
(३०) मधुमक्षिका; [अनेक उपयुक्त व मनोरंजक विषयांचा संग्रह]; १८७१, मुंबई विद्याखातें; आ. १० वी, १९२६; निर्णयसागर, मुंबई.
(३१) मुलांचें कल्याण, आ. २ री, १८८५; निर्णयसागर, मुंबई.
(३२) मुलांस उत्तम बक्षीस; [लहान लहान विषयांवर बोधपर निबंध, गोष्टी, कविता]; १८७९, आ. ७ वी, १९१६; निर्णयसागर, मुंबई.
(३३) आनंदराव, [सामाजिक कथा; इंग्रजी कथेच्या आधारें]; १८८२, १८८९; निर्णयसागर, मुंबई.
(३४) शिरस्तेदार, [सामाजिक कादंबरी]; १८८१, १८९१; निर्णयसागर, मुंबई.
(३५) बालसंगोपन सूचना; [राजा सर टी. माधवराव यांच्या मूळ इंग्रजी पुस्तकाधारें]; १८९०, १९०४; इंदुप्रकाश, मुंबई.
(३६) लहान मुलांचें आरोग्य; १९००; ख्रिश्चन लिटरेचर सोसायटी, मुंबई.
(३७) लघुनिबंधमाला; १८६६, १८७६; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

कांहीं छोटीं संकीर्ण स्वरूपाचीं पुस्तकें :

खिश्चन लिटरेचर सोसायटी, मुंबई, यांजकरितां लिहून दिलेलीं.

१. कारंजें आणि ढग; आ. ४ थी, १९०१.

२. फुलें आणि फळें; १९०१.

३. महारोगी बरा झाला; आ. ३ री, १९०३.

४. मोत्यांचा व्यापारी; आ. ४ थी, १९०२.

५. राजपुत्र कसें व्हावें ? १८९९.

६. राजा आणि त्याचा सेवक; आ. ४ थी, १९०१.

७. राजाचें आगमन; १९१९.

८. राणीची गोष्ट; आ. ४ थी, १९०२.

९. लहान तुकाराम याची गोष्ट; आ. ३ री, १८९९.

१०. लांडग्याची गोष्ट; आ. ४ थी, १९०२.

११. सूर्यप्रकाश; आ. ४ थी, १९०१.

**ओगले, केशव लक्ष्मण** [१८८२–१९४८] पत्रकार, भाषांतरकार, संस्कृत वाङ्मयाचा, विशेषतः धर्मशास्त्राचा, गाढा अभ्यासक. मुंबई विद्यापीठाचे पदवीधर होते. शिक्षकाच्या व पत्रकाराच्या व्यवसायांत यांचें आयुष्य गेलें. लो. टिळक यांच्या पुस्तकांचीं अनुक्रमें 'वेदकालनिर्णय' व 'आर्य लोकांचें मूलस्थान' या नांवानें त्यानीं जीं भाषांतरें केलीं त्यामुळें ते लोकांच्या नजरेसमोर पहिल्यानें विशेषत्वानें आले. लो. टिळकांच्या राजकीय विचारसरणीचे ते निष्ठावंत पुरस्कर्ते होते. त्यामुळें १९०८ सालीं 'राष्ट्रमत' व पुढें १९२१ नंतर धुळें येथील 'प्रबोध' साप्ताहिक व मुंबईतील 'लोकमान्य' व 'श्री–लोकमान्य' या दैनिकांशीं त्यांचा संपादकीय संबंध जडला. ओगले यांचा पिंड चळवळ्याचा नसून अभ्यासकाचा असल्यामुळें प्रत्यक्ष राजकीय चळवळींत असे ते कधीं पडले नाहींत. वाचन व लेखन यांकडेच त्यांचा ओढा असे. जाहीर वादविवादांत ते कधीं भाग घेत नसत. समानशीलांशीं जी काय चर्चा करीत तेवढीच. संस्कृत वाङ्मयावर त्यांचें अलोट प्रेम होतें. विशेषतः धर्मशास्त्र हा त्यांचा आवडता विषय होता. या विषयाच्या बाबतींत महामहोपाध्याय काणे यांच्याशीं त्यांचें बरेंच बौद्धिक सहकार्य असे. दोघेहि बाळमित्र व समानछंदी

असल्यामुळें या सहकार्यांत एक प्रकारची आत्मीयता व आदरमिश्रित स्निग्धता आलेली होती. काणे यांच्या धर्मशास्त्रविषयक अभ्यासाबद्दल ओगले यांना केवढा आदर व आस्था वाटे याचें निदर्शक म्हणजे 'धर्मशास्त्रविचार' हा ग्रंथ होय. या ग्रंथांत म. म. काणे यांनीं एका चातुर्मासांत मुंबई येथील दक्षिणी ब्राह्मण सभेपुढें 'हिंदु धर्मशास्त्र' या विषयावर जीं एकवीस व्याख्यानें दिलीं तीं संग्रहित केलीं आहेत. काणे यांनीं, शेवटचीं दोन खेरीज करून बाकीचीं उत्स्फूर्त अशींच व्याख्यानें दिलीं. या व्याख्यानांचीं काळजीपूर्वक टिप्पणें घेऊन, तीं फेर लिहून काढून व काणे यांजकडून तीं तपासून घेऊन ग्रंथरूपानें तीं लोकांपुढें ठेवण्याचे परिश्रम ओगले यांनीं केले. हा ग्रंथ प्रसिद्ध झाला त्याचे आधीं चार वर्षें म. म. काणे यांच्या इंग्रजी निबंधावरून यांच्या 'संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास' या नांवाचा मराठींत अनुवाद तयार करून प्रसिद्ध केला. या दोन्ही ग्रंथांमुळें मराठी वाङ्मयांत एक श्रेष्ठ दर्जाची भर पडली आहे.

ओगले यांनीं आपल्या आवडीच्या विषयावर स्फुट असें लेखन पुष्कळ केलेलें आहे. त्यांतील बराच भाग 'विविधज्ञान-विस्तार' या मासिकांत आढळेल. पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेला स्वतंत्र असा निबंध म्हणजे 'कविकुलगुरु कालिदास' हा होय. त्यांनीं आपल्या अखेरच्या दिवसांत 'भागवत' व 'महाभारत' यांचीं केलेलीं भाषांतरें सुंदर वठलेलीं आहेत. प्रतिकूल आर्थिक परिस्थितीशीं झगडावें लागत असतांहि ज्यांनीं आपला बाणेदारपणा; स्वतंत्र वृत्ति यांना धक्का लागूं न देतां प्रसिद्धि विन्मुख राहून आमरण अध्ययन व लेखन चालू ठेवलें अशा फार थोड्या विद्वानांपैकीं ओगले हे एक होते.

**वाङ्मय :**

(१) आर्य लोकांचें मूलस्थान अथवा उत्तर ध्रुवाजवळील आर्यांच्या वसतीविषयीं वेदांतील पुरावा [लो. टिळककृत 'Arctic Home in the Vedas' चें भाषांतर]; १९१०; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(२) वेदकालनिर्णय; [लो. टिळककृत 'The Orion or Researches into the Antiquities of the Vedas' या ग्रंथाचा संक्षेप]; आ. २ री, १९२८; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(३) लोकमान्य टिळकांची वेदविषयक कामगिरी; [टिळकांनीं वेदांविषयीं केलेल्या कामगिरीवर लहान निबंध; विशेषतः त्यांच्या पुस्तकांचें स्वरूप-दर्शन व रसग्रहण]; १९२४; लोकमान्य छापखाना, मुंबई.
(४) तुरुंगाचे नियम व कैद्यांचे हक्क, १९२१; आत्माराम छापखाना, धुळें.
(५) संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास; [म. म. पां. वा. काणे यांच्या इंग्रजी निबंधाचा अनुवाद]; १९३१; श्रद्धानंद छापखाना, मुंबई.
(६) कविकुलगुरु कालिदास; १९३४; लोकशिक्षण लघुग्रंथमाला, पुणें.

**ओगले, गुरुनाथ प्रभाकर** [१८८७–१९४४] कांचकारखानदार व पुरोगामी विचारांचे लेखक. यांचें प्राथमिक व दुय्यम शिक्षण कोल्हापुरांत झालें. १९०४ सालीं मॅट्रिकची परीक्षा पास होऊन पुढें मुंबईच्या व्हिक्टोरिया ज्युबिली टेक्निकल स्कूलमधून त्यांनीं एल्. एम्. ई. ची परीक्षा दिली. या परीक्षेंत त्यांनीं पहिल्या वर्गात पहिला नंबर पटकाविला होता. गणित, चित्रकला व भौतिकशास्त्र यांची त्यांस मूळपासून विशेष आवड असे. १९१३ सालीं त्यांनीं सातारा जिल्ह्यांत स्वतःच्या नांवानें लहान प्रमाणांत कांच कारखाना सुरू करून २०–२५ वर्षांत तो मोठ्या भरभराटीस आणला. स्वतंत्र वृत्तीचे व प्रज्ञेचे कारखानदार म्हणून त्यांनीं लौकिक संपादिला होता. त्यांची सामाजिक विचारसरणी पुरोगामी होती. ते बहुश्रुत असून आपले विचार मोठ्या चमकदार भाषेंत मांडीत. त्यांचे अनेक लेख ‘ किर्लोस्कर ’ या मासिकांत प्रसिद्ध झाले आहेत. त्यांनीं लिहिलेलीं ‘ एडिसनचें चरित्र ’ व ‘ अमेरिका ’ हीं पुस्तकें त्यांच्या व्यासंगी वृत्तीचीं व हौशी लेखनाचीं निदर्शकें आहेत.

**वाङ्मय :**

(१) सुप्रसिद्ध संशोधक थॉमस अल्व्हा एडिसन यांचें चरित्र; १९३२; चित्रशाळा छापखाना, पुणें.
(२) अमेरिका, भाग १ ला; १९३२; सिटी प्रेस, सातारा.

**ओगले, गोपाळ अनंत** [१८७९–१९४५] वृत्तपत्रकार, मध्यप्रांतांतील ‘महाराष्ट्र’ या प्रमुख पत्राचे संस्थापक व संपादक. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांतील

विजयदुर्ग या गांवीं झाला. घरची गरिबी असल्यामुळें स्वतःचें शिक्षण स्वावलंबनानें यांना करावें लागलें. यांचें दुय्यम शिक्षण रत्नागिरी, दापोली या ठिकाणीं झालें. मॅट्रिक झाल्यावर पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्यें हे कांहीं दिवस शिक्षण घेत होते. परंतु प्रापंचिक अडचणींमुळें यांना शिक्षण अर्धवटच सोडावें लागलें. कॉलेज सोडल्यावर, यांच्या मनाचा स्वाभाविक कल देशसेवेकडे असल्यामुळें, पुण्यास लवाटे-भोपटकर या राष्ट्रीय वृत्तीच्या मंडळीनें काढलेल्या 'महाराष्ट्र विद्यालयां'त यांनीं शिक्षकाची नोकरी धरली. या विद्यालयांतील काम सांभाळून, ते उरलेला वेळ लेखनांत, व्याख्यानांत आणि निरनिराळ्या राष्ट्रीय चळवळींत घालवूं लागले. त्यामुळें लोकमान्य टिळकांचें लक्ष लवकरच या होतकरू लेखकाकडे वेधलें जाऊन, राष्ट्रीय पक्षांतील तरुण कार्यकर्त्यांत त्यांची गणना होऊं लागली. १९०६ सालीं टिळकांच्या शिफारशीवरून नागपुरास निघणाऱ्या 'देशसेवक' या पत्रांत काम करण्यासाठीं त्यांस त्या पत्राचे मालक माधवराव पाध्ये यांनीं बोलावून घेतलें. कांहीं दिवसांनीं या पत्राचें संपादकत्व 'संदेश'कार अच्युत बलवंत कोल्हटकर यांच्याकडे गेलें व ओगले हे त्यांचे मुख्य मदतनीस बनले. तो काळ राजकीय दृष्ट्या फार धामधुमीचा होता. जहाल राष्ट्रीय पक्षाच्या मागें सरकार हात धुवून लागलें होतें. या पक्षाचीं पाळेंमुळें खणून काढावयाचीं अशा निर्धारानें कांहीं सरकारी अधिकारी वागत असत. अशा स्थितींत 'देशसेवका'सारखें जळजळीत विचाराचें वर्तमानपत्र टिकून राहणें कठीण होतें. १९०८ सालीं अच्युतराव कोल्हटकर यांजवर राजद्रोहाचा खटला होऊन त्यांस सजा झाली. त्यांच्या पश्चात् 'देशसेवका'च्या संपादनाची जबाबदारी ओगले यांजवर येऊन पडली. पण सरकारनें त्यांनाहि इंगा दाखविलाच. १९०९ च्या मार्च महिन्यांत त्यांच्यावर १०८ कलमाखालीं खटला भरून, त्यांजकडून तीन हजारांची जमानत मागण्यांत आली. ओगले यांनीं या खटल्यांत केलेलें स्वतःच्या बचावाचें भाषण इतकें जळजळीत होतें कीं, "त्यांचा बचाव हा त्यांच्या लेखापेक्षां जास्त राजद्रोही आहे," असे उद्गार न्यायमूर्तींनीं आपल्या निकालांत काढले. या खटल्यामुळें 'देशसेवका'शीं असलेला त्यांचा संबंध तुटला. तदनंतर ते कांहीं दिवस मुंबईस निघणाऱ्या 'राष्ट्रमत' पत्रांत राहिले. पण हेंहि पत्र प्रेस ॲक्टखालीं सरकारनें चिरडून टाकलें. सरकारी गुप्तखात्याचा ससेमिरा त्यांच्यामागें लागला. हा ससेमिरा चुकविण्यासाठीं जवळ जवळ चार वर्षें त्यांस अज्ञातवासांत काढावीं लागलीं.

१९१४ सालीं, मोर्ले-मिंटो सुधारणांमुळें बदलत चाललेल्या परिस्थितीचा फायदा

घेऊन पुन्हा एक वेळ राष्ट्रीय पक्षाला पुनरुज्जीवित करावें या हेतूनें नागपुरास डॉ. मुंजे प्रभृति मंडळींनीं चळवळीस सुरुवात केली. या चळवळीला पोषक असें आपलें वर्तमानपत्र असावें असें वाटून त्यानीं ओगले यांस बोलावून घेतलें. आणि अशा रीतीनें 'महाराष्ट्र' पत्राची (फेब्रुवारी १९१४) स्थापना झाली. हें पत्र त्यांनीं अत्यंत चिकाटीनें व धडाडीनें तीस वर्षें चालविलें. आपला स्वतंत्र बाणा न सोडतां जनतेला 'महाराष्ट्र' आपला आहे असें वाटावें अशा धोरणानें त्यांनीं तो चालविला. सामाजिक, राजकीय, आर्थिक बाबतींत 'महाराष्ट्र'चा दृष्टिकोन राष्ट्रीय पक्षाच्या इतर वर्तमानपत्रांहून अधिक व्यापक आणि प्रगमनशील ठेवण्याकडे त्यांचा कल असे. त्यामुळें सर्व पक्षांत त्यांच्या शब्दाला फार मोठा मान दिला जाई.

ओगले यांचे पुष्कळ वर्षांचे एक सहकारी ग. त्र्यं. माडखोलकर यांनीं, पत्रकार व लेखक या दृष्टीनें, ओगले यांचें वैशिष्ट्य पुढीलप्रमाणें वर्णिलें आहे : *

"ओगले यांच्या लेखनाचा आत्मीय गुण कोणता असें जर मला कोणीं विचारलें, तर मी 'उपरोध' असें उत्तर देईन. मात्र त्यांच्या व्याजोक्तीचा बाणा हा, परांजपे किंवा केळकर यांच्या लेखनशैलीप्रमाणें, उपमालंकारांच्या सुंदर पिसांनीं भूषविलेला नसतो; तर त्याच्या शाणनिशित अग्राला फक्त उपरोधाचें गरळ तेवढें मुबलक माखलेलें असतें. कोंकणी माणसें हीं स्वभावतःच उपरोधिक असतात. कदाचित् खाऱ्या हवेंत आणि खडकाळ जमिनींत त्यांच्या मनांचा विकास होत असल्यामुळें त्यांच्या बोलण्यांत खोंच आपोआप उत्पन्न होत असावी. ओगले यांच्या अगदीं साध्या बोलण्यांतसुद्धां उपरोधाची छटा उमटल्याशिवाय राहात नाहीं; व त्यांच्या त्या रोखून पाहाणाऱ्या शोधक डोळ्यांत तर उपरोधाची चमक नेहमींच खेळत असते. प्रतिपक्षावर कडक किंवा सडेतोड टीका करण्यापेक्षां त्याची रेवडी उडवून त्याला पाण्यापेक्षां पातळ करून सोडणें त्यांना फार आवडतें आणि तें त्यांना साधतेंहि. पण उत्कृष्ट डुकराप्रमाणें सरळ मुसंडी देऊन प्रतिस्पर्ध्याला लोळविणें त्यांना रुचत नाहीं; तर अस्वलाप्रमाणें मनसोक्त गुदगुल्या करून हसत-खेळत त्याचा प्राण घेणें त्यांना मानवतें. या आपल्या उपरोधकौशल्याच्या जोरावरच १९२६ सालच्या असेंब्लीच्या निवडणुकींत आपल्या दणदणीत वक्तृत्वानें विरोधकांना नामोहरम करणाऱ्या बॅ. अभ्यंकरांसारख्या नरकेसरीला त्यांनीं हातोहात जेरीस आणलें. अभ्यंकरांनीं जय

* अवशेष; पृ. ५०-५१, ६१.

मिळवावा व गोपाळरावांनीं वर्तमानपत्रांतून त्यांच्यावर मात करावी असा प्रकार सारखा तीन महिने चालू होता. अभ्यंकर हे सभा-जेते खरे; पण त्यांचें वक्तृत्व म्हणजे मोर्चे बांधून एका जागीं डांबलेली तोफ. तिचा भडिमार कितीहि भयानक असला तरी मर्यादित. उलट ओगले यांचे 'महाराष्ट्रां'तील उपरोधपूर्ण लेख म्हणजे विषारी धूर. त्या धूम्रास्त्राचा फैलाव सबंध प्रांतभर व्हावयाचा. त्यामुळेंच मुख्यतः त्या निवडणुकीच्या लढ्यांत बॅरिस्टरसाहेबांचा पाडाव झाला........ मध्यप्रांत-वऱ्हाडांतील लोकमत जागृत आणि सुशिक्षित करण्याच्या बाबतींत खापर्डे, मुंजे, अणे, बाबासाहेब परांजपे व बॅ. अभ्यंकर यांच्याबरोबरीनें ओगले यांचा उल्लेख करावा लागेल."

"संपादकीय कर्तबगारीच्या दृष्टीनें ओगले यांची गणना आगरकर, टिळक, परांजपे, केळकर, खाडिलकर आणि अच्युतराव कोल्हटकर या महाराष्ट्रांतील अग्रगण्य संपादकांच्या प्रणालिकेंत करावी लागेल; व सर यज्ञेश्वर चिंतामणि यांनीं 'लीडर' पत्र काढून युक्तप्रांतांत जसें लोकजागृतीचें कार्य केलें, तसें ओगले यांनीं 'महाराष्ट्र' काढून मध्यप्रांत-वऱ्हाडांत केलें आहे. त्यांची लेखनशैली ही केळकर किंवा खाडिलकर यांच्या लेखनशैलीपेक्षां, परांजपे आणि कोल्हटकर यांच्या लेखनशैलीला अधिक जवळ असल्याचें आढळेल. वर्तमापत्रांतील लिखाण हें जितकें विद्वत्ताप्रचुर, तितकें तें सामान्य वाचकवर्गाच्या आटोक्यापलीकडचें असतें. शिवाय, एखादा विचार लोकांच्या मनावर बिंबवायचा म्हणजे तो खुलवून सांगण्याकरितां पुनरुक्ति किंवा पाल्हाळ हाहि अपरिहार्य असतो. दादांची (ओगले) लेखनशैली अतिशय सोपी, किंचित् पाल्हाळिक पण अत्यंत खोंचदार आहे; व अच्युतरावांप्रमाणें पांच कॉलमी अग्रलेखापासून तों एकांकी प्रहसनापर्यंत उपरोध, कल्पकता आणि आवेश यांनीं युक्त असें नाना प्रकारचें लिखाण 'महाराष्ट्रा'च्या रकान्यांतून त्यांनीं पैदा केलें आहे. निवडणुकीच्या हंगामांत टेबलापाशीं एका पायावर उभें राहून आठ-आठ, दहा-दहा तास अखंड लिहितांना मीं त्यांना पाहिलें आहे. अशा भाऊ-गर्दीच्या वेळीं वारंवार विझणारी विडी पेटविण्याच्या किंवा पानाला चुना लावण्याच्या निमित्तानें जी काय विश्रांति त्यांच्या बोटांना मिळेल, तेवढीच ! एरवीं किरटीं, वळणदार अक्षरें कुरुकुरु प्रसवणाऱ्या त्यांच्या टाकाची गति अखण्ड चालावयाची आणि 'महाराष्ट्रा'चा अंक अक्षरशः एकटाकी निघावयाचा...त्यांच्या सुबोध, खोंचदार आणि जोरकस लेखनशैलीमुळेंच 'महाराष्ट्र' इतका लोकप्रिय

झाला असून, मध्यप्रांत–वऱ्हाडांत प्रांतिक सरकारला प्रतिस्पर्धी अशी ती एक राष्ट्रशक्ति होऊन बसली आहे."

"उदार दृष्टिकोन, व्यापक सहानुभूति, परमतसहिष्णुता आणि राष्ट्राच्या सर्वांगीण सुधारणेविषयीं जिवन्त कळकळ या गुणांमुळें त्यांचा 'महाराष्ट्र' आज मराठी वर्तमानपत्रांत आघाडीला राहिला आहे; व त्यांचें स्वतःचेंहि आयुष्य सर्व बाजूंनीं यशस्वी झालें आहे."

**ओगले, प्रभाकर बाळाजी** [१८५३–१९३५] वैद्यकीय विषयांवरील लेखक. ओगले कांचकारखान्याचे उत्पादक ओगले बंधू यांचे वडील. कोल्हापूर संस्थानांत हे शाळामास्तर होते. आर्यवैद्यक हा यांचा आवडीचा विषय होता. त्यावरील त्यांचा व्यासंग आयुष्यभर चालू होता. त्यांच्या या व्यासंगाचा व संशोधनाचा परिपाक 'चिकित्सा–प्रभाकर' या ग्रंथांत झालेला आढळतो. या ग्रंथाखेरीज यांनीं औषधी व वनस्पती यांसंबंधीं लहान लहान पुस्तकें बरींच लिहिलीं.

**वाङ्मय :**

(१) सामुद्रिकशास्त्र; १८९०, आ. दुसरी; [प्रल्हादप्रणीत हस्तसामुद्रिक; अंगसामुद्रिक व पुरुषसामुद्रिक, स्त्रीसामुद्रिक, हरगौरीप्रणीत सामुद्रिक, वराहमिहिरकृत सामुद्रिक, गर्गमुनिकृत सामुद्रिक इ. चा संग्रह; संस्कृत व मराठी भाषांतर]; जगद्धितेच्छु, पुणें.
(२) चिकित्सा–प्रभाकर; १९२६, १९५०; चित्रशाळा, पुणें.
(३) सुलभौषधि–प्रभाकर; १९३२; [सहज मिळणाऱ्या औषधींचें भांडार]; चित्रशाळा, पुणें.
(४) करंजोपयोग; [करंज वृक्ष व त्याचे औषधी उपयोग]; १९३३; चित्रशाळा, पुणें.
(५) ज्वर; [चिकित्साप्रभाकर–प्रकरण ३२ वें]; शके १८४७; भुवनेश्वरी प्रेस, कराड.
(६) कोरफडीचा उपयोग; १९३३; चित्रशाळा, पुणें.
(७) तुलसीप्रताप; [वैद्यकीय गुणदोष]; भारत प्रेस, औंध.

(८) निंबप्रभाव; [गुणदोष व त्याचे उपयोग]; शके १८५२; भारत प्रेस, औंध.

(९) बाभळीचा उपयोग; शके १८५४; चित्रशाळा, पुणें.

(१०) बिल्वमहत्त्व; शके १८५४; भारत प्रेस, औंध.

(११) रुईमांदार; शके १८५६; चित्रशाळा, पुणें.

**औंधकर, विष्णु हरि** [१८९४–१९४२] नट, नाटककार व चित्रपट-कथालेखक. यांचा जन्म कोल्हापूर येथें शिंपी ज्ञातींत झाला. याना शालेय शिक्षण मराठी तीन-चार इयत्तांपलीकडे मिळालें नव्हतें. त्यांनीं वयाच्या चौदाव्या वर्षी 'महाराष्ट्र नाटक मंडळीं'त नट म्हणून प्रवेश केला. या 'मंडळीं'तील विख्यात नट पोतनीस हे रंगभूमीवरून निवृत्त झाल्यावर यांजकडे नाटकांतील प्रमुख स्त्री-भूमिका देण्यांत येऊं लागल्या. 'पुण्यप्रभावां'तील तेजस्वी वसुंधरा, 'विचित्र-लीलें'तील फटकळ लीला, 'शिवसंभवां'तील शूर जिजाई, 'कांचनगडची मोहना'मधील मोहना या भूमिका त्या काळांत प्रेक्षकांच्या कौतुकाला आणि गौरवाला पात्र झाल्या होत्या. "विशेषतः वीररसानें ओथंबलेल्या ऐतिहासिक नाटकांत त्यांच्यांतील मूळचा कोमलतेचा अभाव खुलूनच दिसे, आणि आवाजाचे चमत्कारिक पण शिस्तपूर्ण आणि परिणामकारक चढउतार करून, ते रंगभूमीवर मराठेशाहीचें जिवंत वातावरण निर्माण करीत." यांची बुद्धि तीक्ष्ण, निरीक्षणशक्ति तीव्र आणि यांचा उद्योग दांडगा असे. या गुणांच्या बळावरच शालेय शिक्षण जवळ जवळ शून्य असतां नाटककार या नात्यानें त्यांनीं कौतुकास्पद यश मिळविलें. त्यांच्या या यशाचा बराचसा वांटा त्यांच्या रंगभूमीच्या व प्रेक्षकांच्या मार्मिक अभ्यासाकडे जातो. त्यांनीं आपल्यांतील नाट्यवाङ्मयाच्या व्यासंगाची उणीव या निरीक्षणानें भरून काढली.

औंधकरांना नाटकें लिहिण्यास स्फूर्ति, खाडिलकर व गडकरी यांच्या नाटकां-मुळें मिळाली. मेरी कॉरेलीच्या कादंबऱ्यांचीं कथानकें कांहीं मित्रमंडळीच्या तोंडून ऐकूनहि त्यांच्या मनावर परिणाम झाला होता. "त्यामुळें खाडिलकरांच्या नाटकां-तील आवेश, गडकऱ्यांची भावनात्मकता आणि मेरी कॉरेलीची अद्‌भुतरम्यता, अशी तिहेरी छाप त्यांच्या लेखणीवर पडली होती. मराठी नटांचे जे नाटककार

झाले त्यांत औंधकर सर्वांत प्रभावी ठरले. त्यांनीं आपल्या भाषेला शिवकालीन बनविली होती; स्वतःची कणखर अशी भाषा बनविली होती. या भाषेची छाप प्रेक्षकांवर पाडल्याशिवाय राहात नसे. त्यांच्या 'बेबंदशाही' या नाटकांतील नाट्य-पूर्ण प्रसंग, पीळदार स्वभावचित्रें प्रेक्षकांच्या मनांची फार जोरदार पकड घेत. अद्‌भुताचा फारसा आधार न घेतां नेटक्या संवादांनीं आणि भावनेच्या हेलकाव्यांनीं नाट्यप्रसंग निर्माण करण्याची कला औंधकरांना अवगत झाली होती, आणि प्रेक्षकांचें लक्ष वेधावयाला कसे 'तडाखे' मारले पाहिजेत हें त्यांना जितकें समजलें होतें* तितकें फारच थोड्या नाटककारांनीं ओळखलें असेल."

**वाङ्मय :**

(१) बेबंदशाही; सचित्र ऐतिहासिक गद्य नाटक; १९२४, १९२६; विजय प्रेस, पुणें; रामकृष्ण प्रिं. प्रेस, मुंबई.
(२) आग्र्याहून सुटका; सचित्र ऐ. गद्य नाटक; १९३१, श्रीगणेश प्रिंटिंग प्रेस, पुणें.
(३) महारथी कर्ण; सचित्र पौराणिक गद्य नाटक; हनुमान प्रेस, पुणें.

**कँडी, थॉमस** [१८०६–१८७७] कोशकार, क्रमिक पुस्तकांचा लेखक व कायद्याच्या पुस्तकांचा भाषांतरकार. हे इंग्लंडहून १८२२ सालीं ईस्ट इंडिया कंपनीचे लष्करांत चाकरी पत्करून मुंबईस आले. कांहीं वर्षांनीं सरकारनें त्यांस कॅप्टन मोल्स्वर्थ यांस ते रचीत असलेल्या 'मराठी-इंग्लिश कोशा'चे कामीं मदत करण्याकरितां नेमलें. या कामावर ते इ. स. १८३२ पासून १८३५ पर्यंत होते. १८४० त त्यांनीं 'इंग्लिश-मराठी कोशा'चें काम हातीं घेतलें व पुरें केलें. या कोशाची प्रथमावृत्ति १८४७ त प्रसिद्ध झाली व दुसरी आवृत्ति—सुधारून व वाढवून—१८७३ त छापली गेली. या कोशाचें पारितोषिक म्हणून सरकारकडून कँडींस दहा हजार रुपये देण्यांत आले. कोश छापण्याचें काम मुंबई सरकारनेंच केलें.

कँडीसंबंधींचा विस्तृत माहितीनें भरलेला असा चरित्रात्मक निबंध विनायक

---

* विष्णुपंत औंधकर; व. शां. देसाई; धनुर्धारी दिवाळी अंक, १९४३.

कोंडदेव ओक यांनीं १९११ सालच्या 'बालबोधा'च्या एका अंकांत लिहिला आहे. त्यांतील निवडक भाग खालीं देत आहों :—

"इ. स. १८५१ पासून १८५५ पर्यंत मेजर कँडीसाहेब हे पुण्याच्या पाठशाळेचे प्रिन्सिपॉल होते. तेव्हां तिची रचना कांहीं वेगळ्या प्रकारची होती. सध्यांच्याप्रमाणें तींत प्रीव्हियसचे आणि बी. ए. चे वर्ग नव्हते. कां कीं, तेव्हां विश्वविद्यालय स्थापित झालें नव्हतें. त्या पाठशाळेस १८६७ त पूना कॉलेज हें नांव मिळून, त्याची व्यवस्था अगदीं नवी झाली, आणि तींत ग्रॅज्युएट तयार होऊं लागले. मेजर कँडीसाहेब म्हटले म्हणजे लष्करी खात्यांतील नौकर होते. त्यांची नेमणूक कोश तयार करण्याच्या कामावर आणि पाठशाळेच्या मुख्य अध्यापकाच्या कामावर त्या वेळीं कोणकोणत्या योगांनीं कशी झाली असावी, ह्याचें मोठें आश्चर्य वाटतें."

"मेजर कँडी ह्यांस १८५५ त मुंबई सरकारच्या विद्याखात्याचे मराठी भाषांतरकार नेमिलें. या खात्यांत असतां सरकारी हुकुमानुसार त्यांनीं क्रमिक पुस्तकें तयार केलीं. या कामीं त्यांस परशुराम तात्या गोडबोले वगैरेंचें साह्य झालें. ह्या कामाचीं सगळीं सूत्रें मेजर कँडीसाहेबांनीं आपल्या हातीं ठेविलीं होतीं. इंग्रजी भाषेंतील अनेक प्रकारचीं क्रमिक पुस्तकें त्यांनीं जमविलीं होतीं. त्यांतल्या धड्यांची निवड कँडीसाहेबांनीं करावयाची व त्यांचीं मराठी भाषांतरें गोडबोले आदि मंडळींनीं करावयाचीं. तीं साद्यंत ह्यांनीं तपासावयाचीं; त्यांतल्या भाषापद्धतीविषयीं आणि परिज्ञानाविषयीं शंकासमाधानें व्हावयाचीं आणि मग तीं छापावयाचीं, असा क्रम असे. ह्या पुस्तकांतील कवितांच्या धड्यांचें सगळें काम परशुरामपंततात्या गोडबोले यांजकडे सोंपविलें होतें. मंडळीच्या सांगण्यांत असें येत असे कीं, हीं मराठी क्रमिक पुस्तकें इंग्रजींतल्या क्रमिक पुस्तकांच्या नमुन्यावर तयार व्हावीं, अशी त्या साहेबाची फार इच्छा असे. त्यानें कधीं एकहि वाक्य चालढकलीवर नेलें नाहीं. शब्दशुद्धीवर आणि अर्थस्पष्टतेवर त्याचा फार कटाक्ष असे. आज तीस-चाळीस वर्षें जी मराठी शब्दलेखनपद्धति सर्वत्र प्रचारांत आलेली आहे, ती सगळी मेजर कँडी ह्यांच्या क्रमिक पुस्तकांतली आहे. ती त्यांनीं कोठून नवीन आणली नाहीं. त्यांच्या आधीं बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर ह्यांनीं 'हिंदुस्थानचा इतिहास' वगैरे जीं पुस्तकें लिहून प्रसिद्ध केलीं होतीं, त्यांतलीच ती आहे. तरी, तिजविषयीं असा एक आक्षेप होता कीं, भोंवतालची बहुतेक मंडळी कोंकणस्थ असल्याकारणानें,

कँडीसाहेबांस त्यांच्या भाषेची गोडी लागून, त्यांची पद्धति लेखनांत आली. तींतलें ऱ्हस्वदीर्घत्व आणि अनुनासिकत्व देशस्थ वगैरे मंडळीस फार अडविंतें. म्हणून, तें अजिबात काढून टाकण्याचा प्रयत्न, सांप्रतचीं मॅकमिलनचीं नवीं क्रमिक पुस्तकें रचण्याच्या आधीं, कांहीं मंडळींनीं केला होता. तो साधला असता तर 'आणि' ह्याच्या जागीं 'आणी' झालें असतें, आणि 'परंतु' चें 'परंतू' असें झालें असतें. आणखी असे दुसरे पुष्कळ फेरफार झाले असते. परंतु, तेव्हां मुंबईच्या महाराष्ट्र मंडळीनें सर भालचंद्र भाटवडेकर ह्यांच्या अग्रगण्यत्वानें आणि रेव्ह. डॉ. मॅकिकन ह्यांच्या साह्यानें तें प्रकरण अगदीं मुख्य सरकारपर्यंत नेऊन, आणि अदलाबदलीनें विनाकारण किती त्रास झाला असता हें दाखवून, त्यांच्या अनुज्ञेनें मेजर कँडी ह्यांचीच लेखनपद्धति कायम राखिली."

"पूर्वी मराठी ग्रंथकारांस उत्तेजन देण्याकरितां शाळा-खात्याकडे बरीच रक्कम काढून ठेविलेली असे. तींतून ग्रंथांचे हक्क विकत घेऊन ते छापीत असत, किंवा ग्रंथकारांपासून कांहीं प्रती विकत घेऊन त्यांना आश्रय देत असत. शिवाय अशाच कामाकरितां दक्षिणा प्रैझ म्हणून एक कमिटी असे. तिच्या स्वाधीन बरेच पैसे असत. आणि ह्या दोन्ही संस्थांकडे आश्रयार्थ आलेले ग्रंथ कँडीसाहेबांकडे जात असत. कां कीं, ते शाळा-खात्याचे ट्रान्स्लेटर होते आणि त्या कमिटीचे अध्यक्ष होते. हे ग्रंथ ते किती आस्थेनें पाहात असत ह्याची माहिती ज्यांचे ग्रंथ त्यांनीं तपासून नीट केलेले आहेत, त्यांसच आहे. इतरांस त्याची कल्पना यावयाची नाहीं. ते अनुस्वार-विसर्गांपर्यंत बारीक पाहात असत. तरी त्यामध्यें त्यांचें एक मोठें धोरण हें असें कीं, कोणाहि लेखकाची हिंम्मत खचूं द्यावयाची नाहीं. चुक्या दाखवावयाच्या, ग्रंथ शुद्ध करावयाचा आणि त्या रीतीनें तो सुधारण्यास ग्रंथकारांस सुचवावयाचें. तें इतकें जपून करावयाचें कीं, पुस्तक 'वाईट' असें कधीं सहसा म्हणावयाचें नाहीं. तितकाच प्रसंग आला तर 'चांगलें नाहीं' म्हणावयाचें. दुखवावयाचें नाहीं. हातपाय मोडावयाचे नाहींत. कां कीं, आपण इंग्लिश लोक जसे इतर अनेक विषय हिंदुस्थानच्या प्रजाजनांस शिकवीत आहों, तसें भाषेचें ग्रंथलेखन हेंहि त्यांना शिकवावयाचें आपलें काम आहे, अशी त्यांची बुद्धि नेहमीं असे, तिचा फार उपयोग झाला आहे. मराठींत चांगले ग्रंथकार तयार करण्याकडे त्यांचा ओढा त्यांच्या अभिप्रायांत उघड दिसून येत असे. यायोगें पुष्कळ मराठी लेखकांस पुष्कळ लाभ झाले

आहेत. कँडीसाहेब मराठी ट्रान्स्लेटरच्या जागेवर असतां, सरकारच्या आश्रयानें जितके मराठी ग्रंथ छापून प्रसिद्ध झाले आहेत, तितके ग्रंथ तेवढ्या अवकाशांत पूर्वी प्रसिद्ध झाले नव्हते, आणि तसे पुढें प्रसिद्ध होण्याची आशा दिसत नाहीं."

कँडीसाहेबांस इंग्रजी आणि मराठी ह्या दोन्ही भाषा मार्मिकपणें कळत असत, हें जाणून सरकारनें त्यांजकडून 'इंडियन पिनल कोड', 'सिव्हिल प्रोसीजर कोड' व 'क्रिमिनल प्रोसीजर कोड' यांचें मराठी भाषांतर करविलें. त्यांत त्यांना कितीएक शब्द अगदीं नवे करावे लागले आहेत."

कँडींची सर्व ह्यात महाराष्ट्रांतच गेली. त्यांनीं आपला देहहि महाराष्ट्रांत—महाबळेश्वरीं—ठेविला.

**वाङ्मय :**

(१) A Dictionary of Marathi and English; (मुख्य संपादक : मोल्सवर्थ); द्वि. आवृत्ति, १८५७; प्रकाशक गव्हर्नमेंट ऑफ बॉंबे; एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई.

(२) A Dictionary English and Marathi; [मराठी व इंग्रजी भाषांतील सदृश व विसदृश भागांवरील निबंधासह; मोल्सवर्थ यानें सुरुवात करून कॅन्डीनें संपविला]; १८४७; प्रकाशक, मुंबई सरकार; अमेरिकन मिशन छापखाना; मुंबई; आवृत्ति दुसरी, १८७३; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

(३) नीतिज्ञानाची परिभाषा; [डी. ए. इजदेलकृत 'The Principles of Morality' चें भाषांतर]; १८४८; पाठशाळेकडील छापखाना (शिळाछाप), पुणें.

(४) कर्तव्यकर्माचा विचार; [The Principles of Morality चें भाषांतर]; १८५१; पाठशाळेकडील छापखाना (शिळाछाप), पुणें.

(५) वाचनपाठमाला; [इंग्रजी पुस्तकांतील कित्येक गोष्टींचें भाषांतर]; १८५०; पाठशाळा छापखाना (शिळाछाप), पुणें.

(६) हिंदुस्थानचें वर्णन; [देशविभाग, नद्या, व्यापार, इतिहास, पर्वत इ. माहिती]; १८६०; आ. दुसरी, गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

(७) भूगोलाचें वर्णन–भाग १ ला; १८६३, १८६५; सरकारी विद्याखातें; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(८) भाव कोणावर ठेवावा याचा विचार; १८७५; बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी, मुंबई.

**कर्नाटकी, श्रीनिवास नारायण** [१८६५–१९४८] चरित्रकार व निबंधलेखक. बेळगांवजवळील शहापूर या गांवीं यांचा जन्म झाला. यांचें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण बेळगांव हायस्कूलमध्यें व विश्वविद्यालयीन शिक्षण मुंबईस झालें. सांपत्तिक प्रतिकूलतेमुळें उच्च शिक्षण अर्धवटच टाकून त्यांस नोकरी धरावी लागली. कस्टम खात्यांत त्यांचें नोकरीचें आयुष्य गेलें. त्यांना लेखन-वाचनाचा नाद पहिल्यापासूनच असल्यामुळें व्यवसाय सांभाळून 'विविधज्ञान-विस्तारा' सारख्या मासिकांत ते लिहीत. पुढें १९२० सालीं सेवानिवृत्त झाल्यावर त्यांनीं चरित्रलेखनाचा उद्योग आरंभिला. डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, काशिनाथ त्रिंबक तेलंग, डॉ. भाऊ दाजी लाड व रावबहादुर शंकर पांडुरंग पंडित या चार व्यक्तींची त्यांनीं परिश्रमपूर्वक माहिती मिळवून चरित्रें लिहिलीं. हीं चरित्रें विस्तृत व विविध माहितीनें भरलेलीं आहेत. परंतु चरित्रकलेची साधना घडलेली नसल्यामुळें किंवा ती तशी घडावी लागते याची कल्पनाहि नसल्यामुळें तीं जशीं आकर्षक, बांधेसूद व रसपूर्ण व्हावयास पाहिजे होतीं तशीं झालेलीं नाहींत. आपली शोधकशक्ति सदा जागृत ठेवून स्वतंत्र वृत्तीनें, प्रस्तुत काय आणि अप्रस्तुत काय, आवश्यक कोणतें आणि अनावश्यक कोणतें याचा विवेक बाळगून, आटोपशीरपणें पण कथनांतील उत्कटता आरंभापासून अखेरपर्यंत टिकवून धरून जो जीवनचित्र रेखाटूं शकला त्यानें यशाची बरीच मोठी मजल मारली असें मानावयास हरकत नाहीं. व्यक्तीचें सत्यदर्शन घडविण्याचें ध्येय चरित्रकारापुढें सतत असलें पाहिजे, व्यक्तिपूजनाच्या विचारांची पुसटसुद्धां सावली पडूं न देण्याची जागरूकता त्यानें आपल्या चित्तांत सदैव बाळगिली पाहिजे. चरित्रकाराच्या अंगीं चरित्रविषयक साहित्याचें विकलन व संकलन, त्याची निवड आणि त्याचें नियोजन चातुर्यपूर्वक करण्याचें कसब असावें लागतें. या कसबाच्या अभावीं व्यक्तीचा जीवनपट रसरंगयुक्त व सजीव न बनतां, तो इकडून तिकडून गोळा केलेल्या व वाटेल तशा जोडलेल्या रंगीबेरंगी ठिगळांची एक कंथाच बनतो.

मराठींतील बहुसंख्य चरित्रें अशाच स्वरूपाचीं आहेत. व्यक्तिमाहात्म्याचा पगडा पडूं न देतां आपली विवेचक बुद्धि सदा लखलखीत ठेवून तिच्या प्रकाशांत जें दिसलें तें स्पष्ट, स्वच्छ, सुललित पण सामर्थ्यपूर्ण शब्दांत संयमपूर्वक मांडण्याचें कसब मराठी चरित्रकारांत क्वचितच आढळतें. कर्नाटकी यांनीं चरित्रासाठीं माहिती मिळवून ती लोकांपुढें मांडण्याची कसून मेहनत घेतलेली दिसते, पण उपरिनिर्दिष्ट चरित्रलेखनगुणांच्या अभावीं त्यांना त्यांतून सचेतन व सत्यदर्शी अशी मूर्ति निर्माण करतां आलेली नाहीं. ज्या चार थोर पुरुषांच्या कथा त्यांनीं लिहिल्या आहेत त्यांचें व्यक्तित्व इतकें वैशिष्ट्यपूर्ण आहे, कीं त्याचें यथार्थ दर्शन घडविण्यास तितक्याच थोर दर्जाचा कसबी कारागीर पुढें यावा लागेल.

**वाङ्मय :**

(१) गुरुवर्य डॉक्टर सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचें चरित्र; १९२७; लक्ष्मीनारायण छापखाना, मुंबई.

(२) नामदार न्यायमूर्ति काशीनाथ त्रिंबक तेलंग यांचें चरित्र; १९२९, कर्नाटक छापखाना, मुंबई.

(३) ,, , संक्षिप्त आवृत्ति; १९३१; कर्नाटक छापखाना, मुंबई.

(४) डॉक्टर भाऊ दाजी लाड यांचें चरित्र; १९३१; कर्नाटक छापखाना, मुंबई.

(५) रावबहादुर शंकर पांडुरंग पंडित यांचें चरित्र; १९३५; व्ही. प्रभा आणि कंपनी, मुंबई.

**करंदीकर, बाळकृष्ण शंकर** [मृत्यु १९११] शास्त्रीय वाङ्मयाचा लेखक. मुंबई विश्वविद्यालयाचे हे बी. एस्सी. होते. शास्त्रीय विषयाच्या अभ्यासाची आवड तरुण मंडळींत वाढावी यासाठीं तद्विषयक स्फुट लेखन यांनीं बरेंच केलें. त्यासाठीं पेण येथें ' कोंकण विद्यालय ' नांवाची संस्थाहि यांनीं स्थापन केली होती. तळेगांव येथील पैसाफंड कांचकारखान्याचे हे व्यवस्थापक होते.

**वाङ्मय :**

वातावरण; शके १८२६; जगद्धितेच्छु छापखाना, पुणें.

**करंदीकर, विनायक जनार्दन** [१८७२–१९०९] कवि. जन्म धुळें येथें झाला. याच शहरीं स्कूलफायनलपर्यंत शिक्षण झालें. गणित विषय नावडता असल्यामुळें परीक्षा पास होणें शक्य झालें नाहीं. पहिल्यानें पोलीसखात्यांत व पुढें अनेक ठिकाणीं अनेक प्रकारची नोकरी झाली. स्वभाव चंचल व फंदी असल्यामुळें त्यांच्या आयुष्यांत स्थिरता अशी कधींच आली नाहीं. मृत्यूच्या अगोदर तीन वर्षे ते नगरदेवळें येथील जहागीरदाराकडे कारभारी म्हणून काम पहात असत.

केशवसुत, टिळक व विनायक हे समकालीन असून, परस्परांत गाढ स्नेह वसत होता. या तिघांनीं अर्वाचीन मराठी कवितेला नवें वळण लाविलें. हें वळण लावण्याचा या तिघांकडून प्रयत्न होत असतां महाराष्ट्रकवींच्या विचारांत व ध्येयांत फरक पडूं लागला होता. 'इंग्रजी कवितेंत जें विशेष आढळतें तें महाराष्ट्र-कवितेंत आलें पाहिजे, आढळलें पाहिजे ही जाणीव कवींच्या कृतींत दिसूं लागली. भाषेच्या चमत्कारापेक्षां अर्थाच्या चमत्काराचें, त्यांतहि बुद्धीला गुदगुल्या करणाऱ्या रचनेपेक्षां अन्तःकरण हलविणाऱ्या रचनेचें महत्त्व कवींना अधिक वाटूं लागलें. कसरती करण्याचें वेड होतें तें गेलें. कृत्रिम डामडौलाला कवि नाक मुरडूं लागले. पण सहजसौभाग्याला आळवूं लागले. सभोंवारचें जग, भोंवतीं होणाऱ्या घडामोडी, ऐहिक व्यवहारांच्या अवगुंठनांत लपलेल्या अन्तःस्फूर्ती वगैरे गोष्टींनीं कविहृदयें हलूं लागलीं. काव्याचे विषय बदलले, वृत्त बदललें, ध्येय बदललें, भाव बदलले, थाट बदलले; सारांश काव्याचें स्वरूप इतकें भिन्न झालें कीं हें काव्यच नव्हे असें रसिकमन्य म्हणूं लागले. मराठी कविता मराठ्यांप्रमाणें, आणि मराठ्यां-बरोबर नवे ढंग करूं लागली आणि नवे खेळ खेळूं लागली.' (प्रि. वासुदेव बळवंत पटवर्धन)

विनायक हे आधुनिक राष्ट्रीय व ऐतिहासिक कवितेचे जनक होत. गतकाळांतील वैभवाचीं व नव्या काळांतील दैन्याचीं चित्रें कवितेंतून रंगवून जनहृदयाला चेतवणारा पहिला कवि विनायकच होय. देशाची दुरवस्था पाहून त्यांचें हृदय कसें पिळवटत असे याची साक्ष त्यांची 'यापुढें' ही कविता देईल.

स्वातंत्र्यपूर्वकालांत राष्ट्रीय कवितेची पैदास अमूप झाली. परंतु विनायकांच्या कवितेसारखी, ज्यांत अंतःकरणांतील सारी तळमळ ओतली आहे अशी, कविता त्यांत क्वचितच आढळेल. प्रि. वासुदेवराव पटवर्धन म्हणतातः—

" स्वातंत्र्याचा शाहीर या नात्यानें त्यांच्या 'हतभागिनी' व 'यापुढें' यांखेरीज बाकीच्या काव्यांत उमेदीचे, उत्साहाचे शब्द ऐकूं येतात. 'महाराष्ट्र लक्ष्मी', 'इतिहासाचें मर्म', 'शिवराजदर्शन', 'शिवसंदेश', हीं सर्व काव्यें स्वातंत्र्याचीं गाणीं आहेत. यांतहि आजची परतंत्रता आणि पूर्वीची स्वतंत्रता यांतील विरोध स्पष्टपणें रंगविला आहे, पण या सर्वांची अखेरी धीर देणारी आहे. 'उद्योग करा, प्रयत्न सोडूं नका, स्वातंत्र्यक्षम व्हा, म्हणजे 'केल्या उद्योगाचें......केव्हां तरी घडे चीज' असें तीं काव्यें बजावून सांगत आहेत. "

" विनायकाच्या कवितेचा एक भाग मुद्दाम वाचण्यासारखा आहे. विशेषतः स्त्रीवर्गाला तो भाग फार आवडेल. मंगळागौरीच्या कहाण्यांबरोबर अहल्या, पन्ना, पद्मिनी, राणी दुर्गावती, संयोगिता, तारा, कृष्णाकुमारी, वीरमती वगैरे गाणीं व कविता जर आमच्या तरुण मुलींच्या तोंडीं बसतील तर महाराष्ट्राच्या तेजस्वी स्त्रीचारित्र्याचे आरसे त्यांच्या दृष्टीपुढें नित्य राहातील आणि शाळांतील इतिहासां-मधून जें मिळावयाचें नाहीं तें खऱ्या महाराष्ट्रस्त्रीचें बाळकडू त्यांना आपोआपच मिळेल. कधीं न ढळणारा करार, न भंगणारा निर्धार, न वांकणारा स्वाभिमान, आणि पुरुषांसहि लाजविणारा पराक्रम एका कालीं आमच्या बायकांत होता, याची साक्ष वरील कवितांच्या योगें पटते. विनायकाचीं हीं गाणीं बोधपूर्ण आहेत. विनायकाचें पूर्वेतिहासावरील प्रेम स्त्रीपराक्रमाच्या आणि स्त्रीयशाच्या गीतांच्या रूपानेंच प्रकट झालें. याचें कारण काय असेल कोणाला ठाऊक? पुरुषस्वभावाच्या चंचलतेसंबंधानें या गाण्यांत ठिकठिकाणीं विनायकानें उल्लेख केला आहे, आणि एकनिष्ठ स्त्रीस्वभावाचे तर तीं गाणीं म्हणजे जिवंत ठसे आहेत......विनायकानें ऐतिहासिक पुरुषांपेक्षां ऐतिहासिक स्त्रियांचें यशोगान फार केलें, आणि त्यांच्या शीलाच्या ओजस्वितेचें प्रेमानें कौतुक करण्यांत व तिचीं स्तोत्रें गाण्यांत त्याला परमानंद होत असे. कदाचित् महाराष्ट्रांतील पुरुषांपेक्षां महाराष्ट्रांतील स्त्रियांवरच त्याच्या आशेची भिस्त अधिक असेल! कदाचित् पुरुष चुकले, भुलले तर भुलोत बेटे! त्यांना ताळ्यावर आणायला, त्यांचे डोळे उघडायला, महाराष्ट्रांतील स्त्रिया तरी स्वतांचें तेज, स्वतांचें ओज, स्वतांचें शील, आणि स्वतांचें सत्त्व संभाळून राहोत, ही त्याची उत्कट इच्छा असेल!"

" विनायकाच्या कालांतील कविवर्गांत विनायकाची जागा कोणती या प्रश्नाचें उत्तर देणें कठिण आहे. तथापि त्याच्या संबंधानें एक विधान बिनदिक्कत करतां

येईल कीं, अगदीं नीरस कविता त्यांनीं लिहिली नाहीं. कविता करावयाची म्हणून केलेली कविता त्यांची कोणतीच नाहीं. मनुष्याच्या अंतरंगांतील गूढ प्रदेशांत बुड्या मारून तेथील रत्नें त्यांनीं शोधून आणलीं नसलीं, किंवा सांताच्या कुंपणावरून पलीकडे उडी मारून अज्ञाताच्या—अज्ञेयाच्या—रहस्यमय प्रदेशांतील निगूढ गाणीं त्यांनीं ऐकिलीं–ऐकविलीं नसलीं तरी लौकिक जगांतील आणि लौकिक भावांतील सर्वमान्य वृत्तींचीं आणि सत्याचीं गोड गीतें त्यांनीं गाइलीं आहेत. विशेषतः महाराष्ट्राच्या दिव्य पूर्वेतिहासाची आठवण त्यांनीं महाराष्ट्राला करून दिली आहे आणि महाराष्ट्राच्या स्त्रीवर्गापुढें ओजस्वितेचे आदर्श ठेविले आहेत. 'चिमा', 'प्रीति निमाली तर', 'सुवास' आणि 'स्त्री आणि पुरुष' यांत त्यांच्या काव्यशक्तीची परिसीमा झाली आहे. त्यांची स्वातंत्र्याची लालसा आणि परवशतेचा—गुलामगिरीचा—तिटकारा त्यांच्या काव्याच्या द्वारा वाचकांच्या हृदयांत पडसाद उठविल्याशिवाय राहणार नाहींत. त्यांच्या अंगीं थोडक्या शब्दांनीं एकादा देखावा, एकादा प्रसंग, एकादें सृष्टिसौंदर्याचें निवासस्थान डोळ्यांपुढें उभें करण्याची शक्ति मोठी होती. तरीहि इंग्रजी वाङ्मयाशीं त्यांचा झाला होता त्यापेक्षां अधिक विस्तृत आणि निकट परिचय झाला असता तर बहार झाली असती असें म्हटल्या वांचून राहवत नाहीं. विनायकासारखे कवि प्रसादचिन्ह म्हणून महत्त्वाचे आहेत."

विनायकांनीं 'प्रभावती' (१८९२) नांवाचें एक संगीत नाटक लिहिलें आहे. नाट्यशास्त्राचा त्यांचा अभ्यास चांगला होता असें म्हणतात.

**वाङ्मय :**

(१) विनायकाची कविता; [समग्र कविता; प्रि. वासुदेव बळवंत पटवर्धन यांची १४ पानें प्रस्तावना; चरित्रासह]; संग्राहक : दत्तात्रय अनंत आपटे; शके १८४२, शके १८४७; चित्रशाळा, पुणें.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

(१) विनायकांची कविता; [चर्चा]; ग. त्र्यं. माडखोलकर, आधुनिक कविपंचक, पृष्ठ ८७–१११.

(२) विनायकाची कविता; [चर्चा]; ना. के. बेहरे; काव्यचर्चा, पृष्ठ ३१७–३२४.

(३) विनायकाची कविता; परीक्षण; लक्ष्मणशास्त्री लेले, विविधज्ञानविस्तार, पृ. ५२, अंक १०; १९२१.
(४) गाण्याचें गाणें; काव्यप्रशंसन; वि. स. खांडेकर, अरविंद मासिक, डिसेंबर, १९२१.
(५) कवि विनायक; समालोचन; प्रो. रा. श्री. जोग, अर्वाचीन मराठी काव्य, पृष्ठ ६५–७०.

**कॅरी, वुइल्यम** [१७६१–१८३४] अर्वाचीन मराठी गद्यलेखनाचा पाया घालणारा पहिला इंग्रज पंडित, कोशकार, व्याकरणकार व भाषांतरकार. याचा जन्म इंग्लंडमधील पॉलेर्सपरी या खेड्यांत झाला. याचा बाप पंतोजीगिरी करी. घरची गरिबी असल्यामुळें याला फारसें शालेय शिक्षण मिळालें नाहीं. परंतु स्वावलंबनानें विद्याव्यासंग अखंड राखून तो बहुभाषी व बहुश्रुत बनला. वयाच्या सोळाव्या वर्षापासून तों अठ्ठाविसाव्या वर्षापर्यंत त्याला चांभाराचा धंदा करावा लागला. पण तो करीत असतांना त्यानें आपल्या व्यासंगांत खंड पडूं दिला नाहीं. त्यानें व्याकरण ग्रंथांच्या साहाय्यानें लॅटिन, ग्रीक, हिब्रु, फ्रेंच वगैरे भाषांचें ज्ञान उत्तम प्रकारें संपादन केलें व त्याचा उपयोग खिस्ती धर्मग्रंथांचा अभ्यास करण्याकडे केला. धर्मग्रंथांचें अध्ययन व धर्मप्रचारकांचीं प्रवचनें यांचा मनावर परिणाम होऊन, चांभारी सोडून स्वदेशाबाहेर धर्मप्रसारार्थ आपलें आयुष्य वेंचावें अशी त्यास प्रेरणा झाली व तो १७९३ सालीं हिंदुस्थानांत आला. प्रारंभीं माल्डा येथें त्यानें शेती सुरू केली, पण तींत नीट जम बसण्याचें चिन्ह न दिसल्यामुळें त्यानें निळीच्या मळ्यांत आपला मुक्काम हालवला. विलायतेंतून येतांना त्यानें जहाजांत डॉ. थॉमस—ईस्ट इंडिया कंपनीचा शिपसर्जन—याच्याकडे बंगाली भाषेचा थोडासा अभ्यास केला होता, तो त्यानें कलकत्त्यांत आल्यावर राम बसु या गृहस्थाच्या साहाय्यानें वाढविला. हा राम बसु दुभाषी म्हणूनहि त्याचें काम करी. निळीच्या मळ्यांत कामगारांशीं नित्य संबंध येत गेल्यामुळें बंगाली भाषा सुलभतेनें बोलतां येण्याएवढी त्याची प्रगति झाली. या भाषेबरोबरच त्यानें संस्कृत भाषेचाहि अभ्यास आरंभिला. ही भाषा शिकल्याशिवाय आपणास बंगाली चांगलें लिहितां–बोलतां येणार नाहीं असें त्याला आढळून आलें. शिवाय त्याला आपल्याला प्रचारकार्याकरितां हिंदूंच्या वेद-पुराणादि ग्रंथांची माहितीहि करून घ्यावयाची होती.

त्या वेळेस हिंदुस्थानांतील युरोपिअन मंडळींत संस्कृत भाषा अवगत असलेला एकच पंडित होता. तो म्हणजे कोलब्रुक वुइल्यम्स. तो संस्कृतांत अस्खलित भाषण करूं शके. कोलब्रुक वुइल्यम्सप्रमाणेंच आपणासहि संस्कृत भाषा अवगत झालीच पाहिजे अशी कॅरीची महत्त्वाकांक्षा होती. आणि ती त्यानें व्याकरण व कोश यांना गुरु करून अल्पावधींत साध्य केली. या भाषेचा अभ्यास सुरू केल्यापासून नऊ वर्षांनीं वेद वाचण्याइतकी त्याची तयारी झाली होती. त्या काळांत वेदांची पोथी हिंद्वेतरांच्या हातीं पडणें अशक्य असे. तशी ती देणें ब्राह्मण महत्पातक समजत. पण कॅरीनें एका ब्राह्मणास बऱ्याच द्रव्याची लालूच दाखवून ती मिळविली.

कॅरी निळीच्या मळ्यांत पांच-सहा वर्षें राहिला. एवढ्या मुदतींत त्यानें बंगाली व संस्कृत या भाषांचें ज्ञान साध्य केलें, पण तें ज्या कामासाटीं त्याला उपयोगावयाचें होतें तें धर्मप्रचाराचें काम तेथें हातीं घेणें शक्य नव्हतें. त्या वेळेस इंग्रजांनीं आपल्या मुलखांत अशा तऱ्हेचें काम करण्यास बंदी केली होती. कॅरीच्या हेतूंचा इंग्रज राज्यकर्त्यांस थोडासा जरी संशय येता तरी त्यास हद्दपार करण्यास ते चुकले नसते. ही वस्तुस्थिति लक्षांत घेऊन कॅरीनें त्यावेळेस कलकत्त्यापासून जवळच डॅनिश लोकांच्या ताब्यांत असलेल्या श्रीरामपूर या गांवीं ता. १० जानेवारी १८०० रोजीं आपलें ठाणें मांडलें व दुसऱ्या दिवसापासूनच त्यानें आपल्या धर्मप्रचारास प्रारंभ केला. तेथल्या गव्हर्नरानें त्याच्या कार्यास सहानुभूति दाखवून त्यास पुष्कळ साहाय्यहि केलें. याच सुमारास ज्या बॅप्टिस्ट मिशनचा प्रतिनिधि म्हणून तो हिंदुस्थानांत आला होता त्या मिशनतर्फे मार्शमन, वॉर्ड वगैरे आणखी कांहीं मिशनरी इकडे आले. त्यांनाहि मदतीस घेऊन त्यानें आपल्या कार्यास प्रारंभ केला.

श्रीरामपूर येथें थोडीशी स्थिरता येतांच त्यानें एक प्रार्थनामंदिर, शाळा व छापखाना हीं उभारलीं व आपले सहकारी वॉर्ड व मार्शमन यांच्या सहकार्यानें उद्योग सुरू केला. हिंदुस्थानांतील प्रमुख भाषांत बायबलाचें भाषांतर करून 'शुभ-वर्तमाना'चा प्रसार करणें हें त्याचें मुख्य उद्दिष्ट असल्यानें प्रांतिक भाषांचा अभ्यास व त्याला पोषक असे व्याकरण, कोशादि ग्रंथ तयार करणें हा कार्यक्रम त्यानें ताबड-तोब आंखून तो पूर्ण करण्याच्या प्रयत्नास तो लागला.

आपला सहकारी वॉर्ड याच्या देखरेखीखालीं त्यानें छापखाना सुरू केला. त्यास लागणारें साहित्य त्यानें विलायतेहून आणलें होतें. पण प्रांतिक भाषांत पुस्तकें

छापावयाचीं तर त्या त्या भाषांच्या अक्षरांचे खिळे तयार करणें अगत्याचें होतें. हें काम त्यानें 'हिंदुस्थानांतील क्याक्स्टन' असें ज्याला इतिहासकार संबोधितात त्या सर सी. उइल्किन्स याच्या हाताखालीं तयार झालेल्या पंचानन नांवाच्या लोहाराकडून पार पाडलें. या पंचानन लोहाराचा मनोहर नांवाचा मदतगार होता, त्यानें पुढें अक्षरांचे खिळे पाडण्याचा कारखानाच काढला व देशी भाषांचा फैलाव होण्यास फार मोठी मदत केली. हा छापखाना पुढें 'श्रीरामपूर मिशन प्रेस' म्हणून ओळखला जाऊं लागला. निरनिराळ्या ४० भारतीय भाषांत तयार केलेलीं बायबलें यांतून छापून बाहेर पडलीं. प्रारंभीं ईस्ट इंडिया कंपनीचीं कायदेकानूचीं पुस्तकेंहि येथेंच छापलीं जात.

श्रीरामपूरहून जीं बायबलें प्रसिद्ध झालीं त्यांतील बंगाली, मराठी, संस्कृत, हिंदी व कोंकणी भाषांतील बायबलें कॅरीनें राम बसू, वैजनाथशास्त्री * व मृत्युंजय विद्यालंकार यांची मदत घेऊन स्वतः तयार केलीं व तीं अनुक्रमें १८०१, १८११, १८०८, १८०९, १८१९ मध्यें छापून प्रसिद्ध केलीं. कॅरीचा बायबलच्या भाषांतराचा उद्योग सतत ३५ वर्षे चालला होता. भाषांतर करणें हा त्याचा कर्मठ ब्राह्मणाच्या जपजाप्याप्रमाणें, नित्यक्रमच बनला होता. सकाळीं न्याहारी झाल्याबरोबर तो या कामास सुरुवात करी. आपल्या सहकाऱ्यांस पहिल्यानें इंग्रजींत अध्याय वाचून दाखवावयाचा व त्याचे पाठोपाठ भाषांतर सांगावयाचें असा त्याचा क्रम असे.

इ. स. १८०० सालीं लॉर्ड वेल्सले यानें कलकत्त्यास इंग्रज लोकांस देशी भाषा शिकविण्याकरितां फोर्ट वुइल्यम किल्ल्यांत जें विद्यालय † स्थापन केलें, त्यांत बंगाली, मराठी व संस्कृत या भाषांचें शिक्षण देण्यासाठीं कॅरी याची योजना करण्यांत आली. कॅरीनें आपल्याबरोबर आपले सहकारी राम बसू, मृत्युंजय विद्यालंकार व महाराष्ट्रीय पंडित वैजनाथशास्त्री (वैद्यनाथ) कानफाडे ह्यांसहि घेतलें.

विद्यालयांत भाषा शिकवावयाची म्हणजे त्यासाठीं व्याकरण, कोश, वाचन पुस्तकें यांची आवश्यकता ही भासणारच. अध्यापनाबरोबरच तींहि तयार करण्याची जबाबदारी विद्यालयांतील अध्यापक मंडळीवर येऊन पडली. कॅरीनें आपला वांटा मोठ्या आनंदानें उचलला व तो धडाडीनें पार पाडला. मराठी भाषेचें व्याकरण व कोश ही

---

* वैजनाथशास्त्री कानफाडे.

† यासंबंधीं विस्तृत माहिती वैजनाथशास्त्री कानफाडे यांच्यावरील (पृ. १३९) चरित्र लेखांत पुढें आली आहे.

त्यांतील त्याची विशेष महत्त्वाची कामगिरी होय. व्याकरण, 'Grammar of the Mahratta Language to which are added Dialogues on Familiar Subjects' या नांवानें इंग्रजींत १८०५ सालीं व मराठी-इंग्रजी कोश 'A Dictionary of the Mahratta Language' हा १८१० सालीं मोडी लिपींत प्रसिद्ध झाला. कोश प्रसिद्ध झाला त्याच वर्षी सेंट मॅथ्यूचें मराठी भाषांतर त्यानें प्रसिद्ध केलें. मराठींतील हा पहिला छापील गद्य ग्रंथ होय.

कॅरे याचा छापखाना व त्याचा ग्रंथप्रकाशनाचा उद्योग यांबद्दल अनेकांस कुतूहल व कौतुक वाटे. कलकत्त्याचें फोर्ट वुईल्यममधील विद्यालय पाहावयास येणारे विद्याभिलाषी लोक श्रीरामपूरला भेट दिल्याशिवाय राहात नसत. अशा लोकांपैकीं तंजावरचे सरफोजी राजे हे एक होत. १८२१ सालीं काशीयात्रा करण्याच्या हेतूनें ते निघाले असतां त्यांचा कांहीं दिवस कलकत्त्यास मुक्काम होता. या मुक्कामांत त्यांनीं लॉर्ड हेस्टिंग्सच्या आग्रहावरून श्रीरामपुरास भेट दिली. कॅरीच्या हातांत हात घालून ते सबंध आवारांत हिंडले, त्यांनीं त्याचा छापखाना अगदीं बारकाईनें पाहिला. विशेषतः ज्या जागीं पंडितमंडळी भाषांतराचें काम करीत बसली होती त्या जागीं ते अधिक वेळ थांबले. ते स्वतः ग्रंथांचे शौकीन होते. त्यांनीं कॅरीप्रमाणेंच तंजावरला छापखाना काढून *'बालबोध मुक्तावलि' सारखीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं होतीं. 'सरस्वतीमहाल' ग्रंथालय हें त्यांच्या ग्रंथप्रेमाचें दर्शक होय.

कॅरीचा छापखाना व त्याचा भाषांतराचा व पुस्तकप्रकाशनाचा उद्योग मराठी-प्रमाणेंच इतर भारतीय भाषांना प्रेरक झाला.

**काथवटे, आबाजी विष्णु** [१८४६-१९०७] यांचा जन्म वाई येथें झाला. घरची अत्यंत विपन्न स्थिति असतांहि वार लावून व शिकवण्या करून यांनीं शिक्षण मिळविलें. रावसाहेब वि. मो. महाजनी व विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे हे वर्गबंधु होते. यांचें शिक्षण पुणें हायस्कूल व डेक्कन कॉलेज यांत झालें. बी. ए. झाल्यावर यांनीं सरकारी शिक्षणखात्यांत नोकरी धरली. कांहीं वर्षें निरनिराळ्या सरकारी हायस्कुलांत शिक्षकाचें काम केल्यावर कांहीं अहमदाबाद येथील कॉलेजांत व पुढें डेक्कन कॉलेजांत, डॉ. भांडारकर सेवानिवृत्त झाल्यावर, यांनीं संस्कृत भाषेच्या अध्यापकाचें काम केलें. मराठींत यांचें 'शिक्षण व अध्यापन' हें एकच

* इसापनीतीचें भाषांतर-सखबन पंडिताकडून करवून तें १८०६ त प्रसिद्ध केलें.

पुस्तक प्रसिद्ध आहे. संस्कृत भाषेचा यांचा व्यासंग चांगला होता. 'कीर्तिकौमुदी', 'द्वयाश्रय कोश', 'अथर्ववेद उत्तर भाग' हे ग्रंथ त्यांच्या नांवावर आढळतात. मृत्यूपूर्वी एका जैन विद्वानानें लिहिलेल्या एका जुन्या संस्कृत व्याकरणाचें संपादन ते करीत होते. निम्में अधिक काम झालें होतें. पण ता. १७ जानेवारी १९०७ रोजीं त्यांना ठाणें येथें एकाएकीं अपस्माराचा झटका येऊन त्यांचें निधन झालें. आबासाहेब काथवटे हे डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रॅन्सलेशन सोसायटीचे पुष्कळ वर्षे ग्रंथपरीक्षक होते.

**वाङ्मय :**

शिक्षण आणि अध्यापन, (फाउलरकृत इंग्रजी पुस्तकाचे आधारें); सरकारी शिक्षणखातें, इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

**काथवटे, मनोहर विष्णु** [१८५५–१९३७] इतिहासलेखक. आबाजी विष्णु यांचे हे धाकटे बंधु. शिक्षण सातारा व पुणें येथें झालें. एल् एल्. बी. ची परीक्षा पास झाल्यावर यांनीं सरकारी न्यायखात्यांत नोकरी धरली. फर्स्ट क्लास सबजजाचे जागेपर्यंत वाढत गेले. बहुश्रुत व व्यासंगी असे हे होते. सरकारी नोकरींत असतां व पुढें निवृत्त झाल्यावरहि, ज्यांनीं कोणत्या ना कोणत्या विषयाचा नाद लावून घेऊन तत्संबंधींचें वाचन व लेखन आयुष्याच्या अखेरपर्यंत चालू ठेविलें, अशा जुन्या पिढींतील फार थोड्या पदवीधर व्यक्तींपैकीं मनोहरपंत काथवटे हे एक होत. वाई येथील आपल्या घरीं, सेवानिवृत्तीनंतर, एकांतांत पण ग्रंथांच्या सहवासांत त्यांनीं आपलें उर्वरित आयुष्य घालविलें.

**वाङ्मय :**

(१) अजमेर–स्थलवर्णन; [पं. हरबिलास सारडाकृत पुस्तकाचे आधारें]; १९१५; मनोरंजन छापखाना, मुंबई.

(२) भारतखंडाचा प्राचीन इतिहास, १९१७; [खि. पूर्व ६०० ते इ. स. १२००]; जगद्धितेच्छु छापखाना, पुणें.

(३) पारशांचा इतिहास; १९२१; मोदवृत्त प्रेस, वाई.

(४) हजरत खलीफा उमर यांचें संक्षिप्त चरित्र; १९३०, चित्रशाळा छापखाना, पुणें.
(५) खलीफ अबुबकरचें संक्षिप्त चरित्र; १९३०; चित्रशाळा छापखाना, पुणें.
(६) सुधारणा, उद्भव व उपाय; [एडवर्ड कार्पेंटर याच्या 'सिव्हिलायझेशन, इट्स कॉज ॲण्ड क्युअर' या पुस्तकाचें रूपांतर]; चित्रशाळा छापखाना, पुणें.
(७) वाईचे काथवटे घराण्याची माहिती; १९३६; चित्रशाळा छापखाना, पुणें.

**कानडे, रामचंद्र गोविंद** [१९००–१९४१] चरित्रकार व वृत्तलेखक. यांचा जन्म भोर येथें झाला. पुणें येथील टिळक विद्यापीठाचे हे वाङ्मयविशारद होते. पदवी मिळविल्यानंतर हे कांहीं काळ मुंबईच्या 'लोकमान्य' दैनिकांत (१९२३-२४) वृत्तलेखक म्हणून काम करीत असत. मुंबईची हवा न मानवल्यामुळें तेथील नोकरी सोडून ते थोडे दिवस तळेगांव येथील 'नवीन समर्थ विद्यालयां'त शिक्षक (१९२५-२६) म्हणून काम करूं लागले. पण त्यांचा पिंड पत्रलेखकाचा असल्यामुळें शिक्षकाचें काम सोडून पुण्याच्या 'दैनिक ज्ञानप्रकाश' या पत्राचे कचेरींत त्यांनीं नोकरी धरली. ते या पत्रांत उपसंपादक म्हणून (१९२७-४१) अखेरपर्यंत काम करीत असत. आस्थेवाईक आणि कष्टाळू असे हे लेखक होते. त्यांनीं लिहिलेला 'मराठी नियतकालिकांचा इतिहास' हा ग्रंथ या त्यांच्या स्वभावाचा निदर्शक आहे. दैनिक वृत्तपत्राच्या नेहमींच्या धबडग्यांतून वेळांत वेळ काढून या 'इतिहासा'चीं साधनें जमविण्यांत व तीं नीट जुळवून मांडण्यांत त्यांनीं फार कष्ट केले. या त्यांच्या श्रमशीलतेला चिकित्सक वृत्तीची व शास्त्रीय दृष्टिकोनाची जोड मिळती तर त्यांच्या ग्रंथांचें मोल केवढें तरी वाढलें असतें. त्यांनीं 'रवीन्द्रनाथ ठाकूर', 'विष्णु गोविंद विजापूरकर,' 'जगदीशचंद्र बोस' यांचीं चरित्रें लिहिलीं आहेत. चरित्रलेखनासाठीं ते खूप माहिती गोळा करीत. पण ती अभ्यासून, तपासून, काय घ्यावयाचें व काय टाकावयाचें याचें तारतम्य बाळगून व्यक्ति, त्याच्या भोंवतालचें वातावरण व त्याचा काळ याचें कलात्मक रीतीनें रेखाटन करण्याचें कौशल्य कमविण्याचे कष्ट त्यांनीं केले नाहींत. त्यामुळें साहित्य हाताशीं भरपूर असून सुद्धां त्यांना आपली चरित्रमूर्ति घडविण्याचे कामीं त्याचा नीट उपयोग करतां आला नाहीं. स्वास्थ्य व योग्य मार्गदर्शन यांचा अभाव हेंहि याचें कारण असेल.

**वाङ्मय :**

(१) रवीन्द्रनाथ टागोर—चरित्र आणि वाङ्मयपरिचय; शके १८४८; आनंद छापखाना, पुणें.
(२) महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाचे प्रणेते गुरुवर्य प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर; शके १८५०; समर्थ-भारत प्रेस, पुणें.
(३) हिंदी शास्त्रज्ञ सर जगदीशचंद्र बसु—चरित्र व संशोधनकार्य; १९३७; इंदिरा प्रेस, पुणें.
(४) मराठी नियतकालिकांचा इतिहास; १९३८; कर्नाटक छापखाना, मुंबई.

**कानफाडे, वैजनाथ शिवराम** [अनुपलब्ध] अर्वाचीन मराठी गद्यरचनेचे आद्यप्रवर्तक. मराठींतील पहिले मुद्रित ग्रंथ 'मराठी भाषेचें व्याकरण' व 'सेंट मॅथ्यु' हे होत. हे दोन्ही ग्रंथ कलकत्त्यानजीक असलेल्या श्रीरामपुर या गांवीं डॉ. वुइल्यम कॅरी या मिशनरी गृहस्थानें वैजनाथशास्त्री या महाराष्ट्रीय पंडिताचें साहाय्य घेऊन ते तयार केले. १८०५ सालीं ते त्यानें प्रसिद्ध केले. हे वैजनाथशास्त्री* संस्कृत, फार्सी, हिन्दोस्तानी, इंग्रजी व बंगाली या भाषांत प्रवीण होते. डॉ. कॅरी यास त्यांचा, बायबलाचें मराठींत त्याचप्रमाणें हिन्दोस्तानींत भाषांतर करतांना फारच उपयोग झाला. कॅरी आणि वैजनाथशास्त्री यांचें हें लेखनकार्य इ. स. १८०३ च्या आगेंमागें सुरू झालें असावें. १८०१ चे सुमारास बैबलाचें हिन्दोस्तानी भाषेंत अनुवाद करावा अशी कल्पना डॉ. कॅरी व त्याचे मिशनरी सहकारी यांच्या मनांत घोळूं लागली. त्याच सुमारास डॉ. कॅरीनें बैबलाचें (नवा करार) बंगालींत भाषांतर करून तें प्रसिद्धहि केलें होतें. पुढें, मार्शमन व वॉर्ड या दोन मिशनऱ्यांनीं अनुक्रमें 'मॅथ्यु आणि ल्यूक', 'मार्क आणि जॉन' या भागांचा आणि राहिलेल्या भागाचा अनुवाद डॉ. कॅरीनें हिंदोस्तानींत करावा असें ठरलें. या हिन्दोस्तानी अनुवादाबरोबरच कॅरीनें वैगनातशास्त्र्यांस हातांशीं धरून मराठींतहि त्याचा अनुवाद करण्याचें काम सुरू केलें.+

---

* डॉ. कॅरी आपल्या प्रस्तावनांत व लेखांत यांचा 'वैद्यनाथ' असा उल्लेख करतो.

+ "I, engaged in translating it into Maharastra, commonly called the Mahratta language, the person who assists me in the Hindostani being a Mahratta." १४ डिसेंबर १८०३; डॉ. कॅरीचें पत्र—'Life of William Carey' by George Smith.

इ. स. १८०० सालीं देशी भाषांच्या ऊर्जितावस्थेच्या दृष्टीनें एक महत्त्वाची घटना घडली. त्यावेळचा गव्हर्नर जनरल लॉर्ड वेलस्ली यानें कलकत्त्यांत, सनदी नोकरांस कारभाराचें शिक्षण देण्यासाटीं 'फोर्ट वुइल्यिम 'मध्यें उघडलेलें महाविद्यालय होय. राज्यकारभार चालविण्याची जबाबदारी ज्या ज्या प्रांतांत तो चालविण्याची जबाबदारी ज्या ज्या नोकरावर पडेल त्याला त्याला त्या प्रांताची भाषा, तेथील वाङ्मय व संस्कृति यांची ओळख असणें अपरिहार्य आहे, असें वेलस्ली याला वाटत होतें. आपल्या या विचारांना मूर्त स्वरूप देण्यासाटीं त्यानें हें महाविद्यालय स्थापन केलें. फोर्ट वुइल्यिम कॉलेज या नांवानें ते ओळखलें जाई. या महाविद्यालयांत अरबी, फार्सी, संस्कृत, बंगाली, मराठी, हिन्दोस्तानी, तेलगु, तामिळ, कानडी, इंग्रजी, लॅटीन, ग्रीक या भाषा; कंपनी सरकारचे कायदेकानु, हिंदु व मुसलमानी कायदे, मुलकी न्यायतत्त्वशास्त्र, राष्ट्रीय कायदे, नीतिशास्त्र, शासनशास्त्र, अर्थशास्त्र, राजकीय इतिहास व भूगोल, भौतिकशास्त्रें, भारताचा प्राचीन इतिहास वगैरे विषयांचें अध्ययन-अध्यापन होई. विलायतेहून कंपनी सरकारकडे नोकरी करण्याकरितां म्हणून जे उमेदवार येत त्यांस या विद्यालयांत तीन वर्षे शिक्षण घ्यावें लागे. शिक्षणोत्तर परीक्षा घेतली जाई व मगच त्यांची प्रांतोप्रांतीं नेमणूक होई. ब्राह्मणांप्रमाणें संस्कृतांत अस्खलित भाषण कराणारा पहिला युरोपियन संस्कृतज्ञ प्रोफेसर कोलब्रूक हा याच्या अध्यापकवर्गापैकीं एक होता. त्याला साहाय्यक म्हणून डॉ. कॅरी यास या विद्यालयांत घेण्यांत आलें. तो प्रारंभीं संस्कृत व बंगाली या भाषा शिकवी. पुढें १८०३ पासून मराठी शिकविण्याची जबाबदारीहि त्याजवर टाकण्यांत आली. त्यावेळीं त्यानें वैजनाथशास्त्री ह्यांस आपल्याबरोबर मराठी शिकविण्याकरितां म्हणून नेमून घेतलें. हें अध्यापनाचें काम करीत असतां वैजनाथशास्त्री व डॉ. कॅरी यांनीं मिळून खालील पुस्तकें मराठींत प्रसिद्ध केलीं :

१ सेंट मॅथ्यू, १८०५.

२ मराठी भाषेचें व्याकरण, [Grammar of the Mahratta Language to which are added Dialogues on Familiar Subjects], १८०५.

३ बायबल-पांच भाग, १८०७-२१.

४ मराठी-इंग्रजी कोश, [A Dictionary of the Mahratta Language, मराठी शब्द मोडी लिपींत], १८१०.

५ मंगल समाचार, (New Testament), १८११.

६ सिंहासनबत्तीसी, १८१४.

७ पंचतंत्र, १८१५.

८ हितोपदेश, १८१५.

९ राजा प्रतापादित्याचें चरित्र, १८१६.

१० रघूजी भोसल्याची वंशावली, १८१६.

११ मराठी भाषेंतील अस्सल पत्रसंग्रह, १८१६.

वरील पुस्तकांपैकीं 'राजा प्रतापादित्याचें चरित्र' हें राम बसु+ या फोर्ट वुइल्यम कॉलेजांतील संस्कृत भाषेच्या बंग पंडिताकडून विद्यालयांतील विद्यार्थ्यांसाठीं म्हणून बंगालींत प्रथम (१८१०) तयार करून घेण्यांत आलें होतें. बंगालींतील हें पहिलेंच गद्य पुस्तक. याच्या आधारें वैजनाथशास्त्री यांनीं मराठींत रचना केली. ते या ग्रंथांत स्वतःच लिहितात, "संप्रती सर्वांपूर्वी या देशांत प्रतापादित्य नांवाचे एक राजे झाले होतेत् त्याहांचा विस्तार फारसी भाषेंत थोडासा वर्णिला आहे पण सांगोपांग हरपीं समस्त नाहीं याकरितां त्याहांचे चरित्राची वर्णूक वंग भाषेंत यथा कथंचित् आहे त्यास प्रणाली शुद्ध करून महाराष्ट्री भाषेंत् कानफाडोपनामक वैजनाथ शिवरामानें कालेज कौसलांत् घ्याया कारणें आणि साहेब लोकाचे प्रीतिप्राप्ती निमित्त रचना केली असे." या लिहिण्यावरून 'प्रतापादित्याचें चरित्र' ही त्यांची एकट्याचीच कृती दिसते.

वैजनाथशास्त्री हे नागपुरकडे राहणारे. कलकत्ता येथें नागपुरकर भोसल्यांचे वकील म्हणून वेणीरामपंत नांवाचे गृहस्थ राहात असत. त्यांच्या आश्रयास हे प्रारंभीं येऊन राहिले. त्यांचें बहुभाषाकोविदत्व तत्कालीन कंपनी सरकारच्या व डॉ. कॅरीसारख्या धर्मप्रचारकाच्या लक्ष्यांत येऊन त्याचा आपापल्या कामीं उपयोग करण्याचें त्यांच्या मनांत आलें आणि त्यांनीं त्यांना जवळ करून तो भरपूर करून घेतलाहि.

वैजनाथशास्त्री कलकत्त्यास किती वर्षे होते हें कळण्यास मार्ग नाहीं. फोर्ट वुइल्यम कॉलेजचीं प्रतिवृत्तें जर कदाचित् उपलब्ध झालीं तर कांहीं नवीन माहिती मिळण्याचा संभव आहे.

---

+ रामनाथ बसुपति असाहि याचा उल्लेख केलेला आढळतो.

**कानिटकर, काशीबाई** [१८६१–१९४८] मराठींतील पहिली कादंबरी-कर्त्री. कवि गोविंद वासुदेव कानिटकर यांच्या ह्या पत्नी. यांच्या माहेरचें उपनांव बापट. कर्मठ व जुन्या वळणाच्या कुटुंबांत जन्म झाला असल्यामुळें ल्हानपणीं शिक्षण मिळालें नसतांहि, पुढें सासरीं आल्यावर स्वप्रयत्नानें मराठी व इंग्रजीचें भाषाज्ञान करून घेतलें व पतीच्या साहाय्यानें त्यांतील उत्तमोत्तम ग्रंथ वाचून ते समजण्याइतकी प्रगति केली. कादंबरीकार हरि नारायण आपटे यांचे कानिटकर कुटुंबाशीं जिव्हाळ्याचे संबंध होते. त्यांच्या सहवासाचा व उत्तेजनाचाहि बाईंस फार फायदा झाला. 'रंगराव' ही बाईंची पहिली कादंबरी होय. हरिभाऊंची 'मधली स्थिति' 'पुणेंवैभवां'तून प्रसिद्ध होऊं लागली त्याचे आधीं कांहीं दिवस हिच्या लेखनास प्रारंभ झाला होता. या कादंबरीचीं कांहीं हस्तलिखित प्रकरणें हरिभाऊंनीं वाचलीं होतीं. पण त्यांची 'मधली स्थिति' वाचून आपण आपली कादंबरी न लिहिलेलीच बरी असें काशीबाईंस वाटूं लागलें. हरिभाऊंस तें कळतांच त्यांनीं त्यांस लिहिलें कीं, † "आपली कादंबरी वाचून मला आपल्याला प्रख्यात इंग्रजी कादंबरी लिहिणाऱ्या ज्या मिस् जेन ऑस्टेनबाई, किंवा फ्रेंच कादंबऱ्या लिहिणाऱ्या सॉंबाई, यांच्या जोडीला बसवावें असें वाटतें. गोविंदराव यांना आपण जॉर्ज इलियट व्हावें असें दिसतें. मी आपणास जेन ऑस्टेनची उपमा देतों याचें कारण आपल्या भाषेचें अव्याज मनोहरत्व आहे. हें पत्र लिहिण्याचा मीं अविनय केला नसता. परंतु याला दुसरें एक कारण झालें. गोविंदराव यांनीं बोलतां बोलतां असे उद्गार काढले कीं, माझी 'पुणेंवैभवां'त दर महिन्यास प्रसिद्ध होणारी कादंबरी वाचून आपली स्वतःची कादंबरी पुरी करण्याचा हुरूप आपण सोडून दिला. असें करण्याचें कारण काय असेल तें मीं आपल्या कल्पनेला हव्या तशा चमक्या मारून भरधांव काढिलें, तरी देखील लक्ष्यांत येत नाहीं. वास्तविक पाहतां असें करण्याला कांहींएक कारण नाहीं. जर माझ्या कादंबरींत गुण असेल, तर तसा किंवा कांकणभर जास्त वरचढ असा आपल्या कादंबरींत आहे. माझी तर आजमितीला खात्री आहे कीं, 'गृहसौख्य' व 'सुखकर दरी' हे दोन भाग तुम्हांला जसे साधले आहेत तसे मला कधींहि साधले नसते. राधाबाईच्या पात्रासारखें पात्र ज्यांनीं निर्माण केलें त्यांनीं माझी कादंबरी वाचून हातपाय गाळणें अगदींच विलक्षण आहे! अहाहा! काय त्या राधाबाईचीं बोलणीं? जुन्या काळच्या प्रेमळ सुशील अशा

† हरिभाऊंचीं पत्रें.

पोक्त स्त्रीचें चित्र मला दाखवा असें कोणी म्हणेल तर मी चटकन् त्यास तुमची कादंबरी वाच म्हणून सांगेन." रंगराव ही कादंबरी पुढें काशीबाईंनीं पूर्ण करून प्रसिद्ध केली व लोकप्रियताहि मिळविली. या कादंबरीनंतर बऱ्याच वर्षांनीं त्यांनीं 'पालखीचा गोंडा' या नांवाची सामाजिक कादंबरी लिहिली. कांहीं गोष्टीहि त्यांनीं लिहिल्या. त्या 'चांदण्यांतील गप्पा' या नांवानें पुढें प्रसिद्ध झाल्या. पण त्यांना विशेष कीर्ति जी मिळवून दिली ती 'डॉ. आनंदीबाई जोशी' या चरित्रानें. अमेरिकेंत व येथें त्यांचेविषयीं परिश्रमपूर्वक माहिती मिळवून त्यांनीं हें चरित्र लिहिलें आहे.

काशीताईंनीं 'मनोरंजन', 'नवयुग', 'विविधज्ञानविस्तार' या नियत-कालिकांतून बरेंच स्फुट लेखन केलें आहे. 'विविधज्ञानविस्तारांत' त्यांनीं प्रसिद्ध केलेलें हरि नारायण आपटे यांचें आटवणीवजा चरित्र उत्कृष्ट वठलें आहे.

यांची प्रवृत्ति अध्यात्माकडे विशेष असे. त्या 'थिऑसॉफिस्ट' होत्या. त्यांनीं आपल्या उत्तरायुष्याचा बराच मोठा भाग काशी येथें ब्रह्मचिंतनांत घालविला. त्यांच्या हातून पुढें फारसें लेखन घडलें नाहीं.

**वाङ्मय :**

(१) रंगराव; सा० कादंबरी; १९०३; ज्ञानचक्षु छापखाना, पुणें.
(२) पालखीचा गोंडा; सा० कादंबरी; १९२८; साहित्यसेवक छापखाना, पुणें.
(३) चांदण्यांतील गप्पा; [कथासंग्रह]; १९२१; लक्ष्मीनारायण छापखाना, मुंबई.
(४) शेवट तर गोड झाला; [सा० कथा]; शके १८११; जगद्धितेच्छु छापखाना, पुणें.
(५) डॉ. आनंदीबाई जोशी : चरित्र व पत्रें; १८९१, १९१२; मुंबई.
(६) मुंबई येथें ता. २६ डिसेंबर १९०४ रोजीं भरलेल्या भारत महिला परिषदेचा पहिला रिपोर्ट; १९०६; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(७) गुरूपदेश (साधन-चतुष्टय); [जे. कृष्णमूर्तिकृत 'At the Feet of the Master' या पुस्तकाचें भाषांतर ]; आ. ४ थी, १९२७; मुंबई.

* प्रारंभीं : 'मनोरंजन आणि निबंधचंद्रिका' या मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध होत असे.

**कानिटकर, गोविंद वासुदेव** [१८५४–१९१८] कवि. यांचा जन्म पुणें येथें झाला. प्राथमिक शिक्षण पुण्यास व इंग्रजी शिक्षण मुंबईस झालें. मुंबईच्या विल्सन कॉलेजांतून हे बी. ए. झाले. पुढें वकीलीची परीक्षा देऊन, तीन वर्षे हायकोर्टांत वकिली केली व पुढें मुन्सबी स्वीकारली. प्रसिद्ध पारशी समाजसुधारक मलबारी हे यांचे सहाध्यायी होते व रा. ब. माधवराव रानडे गुरु होते. गोविंदराव अतिशय विद्याव्यासंगी व अनेक कलाभिज्ञ असे होते. त्यांस चित्रकलेची, गायन-वादनाची फार हौस असे. वेदांताचाहि त्यांचा चांगला अभ्यास होता. प्रसिद्ध विदुषी काशीबाई कानिटकर या यांच्या पत्नी होत, व नाटककार कानिटकर हे यांचे चुलते. हरिभाऊ आपट्यांच्या जीवश्चकंठश्च स्नेह्यांपैकीं कानिटकर हे एक होते. शेक्स्पीयर, ब्राउनिंग, टेनिसन यांच्या काव्यांचें यांनीं चांगलेंच परिशीलन केलें होतें. यांचीं 'अकबरकाव्य', 'नारायणराव पेशवे ह्यांचा मृत्यु', 'कृष्णाकुमारी', आणि 'संमोहलहरी' हीं चार काव्यें प्रसिद्ध आहेत. विशेषतः 'संमोहलहरी' हें काव्य चिंतनपर असून त्यांतील भाषा प्रौढ व विचारसरणी नवीन आहे. यांची बरीचशी स्फुट कविता विविधज्ञानविस्तार, काव्यरत्नावलि, करमणूक व मासिक मनोरंजन वगैरेंतून प्रसिद्ध झालेली आहे.

गोविंदरावांच्या काव्यांसंबंधीं रा. ना. म. भिडे यांनीं आपल्या 'अर्वाचीन मराठी कवि व काव्यें'† या लेखांत पुढीलप्रमाणें लिहिलें आहे, "संमोहलहरी हें मूळ विविध-ज्ञानविस्तारांत 'देवास अर्जी' या नांवानें प्रसिद्ध झालें होतें. कवीनें हें काव्य आपल्या अठराव्या वर्षीं लिहिलें. तथापि त्यानें या अल्पवयांत इंग्रजी तत्त्वज्ञानाच्या उदात्त कल्पना मराठी काव्यांत गुंफण्याचें अवघड काम कसें केलें याचें खरोखर आश्चर्य वाटतें. हें काव्य अगदीं स्वतंत्र असून तत्त्वज्ञानास प्रेरक आहे. भाषासरणी पाहूं जातां ती जरी संस्कृतप्रचुर दिसली तरी काव्यांतील विचार अगदीं नवीन प्रकारचे आहेत. जगांतील अस्थिर स्थिति पाहून धर्मसंमूढ झालेल्या मनामध्यें संशयाचे जे कल्लोळ माजले त्याचें प्रतिबिंब प्रस्तुत काव्यामध्यें पृथ्वीछंदांत गोंविलें आहे. चिंतनपर काव्यामध्यें ह्याचा दर्जा बराच वर लागेल यांत संशय नाहीं. संमोहलहरीनंतर यांचीं दोन ऐतिहासिक काव्यें बाहेर पडलीं. पहिल्यानें 'नारायणराव पेशवे यांचा वध' हें काव्य १८७८ त प्रसिद्ध झालें व 'अकबर काव्य' पुढील सालींच प्रसिद्ध

† विविधज्ञानविस्तार निबंधावली, पृष्ठ ६९.

झालें. ऐतिहासिक काव्यें लिहिण्याचें जें प्रशंसनीय उदाहरण कुंटे यांनीं घालून दिलें त्याचेंच हीं काव्यें फल होत. ह्या दोन्ही काव्यांची रचना स्कॉट कवीच्या ' मार्मिअन ' व ' ले ऑफ द् लास्ट मिन्स्ट्रल ' या काव्यांच्या नमुन्यावर केली आहे. ' नारायणराव पेशवे ' काव्यांत आरंभीं साताऱ्याच्या किल्ल्यास उद्देशून केलेलें वर्णन, व तिसऱ्या सर्गांतील पुण्याच्या शनवारवाड्याचें वर्णन, हीं काव्यांतील उत्कृष्ट स्थळें म्हणून दाखवितां येतील. ह्या काव्याविषयीं ' दक्षिणा प्राईझ कमेटी ' चे मर्मज्ञ चिटणीस रावजीशास्त्री गोडबोले यांच्या शब्दांत सांगावयाचें तर ' ह्यांत निरनिराळ्या प्रसंगींचा रसोत्कर्ष योग्यप्रकारें झाला आहे. भाषा गोड असून सुलभ आहे. स्थलांचीं वर्णनें विविध व स्वाभाविक आहेत.' दुसऱ्या काव्यामध्यें अकबराची जन्मापासून हकीकत दिली असून त्यांत अनुषंगानें जगन्नाथ पंडित व बादशाहाची कन्या यांच्या प्रेम-प्रसंगाची हकीकत गोंवली आहे. याहि काव्यांतील वर्णनस्थलें चांगलीं उतरलीं आहेत. कानिटकर यांचें ' कृष्णाकुमारी काव्य ' विविधज्ञानविस्तारांत प्रसिद्ध झालें आहे. वरील चार काव्यांनंतर कवीनें आपला काव्यव्यासंग बहुतेक सोडल्यासारखाच होता. शेवटीं शेवटीं त्यांनीं गूढ शृंगारिक व वत्सलरसयुक्त स्फुट कविता लिहिली आहे. या कविता जरी उच्च दर्जाच्या असल्या तरी पण पहिल्या स्फूर्तीला अनुरूप अशी पुढील काळांत काव्यनिष्पत्ति झाली नाहीं हें खास. "

काव्यांव्यतिरिक्त गोविंदरावांचे हातून किरकोळ गद्यलेखनहि बरेंच झालें आहे. मिल्‌च्या ग्रंथांवरून ' स्त्रियांची परवशता ' हें पुस्तक त्यांनीं लिहिलें असून, रवीन्द्रनाथ टागोर यांच्या ' गीतांजली'चेंहि त्यांनीं सुरस गद्य भाषांतर केलें आहे.

**वाङ्मय :**

(१) हिमालयवर्णनम्; [विठ्ठल बापूजी करमरकरकृत मूळ संस्कृत व त्याचें पद्यात्मक भाषांतर]; पद्य; १८७५; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(२) नारायणराव पेशवे यांचा वध; काव्य; १८७८; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(३) अकबर बादशहा; काव्य; १८७९; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(४) कृष्णाकुमारी; काव्य.

(५) संमोहलहरी; काव्य; १९००; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

(६) कविकूजन; स्फुट कवितांचा संग्रह; १९३३.

(७) गीतांजलि; [रवीन्द्रनाथ टागोर यांच्या गीतांजलीचें गद्यात्मक रूपांतर]; १९१७; सुधारक छापखाना, पुणें.

(८) भट्ट मोक्षमुल्लरकृत धर्मविषयक व्याख्यानें; [Max Muller कृत 'Origin & Growth of Religion' चें भाषांतर]; इंडियन प्रेस, मुंबई.

(९) स्त्रियांची परवशता; [जॉन स्टुअर्ट मिलच्या 'Subjection of Women' या ग्रंथाचें भाषांतर]; १९०२; बाबाजी सखाराम आणि कंपनी, मुंबई.

(१०) वीरसेन किंवा विचित्रपुरीचा राजपुत्र; [शेक्स्पीयरच्या हॅम्लेट नाटकाचें भाषांतर]; १८८३; आर्यभूषण, पुणें.

**कानिटकर, नारायण बापूजी** [१८५२–१८९७] नाटककार. यांचा जन्म पुणें येथें झाला. यांचें मराठी शिक्षण पुण्यास झालें. मॅट्रीक्युलेशनची परीक्षा १८६८ मध्यें एल्फिन्स्टन हायस्कूलमधून त्यांनीं दिली. पुढें एक दोन वेळां 'लिटल् गो' ची परीक्षा नापास झाल्यामुळें पुढील शिक्षणाचा नाद सोडून त्यांनीं वकिलीची परीक्षा दिली. पुण्यांतील चांगल्या वकिलांत यांचें नांव मोडत असे. *"मराठी भाषेंत जे नाटककार होऊन गेले त्यांपैकीं कानिटकर हे एक प्रमुख आहेत. सामाजिक आणि ऐतिहासिक विषयावर नाटकें लिहून बरेच दिवस यांनीं लोकांचें रंजन केलें होतें. यांचीं नाटकें रंगभूमीवर लोकप्रिय असतां सामाजिक नाटकांमुळें सुशिक्षित मंडळींत त्यांना कित्येक शत्रू उत्पन्न झाले होते. हे जसे विनोदी लेखक असत, तसेच यांच्या लेखणींतून विचारी, आवेश व उत्साह उत्पन्न करणारी गंभीर भाषाहि सहज निघत असे. यांच्या नाटकांच्या योगानें, एक दोन नाटक मंडळ्या ऊर्जितदशेला आल्या होत्या......यांच्या नाटकांपैकीं भाषांतरितच रूपांतरित अशीं दोनच नाटकें आहेत. इतर नाटकांना ऐतिहासिक गोष्टींचा किंवा त्यावेळीं उपस्थित झालेल्या चळवळींचा आधार होता. त्यांचे काळीं सामाजिक विचारांत दोन पक्ष माजलेले होते. प्रत्येक पक्षांतील पुढाऱ्यांच्या लेखांतून व भाषणांतून जे विचार यावेळीं प्रसिद्ध होत होते ते नाटकरूपानें कानिटकरांनीं प्रसिद्धीस आणले आहेत. परंतु त्याकरितां त्यांच्या स्नेहीवर्गांतसुद्धां त्यांना कांहीं शत्रू झाले व ते कानिटकरांना

* मुजुमदार, रंगभूमि मासिक, १९१०.

'पुष्करणी शेक्सपिअर' असें म्हणत असत. (कानिटकरांचें घर पुण्यांत पुष्करणी हौदाजवळ आहे.) कानिटकरांनीं 'तरुणीशिक्षण' व 'संमतिकायद्यावर' नाटकें लिहिलीं त्यावरून ते सुधारणेच्या व स्त्रीशिक्षणाच्या विरुद्ध असावेत असें त्यांच्या प्रतिपक्षांस वाटत असे......कानिटकरांचे मराठी भाषेवर व नाट्यकलेवर मोठे उपकार आहेत. एका पिढींत त्यांच्या नाटकांवर लोकांचें चांगलें मनरंजन झालें आहे. त्या पिढींत महाराष्ट्र भाषेंतील स्वतंत्र गद्य नाटककारांत शंकर मोरो रानडे यांच्या जोडीला बसण्याला यांचेखेरीज दुसरा नाटककार झाला नाहीं म्हटलें तरी चालेल. दोघांनींहि त्या त्या वेळच्या स्थितीवर नाटकें लिहून चळवळ उत्पन्न केली व लोकांत नाट्यकलेची उपयुक्तता दाखवून दिली."

**वाङ्मय :**

ऐतिहासिक नाटकें

(१) मल्हारराव महाराज नाटक; गद्य; [बडोद्याचे मल्हारराव गायकवाड यांजवर]; १८७५; निर्णयसागर छापखाना, मुंबई.
(२) प्रतापराव आणि चंद्रानना; गद्य; [सर वाल्टर स्कॉटकृत 'केनीलवर्थ' या कादंबरीच्या आधारें]; १८८३; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(३) बाजीराव आणि मस्तानी नाटक; गद्य; १८९२; श्री शिवाजी छापखाना, पुणें.
(४) सरदार बाजी देशपांडे अथवा श्री शिवविजय नाटक; गद्य; आवृत्ति पहिली, १८९४; आ. दुसरी १९०८.

सामाजिक नाटकें

(१) शशिकला आणि रत्नपाल नाटक; [शेक्स्पीअरकृत 'रोमिओ ॲण्ड जूलिएट' या नाटकाचे आधारें]; १८८२; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(२) न्यायविजय नाटक; गद्य; [क्राफर्ड प्रकरणावर रचिलेलें; नांवें कल्पित]; १८८९; आर्यविजय छापखाना, पुणें.
(३) संमतिकायद्याचें नाटक; गद्य; १८९२; श्री शिवाजी छापखाना, पुणें.

(४) तरुणीशिक्षण नाटिका अथवा आधुनिक तरुणीशिक्षण व स्वातंत्र्य यांचें भविष्यकथन; गद्य; १८८९; आवृत्ति तिसरी, १८९८; श्रीशिवाजी छापखाना, पुणें.

काव्य

(१) अजविलाप; [साहाय्यक; गो. वा. कानिटकर]; १८७२, नॅशनल प्रेस, मुंबई.

कायदा

(१) दिवाणी काम चालविण्याचे रीतिविषयींचा कायदा म्हणजे १८७७ चा आक्ट १० वा; १८७७; किरण छापखाना, पुणें.

**काळे, त्र्यंबक गुरुनाथ** [मृत्यु १९१४] पुराणेतिहाससंशोधक. यांचें घराणें धारवाड जिल्ह्यांतील नरगेल या गांवचें. यांचें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण धारवाड येथें झालें. उच्च शिक्षण घेण्यासाठीं ते पुणें येथें आले परंतु पहिल्या वर्षाच्या परीक्षेंत, तीन वर्षें लागोपाठ बसूनहि, उत्तीर्ण होतां न आल्यामुळें त्यांस पुढील शिक्षणाचा नाद सोडावा लागला. कॉलेज सोडल्यावर पुण्यांत शिक्षकाची नोकरी मिळविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला पण ती मिळाली नाहीं. पूर्वी थोडासा वैद्यकीचा अभ्यास केला होता त्याचे आधारावर दोन वर्षें त्यांनीं वैद्यकी करून पाहिली पण त्यांत यश मिळालें नाहीं. पुढें १९०७ सालीं त्यांनीं हुबळी येथें 'समालोचक' नांवाचें मासिक सुरू केलें. तीन वर्षेंपर्यंत त्यांनीं तें चिकाटीनें व आर्थिक झीज सोसून चालविलें. पण पुढें 'महाराष्ट्रीय वाचकांची मासिकांविषयींची भारीच अनास्था दिसून आल्यामुळें' त्यांनीं तें बंद करून 'पुराणसंशोधक ग्रंथमाला' सुरू केली. लोकांच्या "मनांत प्राचीनकाळच्या एकंदर स्थितीविषयीं नीट कल्पना येऊन त्यांचे मनांत प्राचीन काळच्या एकंदर स्थितीविषयीं नीट कल्पना येऊन त्यांचे मनांत प्राचीनकाळचा इतिहास, भूगोल, शास्त्रें, कालगणना, परंपरा इत्यादि गोष्टींविषयीं नवा प्रकाश पडावा" या हेतूनें त्यांनीं ही ग्रंथमाला सुरू केली. या मालेंतून 'पुराण-निरीक्षण', 'संस्कृत कवींचीं चरित्रें', 'रामायण-निरीक्षण', 'भारत-निरीक्षण', 'भारतीय रसायन-शास्त्राचा इतिहास', 'आर्यवैद्यकावर नवा प्रकाश', असे सहा ग्रंथ लिहून प्रसिद्ध करण्याचा व तदनंतर अठराहि पुराणांच्या पोथ्या जमवून त्यांची २५ खण्डांत सुंदर

आवृत्ति काढावयाची असा संकल्प सोडून ते उद्योगास लागले. या संकल्पित ग्रंथांपैकीं 'पुराण-निरीक्षण', 'रामायण-निरीक्षण', व 'भारतीय रसायनशास्त्र' हे तीन ग्रंथ त्यांचे ह्यातींत व त्यांचे पश्चात् १९१६ सालीं 'संस्कृत कवींचीं चरित्रें' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. द्रव्याची विवंचना व कौटुंबिक आपत्ती यांनीं गांजून गेल्यामुळें यांचें मन व शरीर खचलें आणि अत्यंत निराशापूर्ण स्थितींत त्यांचा अंत झाला. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांनीं आपल्या 'चरित्रचंद्र' या आत्मवृत्तपर पुस्तकांत त्यांच्यासंबंधीं पुढीलप्रमाणें लिहिलें आहे: "अत्यंत विद्वान्, अतिशय बुद्धिवान् व व्यासंगी पण तसाच अतिशय दुर्दैवी असा हा पुरुष पुणें शहरांत दारिद्र्याला बळी पडला...रामायण, महाभारत व पुराणें यांचा त्यांनीं चिकित्सक दृष्टीनें चांगला अभ्यास केला होता. ग्रंथहि चांगले पाहिले होते. महाभारतासंबंधीं त्यांची अनेकवार टिळकांबरोबर चर्चा चाले व एक दोन मुद्दे काळे यांनीं आपल्या नजरेस आणले असें टिळकांनीं 'केसरीं'त कोठेंतरी प्रसिद्धपणें लिहिल्याचें मला स्मरतें ! काळे यांचा 'पुराणनिरीक्षण' हा ग्रंथ त्यांची व्यापक शोधकता दर्शविणारा आहे. हत्तीसारखा दांडगा पुरुष, आवाज खणखणीत, बुद्धीची प्रभा मुखावर पसरलेली असा हा विद्वान् पुरुष पुण्यास कित्येक वर्षे एका जेवणावर राहत असे." अखेरी अखेरीस पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कुलांत संस्कृत भाषेचा शिक्षक म्हणून ते काम करीत असत.

काळे हे निष्ठावंत ज्ञानोपासक होते. पुराणेतिहास संशोधन व तद्विषयक पौरस्त्य व पाश्चात्य पंडितांच्या विचारांचें तौलनिक सूक्ष्म शोधन हा त्यांचा आयुष्यभराचा उद्योग होऊन बसला होता.

**वाङ्मय :**

(१) दत्तदासतत्त्वोक्तिसंग्रह, भा. १ ला; [तात्त्विक स्फुट विचार]; श्रीसमर्थ-प्रसाद छापखाना; कोल्हापूर.

(२) जपानचा राष्ट्रभक्तिप्रदीप; [जपानी लोकांची उन्नति करणाऱ्या गुणांचें वर्णन; जपानचा इतिहास]; १९०५; शारदा छापखाना, पुणें.

(३) धातुरत्नमाला [मूळ संस्कृत व मराठी भाषांतर; रसायनशास्त्रविषयक ग्रंथ]; शके १८३६; वैद्यपत्रिका छापखाना, पुणें.

(४) रसमंजरी; [रसायनशास्त्रविषयक]; शके १८३६; वैद्यपत्रिका छापखाना, पुणें.
(५) पुराणनिरीक्षण; [पुराणांची माहिती; पौराणिक इतिहास; भूगोल; कालगणना इ०]; चित्रशाळा छापखाना, पुणें.
(६) रामायणनिरीक्षण; १९१४; वैद्यपत्रिका छापखाना, पुणें.
(७) भारतीय रसायनशास्त्र; [रसायनशास्त्रावरील प्राचीन संस्कृत ग्रंथांची व रसविद्येची माहिती]; १९१२, मुंबई.
(८) संस्कृत कवींचीं चरित्रें; [अकार विल्हे लावलेला संस्कृत ग्रंथकारांचा चरित्रकोश]; १९१६; धनंजय छापखाना, खानापूर.

**काळे, वामन गोविंद** [१८७६–१९४६] अर्थशास्त्रज्ञ. यांनीं आपलें सर्व शिक्षण स्वकष्टानें मिळविलें. घरच्या गरिबीमुळें वार, शिकवण्या, शिष्यवृत्त्या वगैरे मिळवून ते एम्. ए. झाले. परीक्षा पास झाल्यावर फर्ग्युसन कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे अध्यापक म्हणून काम करूं लागले. न्यायमूर्ति माधवराव रानडे यांच्या सहवासाचा व शिकवणीचा त्यांस लाभ घडला होता. नामदार गोखल्यांचे तर ते सहकारीच होते. रानडे यांची भारतीय अर्थशास्त्राविषयीं जी विशिष्ट विचारसरणी होती तिचा या दोघांनींहि पुरस्कार करून धडाडीनें प्रसार केला. काळे यांनीं 'भारतीय अर्थशास्त्रा'वर इंग्रजींतून पुस्तकें लिहिलीं. अर्थशास्त्रविषयक चळवळींत ते नेहमींच अग्रभागीं असत. ब्रिटिश सरकारनें त्यांची अर्थशास्त्रविषयक कामगिरी लक्ष्यांत घेऊन 'इंडियन टॅरिफ बोर्डांत' सभासद म्हणून त्यांची नेमणुक केली होती. त्यांनीं १९२७ सालीं प्रो. द. ग. कर्वे यांस बरोबर घेऊन 'अर्थशास्त्र' या नांवाचें 'महाराष्ट्रीय समाजांत अर्थशास्त्रविषयक प्रश्नांच्या विवेचनाची आवड उत्पन्न होऊन तसले प्रश्न नीट समजून त्यासंबंधीं योग्य मत बनविण्याचें सामर्थ्य जनतेस प्राप्त व्हावें' या हेतूनें पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें. प्रो. गो. चि. भाटे यांच्या 'अर्थ-शास्त्राचीं मूलतत्त्वें' या ग्रंथानंतर मराठींत स्वतंत्रपणें अर्थशास्त्रविषयक ग्रंथ लिहिण्याचा हा दुसरा प्रयत्न होय. 'या ग्रंथाच्या जोडीस, हिंदुस्थानची आर्थिक परिस्थिति आणि भावी प्रगति ह्यांचें विशिष्ट रीतीनें विवेचन करण्यासाठीं स्वतंत्र आणि मोठा ग्रंथ' तयार करण्याचें काम त्यांनीं हातीं घेतलें. 'भारतीय अर्थशास्त्र' या नांवानें हा ग्रंथ १९२९ सालीं त्यांनीं प्रसिद्ध केला. अर्थशास्त्राच्या

या दोन ग्रंथांनंतर त्यांनीं १९३४–३५ सालीं 'बँका आणि त्यांचे व्यवहार', 'व्यापारी उलाढाली', 'हिंदुस्थानची रिझर्व्ह बँक' अशीं तीन छोटीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. इंग्रजींतून असे विषय वाचणें व समजणें ज्यांना कठीण जातें पण ते जाणून घेण्याची मात्र ज्यांना उत्सुकता आहे अशा सर्वसामान्य वाचकांस यांचा चांगला उपयोग होण्यासारखा आहे. काळे यांनीं आपल्या आयुष्याच्या अखेरच्या काळांत अर्थविषयक घडामोडींची महाराष्ट्रियांस माहिती करून देण्याकरितां 'अर्थ' या नांवाचें साप्ताहिक सुरू करून तें चांगल्या रीतीनें चालविलें.

अर्थशास्त्रीय विषयांखेरीज अन्य विषयांवरहि ते लिहीत. बेन जॉन्सनच्या एका प्रहसनाच्या आधारें त्यांनीं 'विक्षिप्तराव' नांवाचें एक दोन अंकी प्रहसन (१९०८) लिहिलें आहे. डिकन्सच्या पिकविक पेपर्सच्या आधारें 'मासिक मनोरंजनां'त त्यांनीं कांहीं वर्षांपूर्वीं एक लेखमाला खुसखुशीत व विनोदी भाषेंत लिहिली होती. क्रिकेटविषयक लेखहि ते चांगले लिहीत. ते स्वतः क्रिकेट खेळलेले असल्यामुळें त्यांचें तद्विषयक लिहिणें मार्मिक व खुमासदार असे.

**वा ङ्म य :**

(१) विक्षिप्तराव; [Ben Johnson कृत 'Silent Woman' मधील कल्पनेच्या आधारें; गद्य; दोन अंकी प्रहसन]; १९०८; ज्ञानप्रकाश छापखाना, पुणें; १९३७ आर्यभूषण छापखाना, पुणें.
(२) हुंडणावळीचे दरासंबंधीं वाद; १९२६, विजय प्रेस, पुणें.
(३) अर्थशास्त्र; (साहा. दत्तात्रय गोपाळ कर्वे); १९२७, आर्यभूषण छापखाना, पुणें.
(४) भारतीय अर्थशास्त्र, (साहा. द. गो. कर्वे); १९२९; आर्यभूषण छापखाना, पुणें.
(५) बँका आणि त्यांचे व्यवहार; १९३४; पुणें.
(६) व्यापारी उलाढाली; १९३५; आर्यभूषण छापखाना, पुणें.

**काळे, यादव माधव** [१८७९–१९४३] वकील व इतिहाससंशोधक. यांचा जन्म वऱ्हाडांतील लोणार या गांवीं झाला. यांचें घराणें गरीब भिक्षुकाचें, पण अपार कष्ट करून यांनीं विद्या संपादन केली. मॅट्रिकची परीक्षा दिल्यावर त्यांनीं

शाळाखात्यांत नोकरी धरली व ती करीत असतांना घरींच अभ्यास करून अलाहाबाद युनिव्हर्सिटीच्या परीक्षांस बसून बी. ए. व एल् एल्. बी. झाले. नंतर (१९१०) कांहीं दिवस मेहेकर येथें वकिली करून पुढें अकोल्यास त्यांनीं तो व्यवसाय सुरू केला. या व्यवसायांत त्यांनीं संपत्तीबरोबरच लौकिकहि खूप संपादिला. सार्वजनिक कार्यांतहि ते अग्रेसर असत. मध्यप्रांत विधिमंडळाचे प्रमुख घटक (१९२४-१९३७) व कांहीं काळ अध्यक्ष (१९२६) होते. स्वराज्यपक्ष, प्रतिसहकारपक्ष यांत त्यांनीं निष्ठापूर्वक कार्य केलें होतें; त्याचप्रमाणें हैद्राबाद संस्थानी प्रजापरिषद, बाजीराव उत्सव–रावेर-खेडी, मध्यप्रांत व वऱ्हाड लिटररी ॲकॅडेमी, विदर्भ साहित्यसंघ, नागपूर विद्यापीठ, शारदाश्रम, मध्यप्रांत संशोधन मंडळ, हिस्टॉरिकल रेकॉर्डस् कमिशन व इतिहास परिषद्, भारत इतिहाससंशोधन मंडळ, वगैरे संस्थांशीं त्यांचा घनिष्ठ संबंध होता. काळे यांची इतिहाससंशोधक म्हणून ख्याति 'वऱ्हाडचा इतिहास' या ग्रंथानें झाली. या प्रांताला इतिहासच नाहीं ही समजूत त्यांनीं आपल्या या ग्रंथानें भ्रामक ठरविली. या ग्रंथाच्या बरोबरीनें त्यांनीं लिहिलेले 'गोंड लोकांचा इतिहास', व 'नागपूर प्रांताचा इतिहास' हेहि महत्त्वाचे असून त्यांच्या सूक्ष्म ऐतिहासिक दृष्टीचे ते दर्शक आहेत. या ग्रंथांव्यतिरिक्त ऐतिहासिक पत्रव्यवहाराचें संपादनहि त्यांनीं केलें आहे. 'ऐतिहासिक पत्रव्यवहार', 'नागपूरकर भोंसल्यांची बखर', 'नागपूर अफेअर्स पूना रेसिडेन्सी पेपर्स–५' हीं कामें त्यांपैकीं होत. 'कळंब येथील शिलालेख', 'मालोजीचा मृत्यू', 'राजव्याघ्री ऊर्फ रायबागीण' यांसारखे संशोधनात्मक निबंधहि त्यांनीं लिहिले. इतिहाससंशोधनाचा नाद लावून घेऊन ज्यांनीं भरीव असें श्रमपूर्वक इतिहासलेखन केलें अशा विदर्भीय ग्रंथकारांत काळे यांचें स्थान नेहमींच उच्च राहील.

**वाङ्मय :**

(१) लोणारवर्णन; [ऐतिहासिक व पौराणिक माहिती]; १९०३; सहस्रकर प्रेस, सातारा.
(२) वऱ्हाडचा इतिहास–प्राचीन काळ; १९०५; सहस्रकर प्रेस, सातारा.
(३) वऱ्हाडचा इतिहास–अर्वाचीन काळ; १९२४; जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.
(४) गोंड लोकांचा इतिहास; १९२७; चित्रशाळा, पुणें.
(५) नागपूर प्रांताचा इतिहास; १९३४; लोकसंग्रह छापखाना, पुणें.

(६) महिम्नस्तोत्राचें श्रीधर कविकृत प्राकृत समश्लोकी भाषांतर; [मूळ स्तोत्र, समश्लोकी व मराठी गद्यार्थ]; १९२९; अरुण छापखाना; उमरावती.

संपादन :

(१) ऐतिहासिक पत्रव्यवहार; १९३३; [गो. स. सरदेसाई व कृ. पां. कुळकर्णी यांच्याबरोबर; 'काव्येतिहाससंग्रह' व 'भारतवर्ष' यांत पूर्वी प्रसिद्ध झालेल्या साधनांची पुनरावृत्ति व अवांतर नवीन भर].

(२) नागपूरकर भोंसल्यांची बखर.

**काळे, विश्वनाथ रामचंद्र** [१८२३–१८८८] वाद्यविशारद व तंतुवाद्य-वादनकलेविषयींच्या पुस्तकांचे लेखक. यांचा जन्म श्रीक्षेत्र काशी येथें झाला. यांचे वडील चित्रकोट येथील पेशव्यांच्या अन्नछत्राचे मुनीम होते. विश्वनाथबोवा सुमारें नऊ वर्षांचे असतांना त्यांचे वडील कैलासवासी झाले. तेव्हांपासूनच बोवांची प्रवृत्ति तंतुवादनाकडे होती. वडील वारल्यावर ते महाराष्ट्रांत आले. योगायोगानें त्यांस भोरचे पंतसचिव यांजकडे कारकुनाची चाकरी मिळाली. या ठिकाणीं चाकरी सांभाळून खासगी रीतीनें त्यांनीं सतार, सारंगी, बीन इत्यादि हत्यारांवर आपले परिश्रम अविश्रांत चालविले व ती कला बऱ्याच अंशीं साध्य करून घेतली. कांहीं दिवसांनीं कोणत्या तरी कामानिमित्त पंतसचिव मुंबईस यावयास निघाले त्यावेळीं त्यांनीं बोवांस बरोबर घेतलें होतें. मुंबईस आल्यावर बोवांनीं तंतुवाद्यवादननिपुण लोकांची माहिती काढली व अशा ठिकाणीं नित्य जाण्याचा परिपाठ ठेविला. मुंबईत त्या काळीं हार्मोनियम पेटीचा प्रवेश झालेला नव्हता. बंदेअल्लीखां, अल्ली हुसेनखां यांसारखे बीनकार व जीवनलाल महाराज गोस्वामी, यशवंतराव दळवी यांसारखे सतारवादनपटु मुंबईत त्यावेळेस होते. हीं दोन्ही वाद्यें शोकीन लोकांस फार प्रिय होतीं. त्या काळांत मुंबईतील सुशिक्षित मंडळींत सतार वाजविण्याचा बराच शौक असे. विश्वनाथबोवांस या मंडळींत बसण्या-उठण्यास मिळून वाद्यें ऐकण्याची संधि मिळाली. आपण मंडळीच्या सहवासांत राहून वादनकलेंतील कसब पूर्णपणें साध्य करून घेतलें पाहिजे अशी महत्त्वाकांक्षा त्यांच्यांत उत्कटपणें उत्पन्न झाली. पंतसचिव कांहीं काळ मुंबईत राहिल्यावर भोरास निघून गेले. त्यांजबरोबर विश्वनाथबोवांस मुंबई सोडून जाणें भाग पडलें. पण त्यांचें मन आतां कांहीं केल्या भोरास रमेना, तें मुंबईस धांव

घेऊं लागले. शेवटीं त्यांनीं मोठा हिय्या करून सचिवांकडे मुंबईस जाण्याची परवानगी मागितली. सचिवांनीं, त्यांस विद्यासाधनेची लागलेली तळमळ लक्ष्यांत घेऊन, परवानगी दिली. भोर सोडून मुंबईस येतांच ते त्या काळचे गाजलेले सतार शोकीन वादनपटु जीवनजी महाराज गोस्वामी यांच्या आश्रयास येऊन राहिले व त्यांची पूर्ण कृपा संपादून तंतुवादनकलेमध्यें त्यांनीं पारंगतता मिळविली. उत्तम बीनकार व सतारवादक म्हणून त्यांचा लौकिक पसरूं लागला. याच सुमारास त्यांचा प्रसिद्ध गवय्ये बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर यांचेशीं स्नेह घडून आला. या दोघांनीं मिळून 'संगीत पारिजात' नांवाचें संगीत कलेला वाहिलेलें मासिक काढलें. माहितीपूर्ण असें हें मासिक असे. पण पुढें तें बंद पडलें. १८८० सालीं मुंबईत महादेव चिमणाजी आपटे यांनीं जो गायनसमाज स्थापिला होता त्याच्या कार्यकर्त्या मंडळींत बाळकृष्णबोवा व विश्वनाथबोवा हे प्रमुख होते. विश्वनाथबोवांनीं सतारवादनकले-बरोबरच जीवनजीमहाराजांकडून सतार जोडण्याचीहि कला संपादिली होती. त्यांनीं 'तंतुगान-प्रवेश' या लिहिलेल्या 'सतारीच्या पुस्तकां'त या त्यांच्या प्रावीण्याची प्रचीती मिळते. 'त्यांत विषय जरी थोडा होता तरी त्यांतली माहिती विश्वसनीय म्हणजे लक्ष्याला अनुसरून आहे.'† विश्वनाथबोवांनीं 'मृदंग वादना'वरहि याच सुमारास एक पुस्तक लिहिलें. अशा रीतीनें कलेंत प्राविण्य मिळवून तिचा प्रसार करण्यासहि ते झटत होते खरे, परंतु आर्थिक बाबतींत प्रगति न झाल्यामुळें ते मोठ्याच विवंचनेंत असत. कुटुंबपोषणाची फार मोठी जबाबदारी त्यांजवर होती. ती नीट पार पाडतां यावी यासाठीं त्यांनीं वकिलीचा अभ्यास करून बडोदें संस्थानांत सनद मिळविली. बडोदें येथें असतां मौलाबक्ष बिनकार यांच्या साहाय्यानें कांहीं दिवस ते 'गायनाब्धिसेतु' या नांवाचें मासिक प्रसिद्ध करीत असत. विश्वनाथबोवा बडोद्यास फार दिवस राहूं शकले नाहींत. तेथील वातावरणास ते कंटाळले व मुंबईस पुन्हां परत आले. या काळांतच त्यांनीं 'संगीतदर्पण', 'मृदंगवादन', हीं पुस्तकें लिहिलीं, त्याचप्रमाणें सूर्याजी सदाशिव महात्मे यांच्या 'तंतुवाद्य' या पुस्तकास साहाय्य केलें.

आयुष्याच्या अखेरीस, त्यांनीं ठाणें येथें सीमेंटचा कारखाना काढला होता.

---

† गेल्या पन्नास वर्षांतील संगीत कलेची हकीकत; मंगेश रामकृष्ण तेलंग, विविधज्ञान-विस्तार प. आ. स्मारक निबंधावलि, भा. १

झालेलें दुःख त्यांनीं ‘ विलापलहरी ’ या काव्याच्या द्वारां व्यक्त केलें व पुढें राजकवि टेनिसन् याच्या प्रिन्सेस नामक काव्याच्या आधारें त्यांनीं ‘ इंदिरा ’ काव्य लिहिलें. ‘ इंदिरा ’ काव्याचें काव्यसंग्रहकार ओक यांनीं १८८२ सालीं विविधज्ञानविस्तारांत विस्तृत परीक्षण केलें आहे. यांनीं वनस्पतिशास्त्राचा फार चांगला अभ्यास केला होता. ‘ मुंबई इलाख्यांतील विषारी वनस्पति ’, ‘ हिंदुस्थानांतील फुलें नसणाऱ्या वनस्पति ’, ‘ हिंदुस्थानांतील औषधी वनस्पति ’ हे त्यांचे वनस्पतिशास्त्रविषयक ग्रंथ प्रसिद्ध आहेत. [आधार : रामराव बाळकृष्ण कीर्तिकरकृत चरित्रलेख, नवयुग, १९१७.]

कीर्तिकरांच्या कवितेबद्दल बालबोधकर्ते ओक यांनीं पुढीलप्रमाणें लिहिलें आहे, † “ त्यांची काव्यरचना सुलभ, गोड आणि भारदस्त अशी आहे. तिजमध्यें प्रसाद विपुल आहे. अर्वाचीन कवींतल्या अग्रगण्यांत त्यांची गणना आहे. त्यांचें इंदिरा काव्य मुंबईच्या विश्वविद्यालयाच्या युनिव्हर्सिटी स्कूलफायनल परीक्षेस विशेष काव्य म्हणून नेमिलें होतें. ह्यावरून त्यांच्या काव्याच्या योग्यतेची कल्पना सहज करतां येण्यासारखी आहे. ह्या डॉक्टरांच्या हातच्या औषधांनीं आणि शस्त्रक्रियांनीं जसें जनांच्या कायिक वेदनांचें निवारण होऊन त्यांस शांति मिळत आहे, तसें, त्यांच्या काव्याच्या श्रवणानें आणि अध्ययनानें मानसिक वेदनांचें विस्मरण होऊन चित्त तल्लीन होतें. ”

**वाङ्मय :**

(१) विलापलहरी; काव्य; १८८२; नेटिव्ह ओपिनियन छापखाना, मुंबई.

(२) इंदिरा; काव्य; १८८४, १९०१, निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(३) जलधिजवर्णन; [समुद्रांतील प्राणी व वनस्पति]; १८८०; आर्यभूषण प्रेस, पुणें.

(४) अश्रु, त्यांची उत्पत्ति आणि योजना; १८८७; निर्णयसागर, मुंबई.

(५) इंद्रियविज्ञानविचार; १८९२; आर्यभूषण, पुणें.

(६) रामदास–वचनामृत; [ओंवीबद्ध गाथा; रामदासांच्या बोधवचनांवर काव्यरचना]; १८९५, आर्यभूषण, पुणें.

† बाळबोध, पुस्तक २३, पृष्ठ २७०.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

(१) चरित्रलेख; रा. ब. कीर्तिकर; नवयुग, १९१७.
(२) विलापलहरी; परीक्षण; विविधज्ञानविस्तार, सप्टेंबर १८८२.
(३) इंदिरा; परीक्षण; विविधज्ञानविस्तार, अंक ४, ५, ६, ७; सन १८८५.
(४) इंदिरा; समालोचन; भ. श्री. पंडित; सत्यकथा, फेब्रुवारी १९४८.

**कुंटे, अण्णा मोरेश्वर** [१८४४–१८९६] वैद्यशास्त्राचा गाढा अभ्यासक, 'ज्ञानेश्वरी' व 'अमृतानुभव' या ग्रंथांचा चिकित्सक संपादक. महादेव मोरेश्वर कुंटे यांचे हे धाकटे बंधु. यांचा जन्म साताऱ्याजवळील माहुली या क्षेत्रीं झाला. यांचा प्रारंभींचा विद्याभ्यास कोल्हापुरास व पुढील मुंबईस झाला. विल्सन हायस्कूल, एल्फिन्स्टन हायस्कूल व कॉलेज या संस्थांत त्यांचें शिक्षण झालें. १८६६ सालीं हे बी. ए. झाले. तदनंतर यांनीं इंग्रजी वैद्यकशास्त्राचा अभ्यास करून ते १८७० सालीं एल्. एम्. व १८७४ सालीं एम्. डी. झाले. 'हे आपल्या धंद्याच्या कामांत फार निष्णात असत. चिकित्सेमध्यें ह्यांची बरोबरी करणारे धन्वंतरि त्या काळांत क्वचितच होते.' आर्यवैद्यकाचाहि यांचा अभ्यास चांगला होता. त्यांनीं संपादून प्रसिद्ध केलेला 'वाग्भट' हा ग्रंथ त्याचा निदर्शक होय. स्त्रीरोगाची चिकित्सा करणाराहि एक उत्तम दर्जाचा ग्रंथ त्यांनीं लिहिला आहे.

देशांत उद्योगधंद्यांची अभिवृद्धि व्हावी अशी इच्छा धरून आपल्या धंद्या-व्यतिरिक्त तशा खटपटींत पडणाऱ्यांपैकीं ते एक होते. त्यांनीं पदरचा पैसा खर्च करून आगकाड्या तयार करण्याचा एक कारखाना काढला होता.

अण्णा कुंटे यांची लक्षांत ठेवण्यासारखी वाङ्मयीन कामगिरी म्हणजे त्यांनीं संपादिलेले 'ज्ञानेश्वरी' व 'अमृतानुभव' हे ग्रंथ होत.

**वाङ्मय :**

(१) स्त्रीरोगविज्ञान; १८८१; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

संपादन :

(१) ज्ञानेश्वरी; निर्णयसागर छापखाना, मुंबई.
(२) अमृतानुभव;

**कुंटे, महादेव मोरेश्वर** [१८३५-१८८८] कवि, प्राचीन भारतीय वाङ्मयाचा अभ्यासक, षड्दर्शनज्ञ. कुंटे हे * साताऱ्याजवळ कृष्णातीरीं माहुली म्हणून जें प्रसिद्ध क्षेत्र आहे तेथले राहणारे. तीच त्यांची जन्मभूमि. हे अगदीं गरीब भिक्षुक कुटुंबांत जन्मले. यांचा जन्म सन १८३५ च्या श्रावण मासांत झाला. ते लहान असतां त्यांचे वडील अपघातानें वारले. त्यांचे पश्चात् महादेव व अण्णा असे दोघे मुलगे आणि त्यांची विधवा स्त्री अशीं तीन मनुष्यें शिल्लक होतीं. त्या दोघां भावामध्यें नऊ वर्षांचें अंतर होतें. घरची अत्यंत दरिद्रदशा. भिक्षुकीशिवाय दुसरें कांहीं निर्वाहास साधन नव्हतें. नदीवर यात्रिकांना त्यांना श्राद्धसंकल्प वगैरे सांगून जी कांहीं प्राप्ति होईल तेवढ्यांत निर्वाह केल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. क्षेत्राची खेडेगांवासारखीच वस्ती. तेथें कांहीं विद्याभ्यासाच्या वगैरे सोयी नव्हत्या. माधवरावांनीं वयाच्या बाराव्या वर्षापर्यंत माहुलीस आपले कसेबसे दिवस घालविले. क्षेत्रस्थ मुलें निरुद्योगी असल्यामुळें तीं स्वभावतःच उनाड आणि व्रात्य अशीं निपजतात. त्याचप्रमाणें मोरभट कुंट्यांचा महादेव हाहि अतिशय उनाड व व्रात्य होता. पावसाळ्याच्या दिवसांत नदीमध्यें बापड्याच्या आंघोळीच्या किती आवृत्त्या होत असतील त्याचा नियम नसे. नदीमध्यें प्रहर प्रहर पोहावयाचें व डुंबायचें, तसेंच उन्हांत अंग वाळवायचें, पुनः नदींत उड्या टाकायच्या, तापलेल्या वाळवंटांत सवंगड्यांसह खूप धिंगाणा घालायचा व पुनः नदीमध्यें उड्या टाकून पोहायचें, कवठें, चिंचा, बोरें, वगैरे मिळविण्या-करितां झाडांवरून चढायचें, तीं हिरवीं कच्चीं फळें बेलाशक खायचीं, त्यांवर ढसांढसां पाणी प्यायचें, त्यामुळें आईनें महादेवावर रागवावयाचें व संतापावयाचें, असा माधवरावांचा बालवयांत क्रम असे. वयाचीं बारा वर्षे झाल्यावर माधवरावांस विद्याभ्यासाची इच्छा होऊन, एके दिवशीं ते आईला न विचारतां कोल्हापुरास पळून गेले व तेथें पहिल्यानें कांहीं दिवस माधुकरी मागून व नंतर वार लावून मराठी व इंग्रजी शाळेंत त्यांनीं अभ्यास केला. या वेळचे, म्हणजे चाळीस वर्षा-पूर्वीचे, मराठी व इंग्रजी शाळांतले अभ्यास हल्लींपेक्षां अगदीं निराळे होते. त्या वेळीं मराठी शाळेंत इसापनीति व बाळमित्र हीं पुस्तकें शिकवीत असत. कोल्हा-पुरास पांडोबा तात्या दिवेकर यांची मराठी शाळा असे; त्या शाळेंत कुंटे हे प्रविष्ट

* 'ज्ञानचक्षू'कार वामन बाळकृष्ण रानडे यांनीं १८८८ सालीं लिहिलेलें चरित्र येथें संक्षेपानें दिलें आहे.

होऊन त्यांचे अभ्यासास सुरुवात झाली. मराठी शाळेंतला अभ्यास पुरा झाल्यावर १८५० सालीं ते इंग्रजी शाळेंत गेले. त्या वेळीं कोल्हापूरच्या इंग्रजी शाळेवरील मुख्याध्यापक कृष्णाजी चांफाजी या नांवाचे सुरतेचे परभू गृहस्थ होते. त्यांचे शाळेंत १८५५–५६ पर्यंत कुंटे हे इंग्रजी शिकत होते. कोल्हापुरास कुंटे गेल्यावर त्यांचे मराठी शाळेपासूनचे सतीर्थ म्हटले म्हणजे रा. ब. माधवराव रानडे, रा. सा. विठ्ठलराव पाठक आणि बाबजीराव सावंत हे होत. १८५६ सालीं कुंटे, विठ्ठलराव पाठक आणि बाबाजीराव असे तिघे विद्यार्थी जवळ पांच-पंचवीस रुपये जमवून मुंबईस आपला पुढील विद्याभ्यास चालविण्यासाठीं निघून गेले; परंतु मुंबईच्या वस्तींत कोणाची ओळखदेख नसल्यामुळें, त्यांच्याजवळ असलेली अल्पशी पुंजी लवकरच संपून, त्यांना फाके पडूं लागले ! तेव्हां त्यांचा कांहीं उपाय न राहून ते पुनः मुंबईहून कोल्हापुरास परत गेले. त्या वेळीं आगगाड्या वगैरेंची कोठेंच कांहीं सोय नव्हती. बिचारे विद्यादेवीचे तिघेहि भक्त कोल्हापुरास माघारे आले. नंतर तेथें त्यांनीं पुनः मोठ्या प्रयत्नानें शेंपन्नास रुपये मिळवून, जवळ पांच सहा महिन्यांची सामुग्री जमविली व आतां लवकर परत येण्याचें कारण नाहीं, अशी मनाची खात्री करून ते तिघेहि पुनः मुंबईस गेले. नंतर कुंटे हे विल्सन स्कूलमध्यें प्रविष्ट झाले. पुढें तीन वर्षें लागोपाठ मॅट्रिक्युलेशन परीक्षेस जात होते. १८५९ सालीं त्यांची मॅट्रिक्युलेशन परीक्षा उतरली. ह्या विल्सन स्कुलांत कुंटे यांस निर्वाहापुरती एक पगारी विद्यार्थ्याची जागा मिळाली. डॉ. विल्सनसाहेबांची कुंटे यांजवर त्यांच्या हुशारीमुळें आणि बुद्धित्वामुळें फार प्रीति असे, व यामुळें त्यांना आपल्या प्रिय छात्राच्या निर्वाहाची सोय करणें अवश्यक होतें. त्यावेळीं ह्या शाळेंतच कॉलेजचे वर्ग होते. १८५९ मध्यें मॅट्रिक्युलेशन परीक्षा झाल्यावर १८६१ त लिट्लगो व १८६४ त बी. ए. अशा परीक्षा माधवरावांनीं देऊन ते मुंबई युनिव्हर्सिटीचे ग्राज्युएट झाले. त्यांचे सतीर्थ रा. ब. रानडे हे १८६२ सालींच बी. ए. झाले होते.

कुंटे यांची मुंबईस स्कॉलरशिपा वगैरे मिळून निर्वाहाची सोय झाली तसें त्यांनीं आपल्या मातुश्रीस आणि कनिष्ठ बंधूस मुंबईस नेलें. कुंटे यांच्या मातुश्रीनें आपल्या मुलांकरितां फार खस्ता खाल्ल्या व अतिशय हाल भोगिले. माहुलीस व कोल्हापुरास असतांना त्या माउलीनें लोकांचीं दळणें दळून व स्वयंपाक करून ह्या आपल्या पोटच्या दोन गोळ्यांचें पोषण केलें; त्या बाईला, आतां आपला मुलगा विद्वान् झाला तेव्हां आपल्या श्रमाचें सार्थक झालें असें वाटलें असेल, हें सांगायला

नकोच. माधवराव कुंटे हे बी. ए. झाल्यावर, पुढें तसाच नेटानें अभ्यास चालविण्याची त्यांना दारिद्र्यावस्थेमुळें बिलकूल उमेद नव्हती. त्यांचे मनांतून यथेच्छ विद्याभ्यास करून मुंबईस युनिव्हर्सिटीच्या सर्व पदव्या मिळविण्याची फार हौस होती. परंतु गरिबीमुळें तसाच नेटानें अभ्यास करण्यास त्यांना फुरसत नव्हती.

त्यांना सिंधमध्यें कराची हायस्कूलच्या हेडमास्तरची एक जागा आली व ती त्यांनीं लगेच पत्करली. आपल्या हेतूप्रमाणें आपल्याला पूर्ण विद्याभ्यास करण्यास दारिद्र्यानें सवड झाली नाहीं, परंतु आपल्या प्रिय कनिष्ठ बंधूला सर्व प्रकारें साह्य करून त्याजकडून पूर्ण विद्याभ्यास करवूं असा त्यांनीं निश्चय केला. आणि, अण्णा व मातुश्री यांस मुंबईस ठेवून, माधवराव कुंटे हे कराचीस हेडमास्तर होऊन गेले.

सिंधमध्यें ते दोन वर्षेपर्यंत होते. पहिल्यापासूनच कुंट्यांची बुद्धि परम जाज्वल्य असल्यामुळें आणि त्यांस नेहमीं विद्येचें व्यसन असल्यामुळें सिंधमध्यें गेल्यावर त्यांनीं सिंधी भाषेचा उत्कृष्ट अभ्यास केला. तो इतका कीं, त्या भाषेंत ते व्याख्यानें देऊं लागले. कोणत्याहि भाषेंत व्याख्यानें देणें किंवा कविता करणें हें त्या भाषेंत चांगली गति असल्याशिवाय व ती भाषा उत्तम रीतीनें अवगत असल्यावांचून होत नाहीं. कुंटे हे सिंधी भाषेंत व्याख्यानें देत, यावरून त्यांनीं त्या भाषेंत किती प्रावीण्य संपादिलें होतें हें समजतें. शिवाय त्या भाषेंत ते चांगले वाकब होते याची साक्ष त्यांस मुंबई युनिव्हर्सिटीनें कित्येक दिवस सिंधी भाषेचे परीक्षक नेमिले होते, यावरूनहि उत्तम रीतीनें पटत आहे.

पुढें दोन वर्षांनीं म्हणजे १८६७ सालीं, कुंटे यांची कोल्हापूर येथील राजाराम हायस्कुलावर नेमणूक झाली. सुमारें बारा वर्षांपूर्वी जो महादेव कुंटे माधुकरी मागून किंवा वार लावून कोल्हापुरांत विद्याभ्यास करीत होता तोच विद्यार्थी, आतां माधवराव कुंटे होऊन, त्याच कोल्हापुरांत मोठा वजनदार व विद्वान् गृहस्थ होऊन आला, हें माधवरावजींस लहानसहान भूषण नव्हतें. कोल्हापुरास माधवराव कुंटे हे चार वर्षेपर्यंत हेडमास्तर होते.

कोल्हापुरास कुंटे हे नौकरीवर येईपर्यंत त्यांस संस्कृताचा गंधहि नव्हता. कोल्हापुरास आल्यावर त्यांना गीर्वाण भाषेचा अभ्यास करावा अशी इच्छा होऊन, त्यांनीं अगदीं जुन्या पद्धतीप्रमाणें—रूपावलि, समासचक्र, अमरकोश, पंचमहाकाव्यें,

अशा क्रमानें सिद्धांत-कौमुदी आणि व्याकरणावरील सर्व ग्रंथ यांचें अध्ययन केलें व अत्यल्पावकाशांत ते उत्तम वैयाकरणी झाले. व्याकरणशास्त्रांत पूर्ण अधीत झाल्यावर त्यांनीं न्यायशास्त्राचा व अलंकारशास्त्राचा कोल्हापुरासच अभ्यास केला. कोल्हापुरास असतांनाच त्यांनीं कै. वा. तरुण राजाराम छत्रपति यांच्या मृत्यु-विलापाचें एक काव्य केलें, व तेव्हांपासून त्यांना कविता करण्याची स्फूर्ति झाली. यापुढें, त्यांनीं ' राजा शिवाजी ' व ' मन ' ह्या नांवाचीं दोन मराठी काव्यें रचून प्रसिद्ध केलीं.

कराचीच्या व कोल्हापूरच्या हायस्कुलावर मुख्याध्यापकाचें काम रा. सा. कुंटे यांनीं फार उत्तम प्रकारें केलें. पहिल्यापासून सुबोध व सरस व्याख्यानें देण्याचा त्यांना फार नाद असे. यामुळें त्यांचें लोकांवर वजन चांगलें बसे. व त्यांच्या विद्वत्तेचा ठसा लोकांचे मनावर उठण्यास फारसा अवकाश लागत नसे. कोल्हापुरास ज्यांनीं त्यांना विद्यार्थि-अवस्थेंत बघितलें होतें, त्यांनीं त्यांस ह्याप्रमाणें मोठे विद्वान् आणि पंडितमान्य झालेले पाहून त्यांजविषयीं किती धन्यवाद उच्चारिला असेल हें सांगायला नकोच.

कोल्हापुराहून १८७१ सालीं रा. सा. कुंटे यांस पुणें हायस्कुलावर हेडमास्तर नेमिलें. त्यांच्या विद्वत्तेविषयीं आणि शिकवण्याच्या उत्कृष्ट पद्धतीबद्दल शाळा-खात्याचे अधिकाऱ्यांची अगदीं खात्री झाली असल्यामुळें, त्यांस, पुण्यासारख्या ठिकाणच्या पहिल्या प्रतीचे हायस्कुलावर मुख्याध्यापक नेमण्यांत आलें आणि ह्या नेमणुकीनें तर त्यांच्या गुणांची सरकारांत किती चाहा होती हें सर्व लोकांस स्पष्टपणें कळून आलें. कुंटे यांची पुण्याच्या हायस्कुलावर नेमणूक होईपर्यंत येथील जागा युरोपियनाकरितां राखून ठेविल्यासारखी असे. परंतु शाळाखात्याचे मुख्याधिकारी चाटफील्ड साहेब यांनीं त्यांची पारख उत्तमप्रकारें करून त्यांस पुण्याचे हायस्कुलावर नेमिलें व कुंटे यांनींहि शेवटपर्यंत तेथें फार चांगल्या रीतीनें काम करून यश मिळविलें. कुंटे यांची पुण्यास नेमणूक झाल्यापासून, १८७९-८० हीं दोन वर्षें खेरीज करून, ते १६ वर्षें एकसारखे पुण्यासच होते. त्या मधल्या दोन वर्षांत ते मुंबईस एल्फिन्स्टन कॉलेजवर सहा महिनेपर्यंत संस्कृत प्रोफेसर नेमिले गेले होते, व पुढें त्यांची अमदाबाद कॉलेजावर ॲक्टिंग प्रिन्सिपॉलच्या जागीं नेमणूक झाली.

पुण्याहून मुंबई व अमदाबाद येथें जाण्यापूर्वीच कुंटे यांनीं मीमांसाशास्त्राचा अभ्यास करून, त्या शास्त्राचें परिज्ञान आपल्या देशबांधवांस मराठींतून व इंग्रजीं-

तून करून देण्याची सुरुवात केली होती. कुंट्यांची ‘ षड्दर्शनचिंतनिका ’ + ही कशी होती व तिजवरून त्यांचें त्या शास्त्रांत किती नैपुण्य होतें हें, ज्यांनीं तें पुस्तक पाहिलें असेल त्यांस कळून येईल.

एवढेंच करून कुंटे हे स्वस्थ बसले नाहींत. इटलीच्या विद्वत्परिषदेकडून ‘ आर्य लोकांच्या हिंदुस्थानांतील सुधारणाक्रमाचा इतिहास ’ लिहिणारास बक्षीस देण्याचें प्रसिद्ध झालें, तेव्हां तें बक्षीस मिळविण्याच्या हेतूनें, रा. सा. कुंटे यांनीं ‘ व्हिसिसिट्यूड्स ऑफ आर्यन सिव्हिलिझेशन इन इंडिया ’ या नांवाचें एक मोठें थोरलें पुस्तक लिहून, तें रोम येथें पाठविलें व तें तेथल्या विद्वत्परिषदेस पसंत होऊन, नेमिलेलें बक्षीस रा. सा. कुंटे यांस मिळालें. ज्याच्या अवलोकनांत हें पुस्तक आलें असेल त्यांस कुंटे यांच्या थोर विद्वत्तेचें व शोधक बुद्धीचें आणखी एक उत्कृष्ट प्रमाण मिळाल्यासारखें होणार आहे. आपले नेहमींचे व नियमित उद्योगधंदे संभाळून, एवढालीं पुस्तकें लिहिणारे; म्हणजे ते कांहीं सामान्य बुद्धीचे किंवा कर्तृत्वाचे गृहस्थ नव्हते, हें कोणालाहि समजल्यावांचून राहणार नाहीं.

१८७९-८० ह्या सालीं हा लेख लिहिणाराचें (ज्ञानचक्षूकर्त्याचें) गुजराथेंत व अमदाबादेस जाणें झालें होतें. त्या वेळीं वर लिहिल्याप्रमाणें रावसाहेब हे तेथील कॉलेजावर प्रिन्सिपॉल असून त्यांना तिकडे जाऊन पुरे चार महिने देखील झाले नव्हते. असें असून तेथें हेमाभाई इन्स्टिट्यूशनमध्यें त्या वेळीं एक सभा भरली होती व त्या सभेंत रा. सा. कुंटे यांनीं सुमारें अर्धा पाऊण तास गुजराथींत सुंदर व त्यांच्या नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें अस्खलित व्याख्यान दिलेलें ऐकून आम्हांला चमत्कार वाटला. कोणत्याही भाषेचा—व त्यांत देशी भाषेचा—अभ्यास अल्पावकाशांत करून त्यांत व्याख्यानें देण्यासारखें नैपुण्य मिळविणारा असा रा. सा. कुंट्यांवांचून दुसरा कोणी दृढाभ्यासी गृहस्थ आमच्या महाराष्ट्रांत मिळणें कठिण आहे, असें आम्हांस वाटतें !

कुंटे यांनीं मुंबई व अमदाबाद इकडे जाण्यापूर्वी ‘ ऋषि ’ नांवाचें एक इंग्रजी काव्य केलें असून, त्या काव्यांची इंग्रजी कवींनींहि तारीफ केल्याची इकडे प्रसिद्धि आहे. त्याचप्रमाणें, १८७६–७७ सालीं जो दुष्काळ पडला होता त्या कालाला अनुसरून रा. सा. कुंटे यांनीं ‘ फॅमिन्ड् व्हिलेज ’ या नांवाचें एक इंग्रजी काव्य करून प्रसिद्ध केलें.’

---

+ हें मासिक १८७७ सालांत निघालें.

रा. सा. कुंटे हे पुण्यास आल्यावर ६-७ वर्षांनीं सर्व हिंदुस्थान पाहून येण्यासाठीं रजा घेऊन प्रवासास निघाले, व पुढें कांहीं दिवसांनीं पुनः रजा घेऊन दक्षिण हिंदुस्थान व लंका बेट हीं बघून आले. त्यांच्या ह्या प्रवासांत, सर्व प्रकारचे शोध करून त्यांचीं टिप्पणें घेण्याची जी त्यांची नैसर्गिक बुद्धि तिला तर पुष्कळच खाजें मिळालें व त्याचा त्यांनीं आपल्या व्याख्यानांतून वगैरे अनेक वेळेस उपयोग केलेला पुष्कळांस माहीत आहेच. अनेक ग्रंथज्ञानानें व ह्या सर्व प्रवासानें त्याचे ज्ञानास व माहितीस फारच तेज आलें होतें. मनुष्यांचें ग्रांथिक शाहाणपण प्रवासविज्ञानाशिवाय व प्रत्यक्ष अनुभवाशिवाय पंगू आहे, असें कुंट्यांच्या रसभरीत व्याख्यानांवरून व बहुश्रुतपणावरून सहज श्रोत्यांना कळून आल्याशिवाय रहात नसे.

रा. सा. कुंटे हे १८७८ पर्यंत येथील पुण्यांतील प्रार्थनासमाजाचे पुरस्कर्ते व अध्वर्यु होते. परंतु धर्मसंबंधानें त्यांची मतें पहिल्यापासून स्थिर नसल्यामुळें, व मनुष्याला जों जों जास्त जास्त ज्ञानप्राप्ति व शास्त्राभ्यास होत जातो तों तों त्याचें धर्मविषयक अस्थैर्य जास्त वाढून मनाला चांचल्य येतें; याप्रमाणें कुंटे यांचे मनालाहि त्या धर्मविषयांत चांचल्य उत्पन्न होऊन, त्यांनीं प्रार्थनासमाजाकडचा पक्ष अगदीं सोडून, ते होतां होतां शेवटीं अगदीं वारकरी संतमंडळीप्रमाणें ईश्वरनामाचा उच्चार करून, रोज एकेक तासपर्यंत पायांत चाळ बांधून व हातांत चिपळ्या व वीणा घेऊन अंगांतून घाम निघेपर्यंत निखालस भजन करीत.

रा. सा. कुंटे यांनीं अनेक शास्त्राभ्यास व भाषाभ्यास करून त्यांत उत्कृष्ट अधीतता संपादन केल्यानंतर, त्यांस त्या विषयांचा कंटाळा व तिरस्कार येऊन, त्यांचें लक्ष यंत्रें व कारखाने यांचेकडे लागलें. तें इतकें कीं, त्यांना सर्वत्र त्या विषयाशिवाय दुसरें कांहीं सुचेनासें झालें. जो कोणता विषय डोक्यामध्यें येईल त्याचा पिच्छा पुरविल्याशिवाय व तो पुरा आपल्या हस्तगत केल्याशिवाय सोडावयाचा नाहीं, असा त्यांचे स्वभावाचा पहिल्यापासून कल असल्यामुळें, त्यांनीं यंत्राची व कारखान्याची हौसहि पूर्ण केली. त्यांनीं येथें (पुण्यास) शिसपेन्सिलीचा कारखाना काढून, पेन्सिली तयार करण्याची सुरुवात केली. रा. सा. कुंटे ह्यांचें ह्या कामांतलें ज्ञान केवळ वरवर नसून, त्याबद्दलचा त्यांनीं स्वतः चांगल्या रीतीनें अभ्यास करून त्या कारखान्यांत त्यांची चांगली गति झाली होती.

यंत्रें, कारखाने यांचेकडे ५।४ वर्षें घालविल्यावर त्या शास्त्राविषयींहि त्यांना

बराच वीट येऊन, मनाला स्वास्थ्य व करमणूक व्हावी म्हणून त्यांनीं आपला कारखाना आपल्या मुलाचे स्वाधीन करून, गायनवादनकलेचा यथाशास्त्र अभ्यास चालविला; व त्यांच्या विलक्षण अभ्यासी स्वभावाप्रमाणें, त्यांनीं अल्पावकाशांतच त्या कलेमध्येंहि तात्त्विक दृष्टीनें चांगलें प्रावीण्य मिळविलें. ह्याप्रमाणें त्यांना गायनवादनाचा नाद लागला. त्या कलेच्या संबंधानें, पूर्वीच्या व नवीन संस्कृत व इंग्रजी ग्रंथकारांचे सर्व ग्रंथ त्यांनीं पाहून टाकले, आणि देशी व विदेशी गायनवादनाच्या सामुग्रीची तुलना करून, देशी गायन व वादन अधिक सुसंस्कृत व व्यापक आहे, अशी त्यांनीं आपली खात्री करून प्रसंग आले तेव्हां, त्या विषयावर मोठमोठीं व्याख्यानेंहि दिलीं. गायनवादनाचा त्यांस नाद लागल्यापासून पुणें येथील गायनसमाजाचे ते मोठे पुरस्कर्ते झाले व त्यासंबंधानें ते मोठ्या आस्थेनें आपलें काम करीत.

ह्याप्रमाणें, गायनवादनकला संपादित केल्यावर त्याविषयींचा त्यांना अंमल कंटाळा आल्यासारखा होऊन, ते भूगर्भशास्त्रज्ञानसंपादनाकडे लागले. पुढें कांहीं पुणें म्युनिसिपालिटींत सभासद म्हणूनहि निवडून आले होते.

माधवराव कुंटे यांना अनेक भाषा येत असत. त्यांतून व्याख्यानें देण्यासारखा भाषाव्यासंग पांच भाषांचा असे. मराठी, सिंधी, गुजराथी, संस्कृत आणि इंग्लिश. या भाषांशिवाय त्यांना ग्रीक, ल्याटिन व पर्शियन या भाषांचेंहि अंशतः ज्ञान असे. खरा अभ्यासी व कोणत्याहि विषयाचेसंबंधानें दडपून बोलण्याला अधिकारी असा माधवराव कुंटे हाच एक पुरुष आमचे पुण्यांत होता. त्यांची जागा भरून निघण्यास पुष्कळ अवकाश लागेल.



कुंटे यांच्या चरित्राची नीट कल्पना यावी म्हणून 'ज्ञानचक्षू'कर्त्यानें लिहिलेलें त्यांचें चरित्र वर दिलें आहे. या चरित्रांत त्यांच्या काव्यवाङ्मयासंबंधीं नुसता उल्लेख येऊन गेला आहे; त्याची चर्चा झालेली नाहीं. विशेषतः कुंट्यांच्या 'राजा शिवाजी' या काव्याबद्दल विशेषत्वानें लिहिणें भाग आहे. या काव्यानें मराठी काव्यरचनेंत नवीन तऱ्हेचा पायंडा घातला. भाषेंतील कृत्रिमता नाहींशी करून टाकण्याचा त्यांत प्रयत्न झाला आहे. गीर्वाण शब्दभांडारांतून उसन्या आणलेल्या आभरणांनीं न नटवितांही महाराष्ट्रकाव्यसुंदरीला सौंदर्यवती करितां येतें हें

दाखविण्याचा कुंट्यांनीं निश्चय केला होता, आणि तो पुष्कळ अंशानें यशस्वी झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. रामचंद्र भिकाजी जोशी यांनीं या काव्यासंबंधीं आपल्या 'मराठीभाषेची घटना' या पुस्तकांत विस्तारपूर्वक लिहिलें आहे. ते लिहितात, "मराठीमध्यें पाश्चात्य नमुन्यावर काव्य करण्याचा अगदीं पहिला प्रयत्न कुंटे यांनीं केला. 'राजा शिवाजी' हें त्यांचें महाकाव्य चांगल्यापैकीं आहे. परंतु कित्येकांनीं त्या काव्याची केवळ नवीन म्हणून फजिती उडविल्यामुळें त्यांचें काव्य पुरें प्रसिद्धीसहि आलें नाहीं. त्यांनीं 'मन' म्हणून तात्त्विक विषयावर नवीन तऱ्हेचें काव्य लिहिलें. परंतु त्याचीहि तीच अवस्था झाली. 'आतां हे कविमन्य तत्वज्ञानी बनले !' म्हणून त्यांच्यावर खरमरीत टीका आली*......कुंटे यांचा उद्देश साधी सोपी कविता करण्याचा होता, 'साकी किंवा पद यांमधून दिसणारी मराठी भाषा श्लोक व आर्या या संस्कृत छंदांतून दिसत नाहीं. जेथें सहज मराठी शब्द योजितां येतील तेथेंहि संस्कृत शब्द कोंबले असल्यामुळें मराठी कवितांमधून संस्कृत शब्दांची निरर्थक गर्दी झाली आहे,' असें त्यांचें मत होतें. या म्हणण्यांत कांहीं एक वावगें नव्हतें. त्यांनीं असें धोरण धरल्यामुळें त्यांचें काव्य निर्भेळ मराठी वळणाचें झालें आहे. त्यांतील भाषा खड्या सुरांत काढलेली सडेसोटपणाची आहे. ह्या स्वाभाविक गुणामुळें काव्याचा मुख्य गुण जो वीररस त्यास साह्यच झालें आहे. बहिर्जीसारख्या अशिक्षित मराठी गड्याच्या किंवा सोयराबाईसारख्या स्त्रीच्या तोंडून पदलालित्याची अपेक्षा करणें म्हणजे खरें काव्य न समजणें होय. संभाजीचें बालपण किंवा नूरजादीचें वर्णन यांवरून पाहतां ही नित्यांतली व्यावहारिक भाषा वीररसाप्रमाणेंच अन्य रसांनाहि शोभत आहे असें दिसून येईल. खरोखरी पाहिलें तर हें काव्य उत्कृष्ट वठलें आहे. सांप्रत नित्य होणाऱ्या नवीन काव्यांमधून पुष्कळां-मध्यें भाषेचा असाच सहज ओघ दृष्टीस पडतो, पण त्याला आतां कोणी नांवें

---

* निबंधचंद्रिकेंत यासंबंधीं, 'सत्यप्रसिद्धी इच्छिणारा' या नांवानें एक पत्र प्रसिद्ध झालें आहे. सदर पत्रलेखक म्हणतो "कुंटे यांचें 'मन' नांवाचें तत्त्वविचारमय काव्य १८७२ मध्यें प्रसिद्ध झालें, त्या सुमारास ज्ञानप्रकाशच्या दोन तीन अंकांत 'A Poet turned a philosopher' या नांवाचा निबंध इंग्रजींत प्रसिद्ध झालेला आहे. त्यांतील विचार 'विद्वत्व आणि कवित्व' या निबंधांतील विचारांसारखे आहेत, व तो 'मन' ह्या ग्रंथास अनुलक्षून आहे. तो विष्णुशास्त्री यांनीं लिहिला असावा अशी पुष्कळांची समजूत आहे. (नि. चं. अंक ३, १८८३). ही समजूत शेवटीं खरीच ठरली.

ठेवीत नाहीं. कुंटे यांनीं पुढें कविता करणें सोडून दिलें, ही मराठी वाङ्मयाची मोठी हानि झाली. ”

कुंटे यांचा प्राचीन भारतीय वाङ्मयाचा अभ्यास दांडगा होता. कोणत्याहि विषयाच्या मूळांत जाऊन चिकित्सकपणें अभ्यास करण्याची त्यांची प्रवृत्ति होती. त्यामुळें आपल्या अभ्यासविषयासंबंधीं ते अनेकदां रूढ विचारांहून वेगळे विचार स्पष्टपणें मांडीत. गतानुगतिक लोकांना त्यामुळें धक्का बसून, ते त्यांस व त्यांच्या विचारांस ‘ विक्षिप्त ’ असा शिक्का मारून हेटाळणी करूं लागत. परंतु त्यांचें ‘ षड्दर्शन-चिंतनिका ’ मासिक व ‘ भारतीय आर्य संस्कृतीचीं स्थित्यंतरें ’ (व्हिसिसिटयूड्स ऑफ आर्यन सिव्हिलिझेशन इन इंडिया) हीं पुस्तकें पाहिलीं म्हणजे त्यांच्या सूक्ष्म, तल्लख व व्यासंगी बुद्धिमत्तेची साक्ष पटते. ‘त्यांच्या काळांत तरी त्यांच्याइतका चिकित्साबुद्धीनें प्राचीन भारतीय वाङ्मयावर विचार करणारा दुसरा महाराष्ट्र पंडित नव्हता,’† असे ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांनीं काढलेले उद्गार सार्थ वाटतात.

**वाङ्मय :**

(१) राजा शिवाजी नांवाची वीररसप्रधान कविता—भाग १ ते ३; [इंग्रजी प्रस्तावना पृष्ठें २८]; १८६९; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.
(२) ” ” ; भाग ४ ते ६; १८७१; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.
(३) ” ” ; भाग १ ते ६; १९२४; प्रकाशक, गो. गो. अधिकारी, हनुमान प्रेस, पुणें.
(४) राजाराम महाराज छत्रपति; काव्य; १८७०; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.
(५) मन नांवाची कविता, १८७२; निर्णयसागर छापखाना, मुंबई.
(६) बालविवाहनिषेध यासंबंधीं वाद; १८७६.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

(१) राजा शिवाजी; परीक्षण; विविधज्ञानविस्तार, पुस्तक ४, अंक ६, ७, ८.

† विद्यासेवक, एप्रिल १९२५.

**कुरुंदवाडकर, गणपतराव हरिहर** [१८३८–१८९९] कवि. यांचा कुरुंदवाडकर पटवर्धन घराण्यांत कुरुंदवाड येथें झाला. कुरुंदवाड संस्थानच्या धाकट्या पातीचे हे अधिपति होते. यांचें शिक्षण जुन्या पद्धतीनें झालें होतें. संस्कृत भाषेचा यांचा अभ्यास फारच चांगला होता. पुण्यांतल्या चांगल्या चांगल्या पंडितांशीं हे संस्कृत भाषेंत वादविवाद करूं शकत. जुनी मराठी कविताहि यांनीं चांगली अभ्यासिली होती. 'गणेशपुराण आर्या' 'गंगावर्णन' व 'भट्टवंशकाव्य' अशीं तीन काव्यें यांनीं लिहिलीं. यांपैकीं पहिलें अनुवादात्मक असून, शेवटचीं दोन स्वतंत्र आहेत. "*गणेशपुराण हा ग्रंथ बराच मोठा आहे. संस्कृत शब्द, यमक व दुसरे शब्दार्थालंकार या बाबतींत या राजकवीनें मोरोपंतांचें पुरतें वळण गिरविलें आहे. गणेशपुराण या काव्याची उत्पत्ति मोठ्या गमतीची आहे. कुंटे यांच्या 'राजा शिवाजी' या काव्यावर यांनीं एकदां खरमरीत टीका केली. तेव्हां त्यांचे चुलते त्यांना टाकून बोलले कीं, 'केवळ टीका करणें सोपें आहे, पण कृति करणें अवघड आहे.' हें बोलणें कवीला अर्थातच झोंबलें, व तेव्हांपासून त्यांनीं आपलें नांव कवीच्या पटांत दाखल केलें. ह्याच कवीचीं 'गंगावर्णन' आणि 'भट्टवंश' अशीं वर्णनात्मक व ऐतिहासिक दोन स्वतंत्र काव्यें आहेत. भट्टवंशाला मूळ 'काव्यरत्नावलीं'तून प्रारंभ झाला व पुढें तें स्वतंत्रपणेंच प्रसिद्ध झालें. त्यांत भटपेशवे यांच्या वंशाचें 'रघुवंशा'च्या धर्तीवर वर्णन केलें आहे. दुसऱ्या काव्यांत गंगानदीचें आर्याछंदांत वर्णन आहे."

**वाङ्मय :**

(१) गणेशपुराण आर्या; पूर्वार्ध; १८७७; जगद्धितेच्छु, पुणें.
(२) ,, ,, उत्तरार्ध; १८८४; इंडियन प्रेस, मुंबई.
(३) गंगावर्णन, आर्या; १८७४; ज्ञानचक्षु छापखाना, पुणें.
(४) भट्टवंशकाव्य; १८९३; भाऊनाना छापखाना, कुरुंदवाड.

**कुळकर्णी, आप्पाजी विष्णु** [—२५ मे १९४२] निबंधकार. बेळगांव जिल्ह्यांतील चिकोडी येथील राहणारे. 'शिक्षक' व 'ग्रंथरत्नाकर' या नांवाचीं दोन नियतकालिकें यांनीं कांहीं वर्षें चालविलीं. हे आठ वर्षें (१९००–१९०८)

* अर्वाचीन मराठी कवि व काव्यें; ना. म. भिडे, विविधज्ञानविस्तार निबंधावली—उत्तरार्ध, प. ६८.

लो. टिळकांकडे त्यांचे लेखक म्हणून काम करीत असत. या काळांतील लो. टिळकांसंबंधींच्या आपल्या आठवणी 'लोकमान्य टिळक यांचीं गेलीं आठ वर्षें' हें पुस्तक लिहून त्यांनीं प्रसिद्ध केल्या. यापूर्वी (१९०३) त्यांनीं मराठी रंगभूमीसंबंधीं एक पुस्तक प्रसिद्ध केलें होतें. रंगभूमीचा पद्धतशीर रीतीनें इतिहास कथन करण्याचा हा पहिलाच प्रयत्न होय. हीं दोन्ही पुस्तकें त्यांनीं परिश्रमपूर्वक तयार केलेलीं असून त्याबद्दल त्यांची त्या काळीं सर्वत्र प्रशंसाहि झाली.

**वाङ्मय :**

(१) वेळ आणि त्याचा सदुपयोग; निबंध; १८९५; ज्ञानप्रसारक, चिकोडी.
(२) निबंधावली—भा. १; [ॲडॅम्सकृत 'बिझिनेस हॅबिट्स' या पुस्तकाचे आधारें]; १८९८; ज्ञानप्रसारक, चिकोडी.
(३) ,, भाग २; १८९९; ,,
(४) मौजच मौज; [अनुवादित गोष्टी]; १८९६; ज्ञानप्रसारक, चिकोडी.
(५) मराठी रंगभूमि; १९०३; आर्यभूषण, पुणें.
(६) मराठी रंगभूमीची किल्ली; १९०४; इंदुप्रकाश, मुंबई.
(७) लोकमान्य टिळक यांचीं गेलीं आठ वर्षें; १९०९; इंदुप्रकाश, मुंबई.

**कुळकर्णी, गणेश विठ्ठल** [१८८९–१९२१] कादंबरीकार. 'सहस्रकर' या साप्ताहिकाचे व 'उद्यान', 'नवयुग' या मासिकांचे संपादक. यांचें घराणें कोल्हापूर संस्थानांतील तैनातदारांचें होतें. मूळचें आडनांव कुंभोजकर. पण कांहीं राजकीय कारणाकरितां तें टाकून कुळकर्णी असें आडनांव हे लावूं लागले. कोल्हापुराशीं आपला संबंधहि त्यांनीं सोडला होता. मॅट्रिक्युलेशनपर्यंत यांचें शिक्षण झालें होतें. तारुण्यांतील पहिलीं कांहीं वर्षें एका सर्कशीबरोबर हिंदुस्थानभर हिंडण्यांत यांनीं घालविलीं. पुढें मुंबईस येऊन ते स्थिर झाले. यांची लेखनाची मूळचीच हौस दांडगी. त्यामुळें लेखणीवर जगावयाचें असें ठरवून यांनीं प्रारंभीं 'व्यतिपात' या टोपणनांवानें वर्तमानपत्रांतून चुरचुरीत प्रासंगिक लेख लिहावयास सुरुवात केली. लेखनव्यवसायांत थोडासा जम बसूं लागतांच 'उद्यान', 'नवयुग' या मासिकांचें संपादन व कादंबरीलेखन सुरू केलें. हे स्वतःस गोखले, आगरकर यांचे अनुयायी समजत व त्यांचे राजकीय व सामाजिक विचार आपल्या

लेखनांतून प्रसृत करण्याचा प्रयत्न करीत. सामाजिक अन्याय, विषमता, रूढीचे दास बनल्यामुळें उत्पन्न झालेली अमानुष वृत्ति यांविरुद्ध त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांतून हल्ले चढविले आहेत. 'कर्मसंन्यास' व 'जन्मठेप' या त्यांच्या दोन कादंबऱ्यांत याविषयींचीं चित्रें पाहावयास मिळतात.

**वाङ्मय :**

(१) कर्मसंन्यास; सा. कादंबरी; १९१७; सुरसग्रंथमाला, पुणें.
(२) कुसुंबा अथवा विषविनोद; [मेरी कॉरेलीच्या 'वर्मवुड' या कादंबरीच्या आधारें]; १९१९; मुंबई,
(३) चंद्रचूड; सा. कादंबरी; १९१५; सुरसग्रंथमाला, पुणें.
(४) जन्मठेप; सा. कादंबरी; १९१८; सुरसग्रंथमाला, पुणें.
(५) योगायोग; [कादंबरी; हॉलकेनच्या 'धि प्रॉडिगल सन' चे आधारें]; १९२०; मुंबई.
(६) सोनेरी खंजीर; कादंबरी; [मॉरिस ल ब्लँकच्या '८१३' च्या आधारें]; १९१६; सुरसग्रंथमाला, पुणें.
(७) हा संशयाचा प्रताप; कादंबरी; १९१७, १९२७; सुरसग्रंथमाला, पुणें.
(८) संगीत प्रबोध; सा. नाटक; १९२१.

**कुळकर्णी, नारायण विनायक** [१८९२–१९४८] नाटककार, कादंबरीकार व चित्रपटकथालेखक. यांचा जन्म सातारा जिल्ह्यांतील सुरली या गांवीं ता. २४ जुलै १८९२ रोजीं झाला. घरची गरिबी असल्यामुळें मॅट्रिकच्या वर्गापर्यंत ते कसेबसे वयाच्या पंचविसाव्या वर्षी येऊन पोहोंचले. परीक्षा मात्र उतरली नाहीं. वयाच्या अठराव्या वर्षापासून लेखनाला आरंभ झाला. प्रारंभीं ते 'गोविंदानुज' या टोपणनांवानें कविता लिहून प्रसिद्ध करीत. पण नाटक लिहिण्याकडे त्यांचा अधिक ओढा असे. 'पार्थप्रतिज्ञा' हें त्यांचें पहिलें नाटक. त्या वेळेस (१९१६) ते विद्यार्थी होते. त्यांनीं स्वतःसंबंधीं एके ठिकाणीं पुढीलप्रमाणें हकीकत लिहिली आहे. "वडील बंधूंच्यामुळें मला नाटकाचा छंद लागला. त्यांनीं आणून दिलेलीं पुस्तकें व त्यांनीं सांगितलेल्या नाटकांच्या हकीकती यांमुळें नाटकांकडे माझें लक्ष वेधलें; पण चांगलें व भरपूर शिक्षण मिळाल्याशिवाय आपल्याला चांगला लेखक

होतां येणार नाहीं याची तीव्र जाणीव होती. घरची गरिबी, प्रतिकूल परिस्थिति, वयाची वाढ, वाचनाचा व लेखनाचा बेसुमार हव्यास त्यामुळें आर्थिक साहाय्य मनासारखें मिळाल्याशिवाय शिक्षण मिळणें हें अशक्य ठरलें. फी-पुस्तकांसाठीं दारोदार हिंडलों, लाज वाटली, पण साहाय्यहि मिळेना. नाटकांत खूप पैसे मिळतात असें ऐकलें होतें. म्हणून खाडिलकरांच्या नाटकांच्या प्रेरणेनें नाटक लिहिलें. लेखक व्हावें या महत्त्वाकांक्षेनेंच शिक्षणाचा मार्ग पत्करला. शिकतां शिकतां लिहूं लागलों...चरितार्थाकरितां काय करावें हें कधींच समजलें नाहीं, उमजलें नाहीं व हातून कांहीं झालेंहि नाहीं. अपुऱ्या शिक्षणामुळें मानाची व जास्त पगाराची नोकरी कोठेंच मिळणें शक्य नाहीं ही जाणीव कायमची होती. कारकुनी, मास्तरकी अशा तऱ्हेचे धंदे अगर नोकरी करावी असें कधींच वाटलें नाहीं. लेखन करावें, लेखक व्हावें एवढी एकच इच्छा. पण लेखनव्यवसाय हा धंदा म्हणून करावा असें कधींच मनांत नव्हतें."

यांचें पहिलें नाटक 'पार्थप्रतिज्ञा' हें 'नाट्यकला-प्रसारक संगीत मंडळी'नें १९१७ सालीं रंगभूमीवर आणलें. साधी भाषा, सुटसुटीत संवाद, बऱ्यापैकीं प्रासंगिक व शाब्दिक विनोद, विविध चालींचीं गोड व सुबोध पदें यांमुळें हें नाटक लोकांना आवडलें व बराच बोलबाला झाला. याचा लेखकावर प्रोत्साहक असा परिणाम होऊन त्यानें 'उदयकाल' या नांवाचें नाटक लिहिलें. या नाटकाचाहि पहिल्या नाटकापेक्षां अधिक गाजावाजा झाला. कुळकर्णी यांच्या या दोन नाटकांना मिळालेलें यश पाहून, नव्या लेखकांना आपल्याकडे ओढून घेऊन त्यांचा आपल्या नाटक कंपनीच्या उन्नतीकडे उपयोग करून घेण्यांत पटाईत असलेले प्रसिद्ध नट नानबा गोखले यांनीं त्यांस एखादें स्वतंत्र सामाजिक नाटक आपल्यासाठीं लिहून देण्यास सांगितलें. नानबांनीं 'लोकमान्य नाटक मंडळी' त्या वेळेस चालविली होती. नानबांच्या मागणीनुसार कुळकर्णी यांनीं 'माईसाहेब' हें नाटक लिहिलें. या नाटकाचा 'सापत्नभाव' हा विषयच मुळीं हृदयस्पर्शी, त्यांत करुण रसाचा उठाव आणि मार्मिक स्वभावरेखन यांची जोड मिळाल्यावर नाटक रंगावें, प्रेक्षकांच्या हृदयाची जबरदस्त पकड घेण्यास तें समर्थ व्हावें यांत कोणतें आश्चर्य? या नाटकामुळें कुळकर्णी यांची कीर्ति पुष्कळच फैलावली. त्यांनीं त्यानंतर आठ-दहा तरी नाटकें लिहिलीं पण या नाटकाइतकें यश त्यांना कोणत्याच नाटकानें दिलें नाहीं. 'माईसाहेबकर्ते' ही त्यांच्या नांवामागें कायमची उपाधि जडली. पुढच्या

काळांत 'शाहुनगरवासी' किंवा 'गंधर्व' यांसारख्या मंडळ्यांनीं त्यांचीं अनुक्रमें 'डाव जिंकला', 'कान्होपात्रा' यांचे प्रयोग केले असतांहि नानबा गोखल्यांप्रमाणें त्यांना ते यशस्वी करतां आले नाहींत.

कुळकर्णी हे स्वतंत्र वृत्तीचे लेखक होते. सेवावृत्ति त्यांच्या मानी मनाला मानण्यासारखी नव्हती. दुःखाकष्टांत का होईना, त्यांनीं लेखणी जें कांहीं मिळवून देईल त्यावरच्च आयुष्यभर गुजराण केली. महाराष्ट्रांत नाटककंपन्या भराभर अस्तंगत होऊं लागलेल्या पाहतांच नाट्यक्षेत्राव्यतिरिक्त अन्य क्षेत्र पाहण्याची त्यांजवर पाळी आली. ते पूर्वी कथा लिहीतच असत, पण त्यांतून पैका कधीं निष्पन्न झाला नाहीं. तेव्हां कादंबऱ्या लिहून व त्या स्वतःच प्रसिद्ध करून निर्वाहापुरतें तरी द्रव्य निर्माण करतां येतें का पाहावें या विचारानें त्यांनीं आपल्या एका स्नेह्याच्या सहकारितेनें 'महाराष्ट्र कुटुंबमाला' या नांवाची एक पुस्तकमाला १९२४ सालीं सुरू केली. त्याच्या जोडीनें वर्तमानपत्रें विकण्याचाहि ते व्यवसाय करूं लागले. या 'मालें'तून त्यांनीं आठ कादंबऱ्या व दोन कथासंग्रह प्रसिद्ध केले.

कथा-कादंबऱ्यांप्रमाणेंच त्यांनीं चित्रपटकथाहि लिहिल्या. 'अयोध्येचा राजा', 'मायामच्छिंद्र', 'कर्ण', 'मायाबाजार', 'मेनका', 'कान्होपात्रा' या चित्रपटांचीं कथानकें त्यांनींच लिहिलीं.

कुळकर्णी हे कादंबरीक्षेत्रांत हरिभाऊ आपटे, सहकारी कृष्ण यांचे व नाट्यक्षेत्रांत खाडिलकरांचे अनुयायी होते. बोधवादी, ध्येयपूर्ण पण सत्यदर्शी असें चित्रण आपल्या कथा-कादंबऱ्या-नाटकांतून करण्याचा त्यांचा प्रयत्न असे.

**वाङ्मय :**

(१) साग्र संगीत पार्थप्रतिज्ञा नाटक; १९१७; प्रकाशक, क्षीरसागर आणि मंडळी, मुंबई.

(२) संत कान्होपात्रा; संगीत नाटक; १९३१; पुणें.

(३) डाव जिंकला, पौराणिक नाटक; १९२२; गोवर्धन प्रेस, पुणें.

(४) तिकडची शोभा; संगीत सामाजिक नाटक, १९३३; ज्ञानेश्वर प्रेस, कोल्हापूर.

(५) मंगलभुवन, संगीत सामाजिक नाटक; १९३४; श्री गणेश प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(६) माईसाहेब; सामाजिक गद्य नाटक; १९२२, मुंबई वैभव प्रेस, मुंबई; १९२९, श्रीगणेश प्रिंटिंग प्रेस, पुणें.
(७) क्षमेची क्षमा; संगीत सामाजिक नाटक; १९३२; हनुमान प्रिंटिंग प्रेस, पुणें.
(८) कसे दिवस जातील?; सामाजिक कादंबरी; १९२५; महाराष्ट्र कुटुंब-माला, पुणें.
(९) मजूर; सामाजिक कादंबरी; १९२५, १९३०; महाराष्ट्र कुटुंबमाला, पुणें.
(१०) शिपाई; सामाजिक कादंबरी; १९२५; महाराष्ट्र कुटुंबमाला, पुणें.
(११) न्याय?; सामाजिक कादंबरी; १९२६; महाराष्ट्र कुटुंबमाला, पुणें.
(१२) पैसा; सामाजिक कादंबरी; १९२६; महाराष्ट्र कुटुंबमाला, पुणें.
(१३) मातृसेवा; सामाजिक कादंबरी; १९२८; महाराष्ट्र कुटुंबमाला, पुणें.
(१४) संसारांत—(कष्टी वडील); सामाजिक कादंबरी; १९३१; महाराष्ट्र कुटुंबमाला, पुणें.
(१५) माणिक; सामाजिक कादंबरी; १९३१; महाराष्ट्र कुटुंबमाला, पुणें.
(१६) ती कोणाची?; सामाजिक कादंबरी; १९३६; महाराष्ट्र कुटुंबमाला, पुणें.
(१७) नयनबाण; सामाजिक कादंबरी; १९३६; महाराष्ट्र कुटुंबमाला, पुणें.
(१८) ग्रहणापूर्वी सुटका, भाग १ ला; सामाजिक कादंबरी; १९३८; ज्ञानेश्वर छापखाना, कोल्हापूर.
(१९) „ भा. २ रा; १९३९; ज्ञानेश्वर छापखाना, कोल्हापूर.
(२०) क्षमा; सामाजिक कादंबरी; ['भाऊ' या टोपणनांवानें लिहिली]; महाराष्ट्र कुटुंबमाला, पुणें.
(२१) माझ्या गोष्टी—भा. १ ला; १९३४, विजय प्रेस, पुणें.
(२२) „ —भा. २ रा; निर्माल्य; १९३७; ज्ञानेश्वर प्रेस, कोल्हापूर.
(२३) नवी कल्पना.
(२४) मुका मार.

**कुलकर्णी, बाबाजी विठ्ठल** [मृ. १८९३] ज्योतिर्विद्येचे अभ्यासक व लेखक. रत्नागिरी जिल्ह्यांत जमीनमहसूल खात्यांत हे कारकून होते. ज्योतिष-शास्त्राचा यांनीं फार परिश्रमपूर्वक अभ्यास केला होता. केरूनाना छत्रे यांच्या

मार्गदर्शकत्वाखालीं, त्यांच्याशीं पत्रव्यवहार ठेवून, त्यांनीं आपला ज्योतिषविषयक व्यासंग वाढविला. आकाशांतील स्थिर ताऱ्यांच्या नकाशांचें 'तारकादर्शक' हें पुस्तक केरूनानांच्या सूचनेनुसार व प्रोत्साहनामुळें त्यांनीं तयार केलें. "सर्व आकाशाचे तारकापुंजाच्या साधारण आकाराप्रमाणें सुमारें नव्वद भाग कल्पून त्यांस आकृतीप्रमाणें नांवें दिलीं आहेत. त्यांचा विस्तार व्याख्यानांत आहे. शिवाय सप्तऋषी, अश्विन्यादि २७ नक्षत्रें, यांत दाखविलीं आहेत. बृहत्तारकादर्श प्रसिद्ध झाल्यावर त्यांत सुमारें पोटविभागांसह दोनशें पुंज आणि १२ पासून १५ हजारपर्यंत ताऱ्यांचा समावेश केल्याचें दृष्टोत्पत्तीस येईल. प्रस्तुत पुस्तक 'न्यू स्टार्स ॲटलास' म्हणून जें प्रॉक्टरसाहेबानें पुस्तक लिहिलें आहे त्या आधारानें रचिलें असून शिवाय नॉटिकल आल्मनाक घेऊन त्याजवरून बरोबर स्पष्ट काल आणावा, अशी कोणाची इच्छा असल्यास त्यांच्याकरितां यांत सुमारें अडीचशें ताऱ्यांचे विषुवांश आणि क्रांति देऊन त्या त्या ताऱ्यांचे समोर इंग्रजी लिपींत नांवें दिलीं आहेत." या पुस्तकाप्रमाणेंच अधिक विस्तृत, ताऱ्यांचे विषुवांश आणि क्रांति यांचें सूक्ष्म गणित देणारा 'बृहत्तारकादर्श' नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा त्यांचा विचार होता. त्याचप्रमाणें 'सिद्धांत शिरोमणी'च्या सरणीवर 'करण शिरोमणि' नांवाचा ग्रंथ त्यांनीं तयार केला होता. द्रव्याभावामुळें हे दोन्ही ग्रंथ प्रसिद्ध होऊं शकले नसावेत.

**वा ङ्म य :**

तारकादर्श; [आकाशांतील स्थिर ताऱ्यांचे नकाशे]; १८८६; 'बकुल' आणि 'महंमदी' छापखाना, रत्नागिरी.

**कुळकर्णी, बाळकृष्ण रामचंद्र** [१८७३–१९०७] कथालेखक. जंजिरा संस्थानांतील नांदगांव या गांवीं ता. २३ जून १८७३ रोजीं यांचा जन्म झाला. यांचें शिक्षण ठाणें येथें इंग्रजी स्कूल फायनलपर्यंत झालें होतें. परीक्षा पास झाल्यावर यांनीं मुंबईच्या पोस्ट ऑफिसांत नोकरी धरली. 'मासिक मनोरंजन' या नियतकालिकाच्या प्रारंभींच्या काळांत त्यास जे लेखक त्याला कीर्ति मिळवून देण्यास कारण झाले अशा लेखकांपैकीं कुळकर्णी हे एक होत. 'मनोरंजन' मासिकांत त्यांनीं गोष्टी, स्फुट लेख वगैरे विविध प्रकारचें लेखन केलें. 'सरस्वती', 'परिणामीं हेंच',

या त्यांच्या कादंबऱ्या व 'सोमेश्वरशास्त्र्याचें पुराण' हें 'मनोरंजन'मधूनच पहिल्यानें प्रसिद्ध झालें. यांची भाषा सुबोध, मधुर व चित्ताकर्षक असे.

वाङ्मय :

(१) सरस्वती; सामाजिक कादंबरी [सतीशचंद्र चक्रवर्ती कृत 'राय परिवार' या बंगाली कादंबरीचे आधारें]; पहिली आवृत्ति, १९०१, पांचवी आवृत्ति, १९३३; मनोरंजन छापखाना, मुंबई.

(२) परिणामीं हेंच; सामाजिक कादंबरी [एका बंगाली कादंबरीचे आधारें]; दुसरी आवृत्ति, १९०७, तिसरी आवृत्ति, १९१३; मनोरंजन छापखाना, मुंबई.

**कुळकर्णी, बाळकृष्ण सखाराम** [मृ. १९४९] इतिहास संशोधक. मुंबई येथें वास्तव्य. यांचें घराणें कुलाब्याचे आंग्रे यांच्या संस्थानांत थळ व वरसोली या गांवच्या कुलकर्ण्यांचें वतन संपादन करून होतें. जवळ जवळ ३०–४० वर्षें इतिहास व इतर विषयांवर अध्ययन व लेखन चालू होतें. ज्ञातिविषयक, इतिहाससंशोधन हें यांचें आवडतें क्षेत्र होतें.

वाङ्मय :

(१) मावळा सरदार विश्वासराव नानाजी दिघे देशपांडे यांचें चरित्र; १९२४; मुंबई.

(२) वीररत्न बाजी प्रभु देशपांडे यांचें; [ऐतिहासिक कागदपत्रांसह]; सचित्र; १९२५; मुंबई.

(३) सरदार मुरारबाजी देशपांडे यांचें चरित्र; १९२९; मुंबई.

(४) सरदार त्रिंबक सूर्याजी चौबळ यांचें चरित्र.

(५) चिटणीस घराण्याची संक्षिप्त माहिती व सनदापत्रें; [ऐतिहासिक जुने लेख]; पुस्तक पहिलें; १९१५; मुंबई.

(६) ,, ; पुस्तक दुसरें; १९१७; मुंबई.

(७) चित्रेकुल-वंशवृक्ष; [प्राचीन इतिहास, सनदा व विविध वंशवृक्ष]; १९२६; मुंबई.

(८) चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंच्या ग्रामण्यांची संक्षिप्त माहिती व आज्ञापत्रें.

**केतकर, व्यंकटेश बापूजी** [१८५४–१९३०] ज्योतिषशास्त्रज्ञ. यांचा जन्म नरगुंद येथें झाला. यांचे वडील बापूशास्त्री हे रामदुर्ग संस्थानाधिपतींच्या आश्रयास होते. वेदान्त, व्याकरण व ज्योतिष यांचा त्यांनीं चांगलाच व्यासंग केला होता. पण यांचा अत्यंत आवडीचा विषय म्हणजे गायन. यांत प्रावीण्य संपादून त्यांनीं चांगलाच लौकिक मिळविला. बापूशास्त्री व्यंकटराव लहान असतांनाच वारले. व्यंकटरावांनीं मॅट्रिकची परीक्षा १८७४ सालीं दिली. या परीक्षेंत त्यांचा तिसरा नंबर लागून त्यांस 'बाई माणिकबाई बयरामजी जीजीभाई प्राइझ' मिळालें. व्यंकटरावांची घरची स्थिति अगदींच गरिबीची असल्यामुळें त्यांस विश्वविद्यालयांतील उच्च शिक्षण घेतां आलें नाहीं. त्यांनीं १८७५ त शाळाखात्यांत दुय्यम शिक्षक म्हणून नोकरी धरली व पुढें फर्स्ट असिस्टंट एज्युकेशनल इन्स्पेक्टरचे हुद्द्यापर्यंत चढत जाऊन १९११ मध्यें त्यांनीं पेन्शन घेतलें. व्यंकटराव यांचे वडील बापूशास्त्री यांनीं ज्योतिषविषयावर 'ज्योतिषशास्त्रसुबोधिनी' व आणखी दोन ग्रंथ (अप्रकाशित) संस्कृत भाषेंत लिहिले आहेत. व्यंकटराव यांना या ग्रंथांचा अभ्यास करण्याची इच्छा झाल्यामुळें त्यांचें ज्योतिषशास्त्राकडे लक्ष वेधलें. त्यांनीं प्रथम आपल्या आर्य ज्योतिषशास्त्रांपैकीं ग्रहलाघव, सूर्यसिद्धांत, शिरोमणि वगैरे ग्रंथांचें अध्ययन केलें. त्यांना जरी युनिव्हर्सिटीचें उच्च शिक्षण मिळालें नव्हतें, तरी त्यांनीं स्वतः परिश्रम करून लागर्थम् व कॅलक्युलस (शून्यलब्धि) पर्यंतचें सर्व गणित आपले अंकित करून घेतलें होतें. आर्यज्योतिषग्रंथांचें अध्ययन चालू असतांनाच त्यांनीं पाश्चात्य ज्योतिषग्रंथांचाहि अभ्यास केला. या दोन्ही प्रकारच्या शास्त्रीय व्यासंगानें त्यांची तुलनात्मक विचार करण्यास तयार अशी दृष्टि बनली. आपलीं प्रचलित पंचांगें दृक्प्रत्ययास येत नाहींत याचें कारण ग्रहलाघवादि ग्रंथांतील गणितपद्धतीस चालना पाहिजे, ही गोष्ट केतकर यांच्या लक्षांत येऊन आपण एक नवीन पंचांगोपयोगी करणग्रंथ तयार करावा, असें त्यांच्या मनानें घेतलें व त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या वयाच्या तिसाव्या वर्षी ग्रंथ करण्यास सुरुवात करून १८९२ मध्यें तो पुरा केला. प्रथम त्यांनीं हा ग्रंथ मराठी भाषेंत लिहिला होता; परंतु मराठी

भाषा ही महाराष्ट्राचीच फक्त भाषा असल्यानें ग्रंथाचा उपयोग महाराष्ट्राबाहेर होणार नाहीं, हें जाणून त्यांनीं त्याचें संस्कृतांत रूपांतर केलें. हा 'ज्योतिर्गणित' नांवाचा ग्रंथ, त्याचें महत्त्व व उपयुक्तता लक्षांत घेऊन पुण्यांतील आनंदाश्रम संस्थेनें १८९८ मध्यें छापून प्रसिद्ध केला. हा ग्रंथ छापल्यानंतर ग्रहलाघवपद्धतीचा एक श्लोकबद्ध करणग्रंथ असावा, असें वाटल्यावरून केतकर यांनीं 'केतकीग्रहगणितम्' या नांवाचा दुसरा करणग्रंथ १८९९ मध्यें छापून प्रसिद्ध केला. तसेंच तिथी, नक्षत्र व योग हीं तयार करण्याकरितां सारण्या तयार करून 'वैजयंती' या नांवानें १९०० मध्यें त्यांनीं त्या प्रसिद्ध केल्या. अशा रीतीनें करणग्रंथ तयार झाल्यावर या नवीन करणग्रंथाधारें दृक्प्रत्ययदायी असें शुद्ध पंचांग तयार करून जनतेला सादर करावें, अशी इच्छा होऊन केतकर यांनीं शके १८२१ पासून 'केतकी' पंचांग म्हणून काढण्यास सुरुवात केली व तेव्हांपासून अद्यापपर्यंत तें निघत आहे. हें पंचांग पुष्कळ ठिकाणीं मान्य होऊन त्या पद्धतीवर 'चित्रशाळा पंचांग', 'गोसेवक पंचांग', 'प्रभाकर पंचांग', पुत्तूर येथील कानडी पंचांग अशीं अनेक पंचांगें निघूं लागलीं आहेत. 'गोलद्वय प्रश्न' हा आकर्षणशास्त्रावरचा ग्रंथ त्यांनीं संस्कृत भाषेंत लिहिला. द्रव्याच्या अभावीं त्यांच्या हयातींत तो छापण्याचा योग आला नाहीं. 'इंडियन ॲण्ड फॉरिन क्रॉनॉलजी' हा ग्रंथ इतक्या उच्च दर्जाचा झाला आहे कीं, तो छापण्याचें काम 'रॉयल एशियाटिक सोसायटी'नें आपल्या शिरावर घेतलें. हा ग्रंथ इंग्रजी भाषेंत असल्यामुळें केतकरांची बुद्धिमत्ता व संशोधनशक्ति यांबद्दल इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स, जर्मनी, हॉलंड वगैरे पाश्चात्य देशांतील विद्वानांची खात्री पटून आर्यज्योतिषासंबंधीं त्यांचे कित्येक चुकीचे ग्रह या ग्रंथानें दूर झाले आहेत.

पंचांगसंशोधनाचे कामीं आधुनिक वेधोपलब्ध सूक्ष्म तिथी व शुद्ध वर्षमान व अयनगति घेण्याबद्दल पुणें व सांगली येथील ज्योतिषसंमेलनांत ठराव पास होऊन त्याप्रमाणें कांहीं पंचांगेंहि निघूं लागलीं आहेत. जुने ज्योतिषी यांना या गोष्टी अद्याप पटल्या नाहींत, परंतु त्या ते लवकरच मान्य करतील असें वाटतें. विशेषतः अयनांशांचा प्रश्न अजून वादग्रस्त आहे. या प्रश्नावर केतकर यांनीं आपल्या ग्रंथांत फारच संशोधनपूर्वक प्रकाश पाडला आहे. (चित्रमयजगत्, सप्टें. १९३०–संक्षेप.)

**वाङ्मय :**

(१) ग्रहगणित अथवा सूर्य, चंद्र आणि ग्रह यांच्या गणिताचीं कोष्टकें, उदाहरणें व उपपत्तीसह; १९१४; आर्यभूषण छापखाना, पुणें.

(२) नक्षत्रविज्ञान; [नकाशे, उपयुक्त माहिती व गणित]; १९१६; सुधारक छापखाना, पुणें.

(३) गोलद्वय प्रश्नविमर्श [आकर्षणशास्त्र]; १९३४; आर्यभूषण, पुणें.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

ज्योतिर्विद् केतकरांचें संक्षिप्त चरित्र; दत्तात्रेय वेंकटेश केतकर; आर्यभूषण प्रेस, पुणें.

# चरित्रसूचि